# दंतकथा

[ पधरा विनोदी गोष्टी ]

डॉ. अनंत वामन वर्टी




नॅशनल इन्फर्मेशन ॲण्ड पब्लिकेशन्स लिमिटेड, मुंबई

# दंतकथावली

# दंतकथा

डॉ. ढोबळाच्या घरी तुम्हाला दोन फोटो दिसतील. बाहेरच्या खोलीत जो मोठा फोटो आहे, तो एका वयस्क धीरोदात्त पुरुषाचा आहे. तुम्ही जर डॉ. ढोबळांना पाहिलेले असेल तर तुम्ही सहज सांगाल की हा फोटो त्यांच्या वडिलांचा असावा. तुमचा हा तर्क शंभर टक्के बरोबर आहे.

त्यांच्या शय्यागृहात एका वयस्क स्त्रीचा फोटो आहे. तिच्या चेहऱ्यावरील सुरकुत्या तुम्हाला त्यात स्पष्ट दिसतील. तुम्ही जर डॉक्टरना कुतूहलाने प्रश्न केला, "हा फोटो ना? आमच्या सासूबाईंचा!" तुम्ही डॉक्टरीणबाईंना पाहिलेले असेल, तर तुम्हाला हे खरे वाटेल. पण तुम्हाला असे सांगितल्यावर डॉक्टर मनातल्या मनात म्हणतील, "कसं फसवलं बेट्याला!" आणि मग ते स्वतःशीच मिस्किलपणे हसतील!

कारण तो फोटो त्यांच्या सासूबाईंचा नव्हताच मुळीं. तो फोटो होता याचा, त्याचाच तर गमतीचा इतिहास तुम्हाला सांगायचा आहे.

घड्याळाने साडेचारचा ठोका दिला आणि वाचीत असलेल्या पुस्तकांतून ढोबळांनी मान वर काढून दचकून पाहिले—"अरेच्या! बराच वेळ झाला की! पाच वाजता सुशीलाबाई येणार आहे. चला, आता तयारीला लागलं पाहिजे." असे स्वतःशीच म्हणून ते खुर्चीवरून उठले आणि दाढीची उपकरणे जमवू लागले.

त्यांनी चांगली घोटून घोटून दाढी केली. दाढी करताना त्यांचे सारे विचार अर्थातच सुशीलाबाईविषयींच चालले होते. इतके दिवस मुग्धा-

वस्थेतच असलेल्या आपल्या प्रेमाला आज ते तिच्याजवळ वाचा फोडणार होते. ती करील का आपल्या प्रेमाचा स्वीकार ? त्यानी आरशात पाहिले. त्याची उमर चाळिशीच्या आसपास होती, पण ते अजून तरुण दिसत होते तोंडावर वार्धक्याचे अजून विशेषसे काही लक्षण दिसून येत नव्हते वाढत्या वयाच्या परिसाच्या स्पर्शाने डोक्यावरचे काही तुरळक केस रुपेरी होऊ लागले होते. पण ते सहज कुणाच्या लक्षात आले नसते त्याच्या तोंडात दात मात्र नव्हते— पण ते काही म्हातारपणामुळे पडलेले नव्हते एका दतवैद्याच्या चिमट्याने त्याचे ढोबळाच्या तोंडातून बळेच उच्चाटन केले होते आणि तेव्हापासून त्याच्या शरीरात ठाण माडून बसलेल्या सधिवाताचेहि उच्चाटन झाले होते. पण त्याच दतवैद्याने बनवून दिलेल्या दाताच्या सुदर कवळ्या तोडात बसवल्या की ढोबळ अगदी तरणेबाड दिसत. अजून त्याच्या पाठीला पोकदेखील आले नव्हते 'मग सुशीलाबाई—सुशी—आपली सुशा का नाही करणार आपल्या प्रेमाचा स्वीकार ?' त्यानी आरशात पाहून एक समाधानाचा सुस्कारा सोडला.

दाढी करून झाल्यावर त्यानी सुवासिक साबणाने आपले तोड धुऊन काढले. नतर त्याच्यावर क्रीम चोपडले किती गुळगुळीत नी तुकतुकीत झाली होता आज त्याची दाढी ! केसाना एक उची पोमेड लावून त्यानी त्याचा भाग पाडला नी ब्रशने ते चापचोपून बसवले. नतर तोड धुताना काढून ठेवलेल्या दाताच्या कवळ्या आपल्या तोडात ते बसवू लागले

आणि तेव्हाच त्याचा घात झाला !

त्या अत्यत महत्त्वाच्या क्षणी ढोबळाना आलेली शिक फारच अपशकुनी ठरली ! तोंड धुताना त्याच्या घ्राणेंद्रियात एक चुकार जलबिंदु शिरला होता. पण थोड्याच वेळात त्याला त्या गुहेतील कोंडमारा असह्य होऊन स्वातत्र्य-प्राप्तीकरिता त्याने जोरदार चळवळ सुरू केली. त्यामुळे ढोबळाच्या नाकातील मज्जातंतु डिवचले गेले. उचावर माथेरानला रहाणाऱ्या मध्यवर्ति सरकारकडे तातडीचे सदेश गेले. तेथून तावडतोब हुकूम आला, की त्या बडखोर जलबिंदूला एकदम हद्दपार करा ! आणि ती शिक्षा इतक्या उत्साहानें पार पाडली गेली, कीं तो पाणीदार बडखोर तर हद्दपार झालाच, पण बरोबर त्याच वेळी ढोबळ आपल्या तोंडात बसवीत असलेल्या दाताच्या कवळीनें-

देखील इतक्या काही जोराने उड्डाण केले, की ती वेगाने जमिनीवर आपटली नी तिचे तुकडे तुकडे झाले !

क्षणभर ढोबळानी त्या कवळीच्या तुकड्याकडे विस्फारित नेत्रानी पाहिले आणि दुसऱ्याच क्षणी त्या तुकड्याचा खरा अर्थ त्याच्या लक्षात आला. जणू काय ह्या अपघातामुळे सुशीलाबाईच्या बाबतींतील आपल्या आशाचेहि असेच तुकडे तुकडे होणार आहेत, असे ते इतस्तत पसरलेले कवळीचे तुकडे त्याना दात विचकून सागत होते !

आता काय करावे, हेच त्याना सुचेना ! सुशीलाबाईना यावयास आता पाचदहा मिनिटाचाच काय तो अवधि उरलेला होता तेवढ्या वेळात दुसऱ्या कवळीची व्यवस्था होणे अशक्यच ते गोंधळून गेले. त्या वेळीं त्याना वाटू लागले, दाताच्या कवळीइतकी महत्त्वाची दुसरी कुठलीहि वस्तु ह्या अवनी-तलावर नाही खुद्द परमेश्वर जर ह्या वेळी एका हातात ढोबळाच्या तोडात बरोबर बसणारी दाताची कवळी नी दुसऱ्या हातात त्रिभुवनाचे राज्य घेऊन आला असता तर ढोबळानी दाताच्या कवळीचेच वरदान मागितले असते !

काय करावे हे न समजून ढोबळानी कवळीचे तुकडे गोळा केले. ते तुकडे टेबलाच्या खणामध्ये ठेवून झाल्यावर त्यानी आरशात आपला चेहरा पाहिला. त्याना तो एखाद्या भग्न देवालयाप्रमाणे वाटला ! कवळीशिवाय आपला चेहरा ते आरशात क्वचितच पाहात आपल्या चेहऱ्याचे ते प्रतिबिंब त्याना मुळीच आवडत नसे. आता सुशीलाबाई तर यायच्या चुकत नाहीत ! तेव्हा आपले दर्शन तिला कोठल्या स्वरूपात होईल हे पाहाण्याकरिता रागा-नेंच आरशात आपला चेहरा पाहावयास ते उभे राहिले होते अहाहा ! काय पण ते रूप ! वरचा ओठ आत गेला होता. नाकाच्या पाकळीपासून ओठाच्या कोपऱ्या-पर्यंत जाणाऱ्या सुरकुत्या किती तरी खोल दिसू लागल्या होत्या. काही बोलण्याचा प्रयत्न केला की वरील ओठाच्या आतबाहेर अशा काही विचित्र हालचाली होत. कवळी असताना चागले फुगीर दिसणारे गाल तर आता अगदीं एकमेकाना मिडल्याप्रमाणे दिसत होते, तोंड उघडले की त्याची आतील बाजू एखाद्या कल्हई केलेल्या बोळक्यासारखी दिसे. त्याना वाटलें, आपण एकदम निदान वीस वर्षांनीं तरी अधिक म्हातारे झालों आहोंत. आरशातील आपलें प्रति-

बिंब पाहून त्याना वाटले, आपणासमोर ' विश्राम मंडळा ' चा एखादा सभासद तर उभा नाही ना ? छे छे ! आता सुशीलाबाई आल्यावर आपण तिचं कोणत्या तोंडान स्वागत करणार ? वैतागाने त्यानी आपले अंग एकदम एका आरामखुर्चीवर टाकून दिले.

घड्याळाची ' टिक् टिक् ' त्याच्या कानावर तोफाच्या आवाजाप्रमाणे येऊन आदळत होती नी त्याना जाणीव करून देत होती, ' पाहा, चालला क्षण मोलाचा आहे, लवकर काहीतरी तोड काढ, नाहीतर परिणाम फार वाईट होईल ! तुझा हा असला म्हातारा चेहरा पाहून सुशीलाबाई तुझ्यावर प्रेम करणार नाही टिक् टिक् '

आरामखुर्चीत पडल्या पडल्या बराच वेळ शून्य दृष्टीने ते समोर पहात होते ! त्याच्या डोळयासमोरच भिंतीवर त्याच्या वडिलाचा तो फोटो लावलेला होता, पण तो त्याना दिसत नव्हता त्याच्या मेंदूतील मज्जातंतूनी आपल्या प्रयत्नाची पराकाष्ठा चालवली होती पण ह्या बिकट प्रसंगातून सुटका करून घेण्याचा कुठलाच मार्ग त्याना हुडकून काढता येत नव्हता डॉ ढोबळ जवळ जवळ हताश झाले होते अखेर निरुपाय म्हणून आपल्या कवळीविषयी सुशीलाबाईना सर्व स्पष्टस्पष्ट सांगून टाकाव नी मग काय होईल ते होऊ द्याव, असे आपल्या मनाशी त्यानी जवळजवळ ठरवूनच टाकले

इतक्यात घड्याळात पाचचे टोके पडले आणि त्याच्या मागोमाग बाहेरच्या दरवाजावर ' टिक् टिक् ' असा नाजुक आवाज झाला. आपल्या विचाराच्या तंद्रीतून ढोबळ एकदम दचकून जागे झाले आणि त्याची नजर इतका वेळ त्याना न दिसणाऱ्या त्याच्या वडिलाच्या फोटोवर खिळली. पुष्कळदा खूप विचार करूनहि एखाद्या अडचणीतून मार्ग काढता येत नाही, पण अगदी ऐन वेळी अगदी सर्व आशा आता नष्ट झाल्या आहेत असे वाटू लागते अशा वेळी अशी काही एखादी स्फूर्तीची लाट येते, की अडचणीतून बाहेर पडण्याचा मार्ग एकदम अगदी स्पष्ट दिसू लागतो ! आणि मग आपले आपणालाच आश्चर्य वाटू लागते, की इतका वेळ डोकफोड करूनहि इतकी साधी गोष्ट आपणाला कशी सुचली नाही ? ढोबळाचे तसेच झाले. पाचाच्या ठोक्यानी नी दारातून आलेल्या टिचक्याच्या आवा-

जाने जणू काय त्याचा मेदू एकदम जागा झाला आपल्या वडिलाचा फोटो त्यानी क्षणभरच पाहिला आणि ते लगेच उठून आरशापाशी गेले. आरशातल्या आपल्या प्रतिबिबाची त्यानी त्या फोटोशी तुलना केली. आणि त्याच्या त्या सुरकुतलेल्या खप्पड चेहऱ्यावर स्मिताची किंचितशी छटा उमटली ह्या अडचणीतून बाहेर पडण्याचा मार्ग त्यानी क्षणार्धात ठरवून टाकला होता.

हा सर्व प्रकार वर्णन करून सागण्याला जितका वेळ लागला, त्याच्या एक दशाशहि तो खरोखर घडून यायला लागला नव्हता पण हा वेळपावेतो दारावरच्या टिचक्यातला नाजुकपणा कमी होत जाऊन त्यात उघड उघड अधीरता व्यक्त होऊ लागली होती ढोबळाना आतापर्यंत बराच परिचित झालेला काकणाचा आवाजहि त्या टिचक्याबरोबर आता त्याच्या कानावर येऊन पडू लागला होता ढोबळानी हलकेच जाऊन दरवाजा उघडला आणि पाठीला किंचित् पोक काढून ते खुर्चीकडे परतले

" इश्श ! किती वेळ उभ करायच माणसाला ताटकळत !" आत शिरता शिरता सुशिलाबाई लाडिकपणाने म्हणाल्या पण त्याच्या तोडून ते वाक्य पुरतेपणी बाहेर पडते न पडते तोच त्याच्या दृष्टीला ढोबळाचा तो निर्दत चेहरा पडला ! त्याबरोबर त्या इतक्या दचकल्या, की खाद्यावर एखादी पाल पडली असती तरी त्या तेवढ्या दचकल्या नसत्या ! त्यानी आपली जीभ एकदम चावली

" कोण पाहिजे आपणाला ? " तिऱ्हाईतपणे गभीर चेहऱ्यानें ढोबळानी विचारले.

आपल्या निर्दत तोडातून बाहेर पडणारे ते शब्द त्याना किती विचित्र नी बोबडे वाटले ! त्याचा तो आवाज नेहमीपेक्षा इतका निराळा निघत होता, की हा आवाज आपला आहे की नाही ह्याची त्याना जबर शका आली. आपल्या घरात दुसराच कोणी एखादा म्हातारा बसून बोलतो आहे, असा त्याना क्षणभर भ्रम पडला खुद्द त्याची ही अवस्था, तर तो आवाज ऐकून सुशीलाबाईचा चागलाच गोधळ उडाला असल्यास त्यात नवल नव्हते. ढोबळाच्या चेहऱ्याकडे एक कटाक्ष टाकून क्षणार्धात त्यानी स्त्रीसुलभ निरीक्षण

केले, भिंतीवरील ढोबळाच्या तीर्थरूपाच्या फोटोकडे एकदा पाहिले आणि आपण काहीतरी भयकर चूक केली आहे हे लक्षात येऊन त्या एकदम खजील झाल्या !

" कोण पाहिजे आपल्याला ? "

सुशीलाबाईचा गोधळ उडालेला पाहून ढोबळाना बराच धीर आला. त्यानीं तोच प्रश्न परत एकदा विचारला

" नाही म्हटल डॉक्टर आहेत का घरात ?" सुशीलाबाईचा उडालेला तो गोधळ ढोबळाना मोठा कमनीय वाटला विशेषतः गालावरची ती लाली ! त्या मोहक चित्राकडे पाहाण्यात ते इतके गुग होऊन गेले, की आपल्या तोडात दात नाहीत नी आपण आपल्या वडिलाचे सोग आणलेले आहे हेदेखील क्षणभर ते पार विसरून गेले ! त्यानी उत्तर दिले, " हो ! नाही अ ? डॉक्टर ना ? आहेत नाहीत कोण डॉक्टर ? "

" हो " म्हणून प्रथम बेसावधपणे ते बोलून गेले खरे, पण त्या वेळी त्याचा वरचा ओठ जो एकदम पुढे ढकलला गेला, त्यामुळे ते एकदम भानावर आले आणि मग आपणाला सावरून घेण्याचा प्रयत्न करताना त्याची बरीच तिरपीट उडाली.

" डॉक्टर डॉक्टर म्हणजे डॉक्टर ढोबळ—आपले चिरजीव ! " सुशीलाबाईनी स्पष्टीकरण केले एखाद्या आदरणीय वृद्धाकडे पाहावे तसे त्या आता ढोबळाकडे पाहात होत्या.

" अस्स, अस्स ! डॉक्टर ढोबळ ! अहो, तुम्हाला ते मोठे डॉक्टर असतील ! " हसत हसत ढोबळ म्हणाले, " पण आम्हाला आपला तो अजून खड्याच आहे. अस होत पाहा ! कोणी त्याला ' डॉक्टर ' म्हटल तर ते चटकन् आमच्या ध्यानात येतच नाही डॉक्टर ढोबळ ना ? ते गेले आहेत गावाला काही कामासाठी. काम तातडीच होत म्हणून मी स्वतः इथ येऊन पाठवून दिल त्याला गावाला नाहीतर नुसत्या पत्रान काय ऐकणार होता आमचा खड्या आपल डॉक्टर ढोबळ ? " आता ढोबळाच्या बाताची गाडी चागलीच रुळावर आली होती

" कधी येतील ते परत ? " सुशीलाबाईनी विचारले. त्याच्या आवाजातील निराशा प्रत्ययास येताच ढोबळाना मनातून थोडासा आनद झाला.

" येतील पाचसहा दिवसानी " नवीन कवळी तयार होण्याला किती वेळ लागेल याचा हिशोब करून ढोबळ म्हणाले " काही विशेष काम होत का ? "

सुशीलाबाई केवळ ठरल्याप्रमाणे आपणाला भेटावयास आलेल्या आहेत हे माहीत असूनसुद्धा ढोबळानी मिस्किलपणे प्रश्न केला

" मी नर्स सुशीलाबाई. माझी एक सीरियस केस दाखवायची होती त्याना " सुशीलाबाईहि काही कमी नव्हत्या !

" होय का ? पण ते आता कस जमणार ? " ढोबळानी मनातल्या मनात हसत प्रश्न केला

" हो बर तर. मी जाते आता " असे म्हणून नमस्कार करून सुशीलाबाई निघून गेल्या.

आपण डॉ. ढोबळ नसून आपले वडील आहोत ह्याची बतावणी तर सोळा आणे केली नी एका मोठ्या सकटातून पार पडलो ह्या विचाराने ढोबळयानी एक मोठा समाधानाचा सुस्कारा टाकला त्या विजयानदाचा उपभोग घेण्यासाठी त्यानी एक सिगारेट शिलगावली नी झाल्या प्रकाराचा विचार करीत ते आरामखुर्चीत पहुडले.

इतक्यात दारावर परत ' टिक्‌टिक्‌ ' ऐकू आली आणि त्या टिचक्याच्या राकटपणावरून बाजारात गेलेला गणू परत आलेला असावा हे त्यानी ताडले. त्याचे दतविहीन तोड पाहण्याची गणूला सवय असल्यामुळे व त्यानें ते तसे काही मघाच्यासारखी आकाश कोसळण्याची भीति नसल्यामुळे ढोबळानी शातपणे जाऊन दार उघडले गणू आत येताच त्यानी त्याला सूचना दिली, " हे पहा गणू, कोणी आल तर डॉक्टर गावाला गेले आहेत म्हणून साग, बर का. "

" आन्‌ सुशिलाबाय आयली तर ? " ढोबळाच्या आणि सुशीलाबाईच्या रोमान्सचा सुगावा लागलेल्या गणूने अगदी गभीरपणाने प्रश्न केला.

" गणू, फाजीलपणा करू नकोस, कोणीहि आल तरी म्हणतो ना ? त्यात सुशीलाबाईसुद्धा आल्या ! " ढोबळानीं गणूला ताकीद दिली. गणूनें

' जी ' म्हणून दार लावून घेतलें सुरक्षितपणाच्या भावनेने ते परत आपल्या खुर्चीवर येऊन पडले.

बिचारे ढोबळ ! त्याना काय कल्पना की मघाच्यापेक्षाहि अधिक बिकट प्रसंग थोड्याच वेळात आपणावर येऊन कोसळणार आहे म्हणून ?

डॉ. ढोबळ ह्या जगात अगदी एकटे होते त्याची प्रथम पत्नी त्याना पोरके सोडून गेली त्या गोष्टीला आता दहाबारा वर्षं झाली होती. विधुरावस्थेतली एकलेपणाची आग त्याना भाजून काढीत होती. त्याच्या एकाकी आयुष्यात सिगरेट ही एकच एक त्याची सोबतीण होती. विषाने विष मारावे, तसे सिगरेटवर सिगरेट जाळून ते ह्या एकलेपणाच्या आगीचा दाह कमी करण्याचा प्रयत्न करीत

त्याच्या ह्या एकाकी आयुष्यात थोड्याच दिवसापूर्वी सुशीलाबाईनी प्रवेश केला होता ! आपल्या प्रेमाचे सिचन करून सुशीलाबाई आपल्या मनातली एकलेपणाची आग विझवितील अशी त्याना अलीकडेच उमेद वाटू लागली होती. त्याच्या अपेक्षेप्रमाणे ती आग हळूहळू विझूहि लागली होती, पण तिची जागा दिसावयास सौम्य पण परिणामाने अधिक भयकर अशा हुरहुरीने घेतली होती

आपल्या नायक–नायिकाची जी प्रथम भेट झाली ती परिस्थिति असामान्य होती त्या वेळी वसतऋतु नव्हता कोकिळाच्या कूजनाचे पार्श्व-सगीत त्या भेटीला नव्हते, किवा कोठल्यातरी मादक फुलाचा सौरभ त्या वेळी हवेत दरवळलेला नव्हता ! मुबईच्या एका मोठ्या हॉस्पिटलात एका आसन्नमरण रोग्याच्या खाटेजवळ त्याची पहिली दृष्टादृष्ट झाली वसताऐवजीं त्या वेळी तिथे मृत्यूची भीषण छाया पसरली होती. कोकिळेच्या पचमा-तील कूजनाऐवजी मृत्यूच्या खर्जातल्या घरघरीची त्या भेटीला साथ होती, आणि घ्राणेद्रियाना तापदायक होणारा जतुनाशक औषधीचा वास वॉर्डात भरलेला होता. पण याहि परिस्थितींत मदनाने आपलें शरसधान चालविलें आणि विधुर ढोबळ आणि गतधवा सुशीलाबाई ह्याची हृदयें त्याच्या पुष्पशरानी विद्ध झाली ! पहिल्या दृष्टींतच दोघाच्या हृदयात एकमेकाची

ओळख पटली. ते उपचार करीत असलेल्या रोग्याच्या नाडीचे ठोके मंद मंद पडू लागले त्या वेळी दोघांच्याहि नाड्या अधिक जोराने धावू लागल्या. आवाजाने थकलेल्या रोग्याची हृदयक्रिया हळूहळू थंडावू लागली तेव्हा दोघांचीहि हृदये कुठल्या तरी उच्छृंखल भावनांनी थरारून जाऊन नाचू लागली रोग्याला निरनिराळीं इन्जेक्शने देऊन त्याच्या हृदयाला तजेला आणण्याचा ती दोघे प्रयत्न करीत असतां त्यांचीच हृदये मदनबाणांनी रक्तबंबाळ होत होती ! तो रोगी बेशुद्धावस्थेत असंबद्ध बडबड करीत असतां दोघांचेहि डोळे एकमेकांशी मूकभाषेने प्रेमाचे रामायण बोलत होते. रोग्याचे शरीर थंड पडू लागले तेव्हा दोघांच्याहि शरीरातील रक्ताभिसरण पूर आलेल्या ओढ्याच्या वेगाने वाहू लागून त्यांची कानशिले गरम झाली. आणि अखेरीस रोगी मेला तेव्हा दोघांनाहि ह्या जगांत प्रेमदृष्ट्या आपला पुनर्जन्म झाला असे वाटले !

नंतर त्यांच्या ओळखीचे रूपांतर मोठ्या झपाट्याने दाट स्नेहांत होऊन आतां ते प्रेमाच्या उंबरठ्यावर उभे होते ढोबळ मोकळेपणाने आपल्या-विषयीची माहिती सुशीलाबाईंना सांगत, पण अजून एक गोष्ट त्यांनी सांगायची राहून गेली होती ज्या तोंडाने ते आपली सर्व माहिती देत त्या तोंडातल्या बनावट दांताविषयींची माहितीच नेमकी त्यांनी सुशीलाबाईंना दिली नव्हती हा प्रकार त्यांनी जाणूनबुजून केला होता अशांतला भाग नव्हता आपण बनावट दांत वापरतो, ही गोष्टच मुळी ते विसरून गेले होते इतकी ती गोष्ट त्यांच्या सरावाची झाली होती कवळीच्या अस्तित्वाची जाणी-वच त्यांना होत नसे ती गोष्ट त्यांना आतां लग्न होईपर्यंत तरी सुशीलाबाईंना सांगावयाची नव्हती. आणि आतां प्रेमयाचनेच्या ऐन मोक्याच्या वेळीच त्यांची कवळी फुटली होती नी त्यांच्यावर आजचा प्रसंग आला होता !

वरील प्रसंगाला साधारण तासभर होऊन गेला होता आलेल्या संक-टांतून आपण सुखरूप निभावून पार पडलो ह्या आनंदात ढोबळ होते. साधारण अंधार पडला की नव्या कवळीचें माप देण्यासाठीं ते दंत-वैद्याकडे जाणार होते. आणि त्याविषयींच त्यांचे विचार चालू होते !

" सुशिलाबायची चिठ्ठी आलीया. " त्याच्या विचाराच्या तद्रीचा भग करून गणू म्हणाला. त्याच्या हातातून चिठ्ठी घेऊन ढोबळ वाचू लागले–

" रा. रा ढोबळ (डॉ ढोबळाचे वडील) यास, सा न.–आपण येथे आल्याचे मी आईला सागितले. ते ऐकून तिला फारच आनद झाला. तिची आणि आपली पूर्वीची बरीच ओळख आहे, असे ती म्हणाली आपली भेट व्हावी म्हणून तिनें आपणास रात्री जेवणाचेच आमत्रण दिले आहे. मी एका सीरियस केसवर कुर्ल्यास जात आहे, म्हणून समक्ष आमत्रण देण्यास जमले नाही ह्याचा राग नसावा जेवणास अवश्य यावे आई वाट पहात राहील.

**सुशीलाबाई**

" ता क —जेवणास आपल्या प्रकृतीला मानवतील असे हलके व चावण्यास मुसमुशीत पदार्थ करण्यात येतील. तरी अवश्य यावे

**सुशीलाबाई.**

खूप धडपड करून पर्वताचे शिखर गाठावे नी तिथे बसून दोन समाधानाचे सुस्कारे सोडावेत न सोडावेत, तोच कुणी तरी परत खालच्या दरीत लोटून द्यावे तसे ढोबळाना ती चिठ्ठी वाचून वाटले एका सकटातून पार पडण्याकरिता त्यानी जो डाव टाकला होता त्यातूनच आता एका नवीन सकटाची उत्पत्ति झाली होती !

सुशीलाबाईना आई होती की नाही हे त्याना माहीत नव्हते. त्याना असले प्रश्न विचारण्याची ढोबळाना जरूरच वाटली नव्हती. आणि इतर गप्पागोष्टीपुढे तेवढी कधी फुरसतहि त्याना मिळाली नव्हती आणि आता त्याना कळून चुकले होते, की सुशीलाबाईना आई आहे येवढेच नव्हे, तर ज्याचे सोंग सध्या आपण घेतले आहे त्या आपल्या वडिलाना ती चागल ओळखतेहि ! त्याना प्रथम वाटले, आपण जाऊच नये ! पण लगेच त्याच्या मनात विचार आला-आज जरी आपण जाण्याच टाळल तरी उद्या नाहीतर परवा आपणाला तिच्याकडे जावेच लागणार. कवळी तयार होईपर्यंत चार सहा दिवस एकदा आणलेल सोंग टिकवण आपणाला भागच आहे ! आजचें

आमत्रण नाकारण्यात आजचे मरण उद्यावर ढकलण्यापलीकडे काही अर्थ नाही. शिवाय तसे केल्यास सुशीलाबाई रागावेल व आपल्या वडिलावरचा राग नतर आपणावर काढील ही दूरदृष्टिहि त्याना ठेवणे भाग होते. सुशीलाबाईची आई पूर्वी कधी आपल्या वडिलाकडे आलेली त्याच्या आठवणीत नव्हती. म्हणजे त्याची भेट होऊन आज बरींच वर्षे झाली असतील ! आपले वडील वारल्यालाच आता सात आठ वर्षे झाली आहेत. तेव्हा तिला आपल्या सोगाचा सशय येणेहि फारसे शक्य नाही. सुशीलाबाईहि त्या वेळी कुर्ल्यास जाणर आहे त्यामुळे आपले काम तितकेच सोपे होईल. असा सर्व बाजूनी विचार करून अखेरीस त्यानी आजच जाण्याचे ठरवले.

"या ढोबळ. म्हटल येता की नाही !" ढोबळानी सुशीलाबाईच्या घरात पाऊल टाकताच एका वयस्क बाईनें त्याचे स्वागत केले.

"वा ! तुम्ही येवढं आग्रहाच आमत्रण दिल्यावर न येऊन कस चालेल ?" आपली नी तिची पूर्वीची ओळख असल्याप्रमाणे ढोबळ म्हणाले. त्या स्त्रीने त्याचे त्याचे वडील म्हणून जे स्वागत केले होते त्यामुळे त्याना बराच धीर आला होता बोलता बोलता त्यानी त्या स्त्रीचे निरीक्षण करून घेतले.

ती स्त्री साधारण पन्नास वर्षाची असावी तिच्या कपाळावर कुकू नव्हते, पण एकदोन खोल सुरकुत्या मात्र होत्या. डोक्यावरचे केस थोडेसे पिकले होते. पुढले दोन दात पडलेले दिसत होते चालताना ती वाके, नाहीतर अगदी सुशीलाबाईच ! ढोबळाना वाटले, वयाचा फरक सोडून दिला तर किती साम्य आहे मायलेकीत ! त्याना आपल्या व आपल्या वडिलाच्या रूपातील साम्याची आठवण झाली तिच्याकडे थोडा वेळ पाहिल्यावर त्याना राहून राहून वाटू लागले—आपण ह्या स्त्रीला कुठतरी पाहिल आहे ! पण कुठ ते काही त्याना नक्की आठवेना. कदाचित् पूर्वी ती कधी आपल्या वडिलाकडे आली असता तिला पाहिलेले आपणाला ओझरते स्मरत असावे, किंवा मायलेकीत खूपच साम्य आहे म्हणून आपणाला तसा भास होत असेल, अशी त्यानी मग मनाची समजूत घातली.

" ओळख ठेवली आहे म्हणायची अजून ? " त्या म्हातारीने प्रश्न केला.

" वा ! आपली ओळख मी कशी विसरेन ? "

" खरच ? "

" खरच म्हणजे ! खोट का सांगतो आहे मी ? " ढोबळ ठोकून देत होते नी संभाषण न गांगरता चालू ठेवीत होते आपण करीत असलेल्या बतावणीवर ते खूष झाले होते

" नाही दहा पधरा वर्षात एक बोटभर चिठ्ठीसुद्धा धाडली नाही म्हणून म्हटल. " म्हातारी म्हणाली.

" पत्र लिहिली तरच आठवण राहते अस थोडच आहे ? " ढोबळ मोघम म्हणाले

" होय ना ? " डोळ्याच्या कोपऱ्यातून पाहात आई म्हणाली, " म्हणजे पूर्वीची वचन आपल्या लक्षात आहेत तर अजून ? मला वाटलच होत तुम्ही विसरणाऱ्यापैकी नाहीत म्हणून "

ढोबळानी नुसता 'हु'कार दिला ही वचन कसली आणखी ? हे आणखी काय नवीनच प्रकरण उद्भवू पाहात आहे ?

" आठवत का तुम्हाला ? तेव्हा तुम्ही कालिजात होता नी आपली बागेत भेट झाली होती ? "

" हो आठवत की "

" नी आपण एकदा जोडीन सिनेमाला गेलो होतो ? "

" हु "

" नी ती तुमची पत्र ? खरच, किती सुदर लिहिता तुम्ही पत्र ! "

" पण तुमच्याइतकी नाही काही ! "

" वा वा ! मी बाई कधी लिहिली पत्र तुम्हाला ? " आईच्या आवाजात जरासा मिस्किलपणा असल्याचा ढोबळाना भास झाला. काहीतरी चुकते आहे असे त्याना वाटू लागले. पण तेहि काही कमी नव्हते. लगेच

स्वतःला सावरून घेऊन ते म्हणाले, “अहो, म्हणूनच तर म्हटल तुमची पत्रं फारच सुदर होती म्हणून ! उत्तराच्या आशेन आम्ही आपली पत्र लिहावीं पण त्याला कधी उत्तर म्हणून नाही ! ” येवढ बोलून ते मोठ्याने हसले

“ इश्श ! ” मान वेळावून आई म्हणाली, “ नी हे काय बाई नवीनच ? ”

“ काय ? ” ढोबळानी विचारले पण त्या वेळी आईचा तो नवरा पाहून त्याच्या मनात विचार आला—नवरा सुशीलाबाईला शोभतो म्हणून काही तो ह्या तिच्या म्हाताऱ्या आईला शोभत नाही

“ मला ‘ अहो-जाहो ’ काय करायच ते ? ”

“ तुम्ही आपल तू आता मोठी झालीस ना ? ” लगेच सावरून ढोबळ म्हणाले

“ पण तुम्हीहि नाही का मोठे झाला ? तोंडात तर आता एकहि दात शिल्लक राहिला नाही ! खरच, तुमचे दात किती हो सुन्दर होते !”

“ हं ! ” एक सुस्कारा सोडून ढोबळ म्हणाले, “ चालायचच वयो-मानाप्रमाण ! तुमच्याहि आपल तुझ्याहि चेहऱ्यावर सुरकुत्या नाही का पडल्या आता ? नाहीतर तुझा चेहरा किती सुदर दिसायचा पूर्वी ! चालायचच ! काळाचा परिणाम शरीरावर व्हायचाच ”

“ हो पण मनावर नाही माझ शरीर आता वृद्ध दिसत असल तरी मन अजून पूर्वीसारख आहे बर का ! तुमचे सर्व दात पडले असले तरी माझ्या मनाला तुमची ओढ अजून पूर्वीसारखीच आहे ”

ढोबळ स्वस्थ राहिले त्याच्या त्वचेतन घर्मबिंदु बाहेर पडू लागले होते.

“ शरीरान मी दुसऱ्याची झाले, पण लहानपणी माझ मन जे मीं तुम्हाला अर्पण केल त्यावर अजून तुमचाच हक्क आहे ” आई म्हणाली.

ढोबळानी जरी वरपागी काही हालचाल केली नाही, तरी ह्या शब्दानी त्याच्या मनाला मोठाच धक्का बसला होता ! हा प्रकार आणखी किती वाढत जाणार, त्याना काहीच कल्पना करता येईना ! विषयांतर करण्यासाठी ते म्हणाले,—

" ह जेवण झाल का तयार ? "

" काय तरी बाई विचित्रपणा ! " जराशा फणकाऱ्याने आई म्हणाली, " इतक्या वर्षांनी भेट झाली, मी इतकी जीव तोडून बोलते तरी ह्याना आपली जेवणाची काळजी ! ढोबळ, खर सागू ? तुम्हाला पाहून तर मी तहानभूकसुद्धा विसरून गेले आहे तुमच्याशी किती बोलू नी काय बोलू, अस झालयू मला "

" मलाहि तसच झालयू ! " ढोबळ द्व्यर्थी म्हणाले, " पण काय बोलाव हेच सुचत नाही म्हटल, पोट भरल्यावर काही सुचत का पाहाव. शिवाय तुझ्या हातच जेवायला मन कस अधीर झालयू अगदी "

" समजतो म्हटल हा लाघवीपणा ! " कटाक्ष टाकून आई म्हणाली.

" नाही, खरच सागतो " दुसरीकडे पाहात कसबस ढोबळ म्हणाले. त्या म्हातारीच्या नाचरेपणाची त्याना आता शिसारी येऊ लागली होती. " तुझ्या हातच जेवण फार आवडत मला "

" म्हणूनच वाटत पुनर्विवाहाच वचन देऊन नतर इतकी वर्षं तोड नाही दाखवल ? "

हे वाक्य ऐकून आपण बसलेल्या खुर्चीखाली बॉम्बचा स्फोट व्हावा तसे ढोबळ दचकले. ते म्हणाले, " काय ! पुनर्विवाह ? तुझ्याशी अ मग तुमची तुझी सुशीलाबाई काय म्हणेल ? माझा खडेराव काय म्हणेल ? समाज काय म्हणेल ? भावनेच्या भरात त्या वेळी मी काहीहि वचन दिलेल असेल, पण आता मी नक्की सागतो, की मी पुनर्विवाहाच्या पूर्ण विरुद्ध आहे."

ढोबळाना सुशीलाबाईशी पुनर्विवाह करावयाचा होता–तिच्या म्हाताऱ्या आईशी नव्हे !

" पाहा बर ! नीट विचार करा. " कातर स्वरात आई म्हणाली.

" नीट विचार करूनच बोलतो आहे मी ! "

" मग पूर्वीच्या त्या आणाभाका, वचनं सार सार खोट तर ? "

ढोबळाना काय बोलावे तें सुचेना. आपल्या वडिलाविषयीं व त्याच्या चारित्र्याविषयीं त्याच्या मनात गाढ आदर होता. त्यानीं अशी भानगड

करून ठेवलेली असेल अशी ढोबळाना कधी शकाहि आली नव्हती. त्याना वाटले—छट्, आपल्या वडिलानी अस काही केलेल असण शक्य नाही. पण मग लगेच त्याना वाटे, माणसाच काय सागाव ? सतानादेखील इतिहास असतो ! थोडासा विचार करून ते म्हणाले, " अग, ती वचन सर्व खरी. पण ह्या अशा वयात मी धर्माच्या विरुद्ध वर्तन करू ? माझे पितर स्वर्गातून माझ्या अगावर थुकतील ! "

" पुनर्विवाहाच्या इतके विरुद्ध आहा तुम्ही ? "

" हो "

" मग झाल तर ! सपला माझ्या आयुष्याचा कारभार ! ज्या आशेवर मी इतकी वर्ष काढली ती आशाच अशी धुळीला मिळाली हायरे देवा ! किती हो निष्ठुर आहा तुम्ही ! " असे म्हणून पदराने डोळे पुशीत ती एकदम खुर्चीत कोसळली

ढोबळानी क्षण दोन क्षण विचार केला आपल्या बोलण्यातली चूक त्याच्या लक्षात आली आपले वडील—ज्याच सोग आपण घेतलं आहे—पुनर्विवाहाच्या विरुद्ध आहेत असे सागितल्यावर सुशीलाबाईशी आपला पुनर्विवाह होण्याच्या मार्गातहि अडथळे येणार ! चारपाच दिवसात आपण आपल सोग सोडून देणार, मग ह्या म्हातारीला उगाच कशाला दुखवा ? त्यापेक्षा प्रेमाच नाटक करून तिला झुलवलेल काय वाईट ?

" अग, मी थट्टा केली तुझी " असे म्हणत ते हळूहळू तिच्याजवळ गेले सर्व धैर्य एकवटून त्यानी तिला जवळ ओढले

रात्री जेवण झाल्यावर दोघेहि ब्लॅकऔटमध्ये फिरावयास गेली.

दुपारी आपणाला एका सकटातून ऐन वेळी वाचवणाऱ्या आपल्या वडिलाविषयीच्या प्रेमाने ढोबळाचा ऊर भरून आला होता, आणि आता त्या म्हातारीला वाटेल ती वचने देऊन ठेवणाऱ्या आपल्या पित्याचा त्याना अतिशय राग आला. पण करणार काय ?

**त्यानतर रोज रात्रीं त्या म्हातारीबरोबर फिरावयास जायचें व तिच्याबरोबर स्वतःच्या इच्छेविरुद्ध नाना तऱ्हेचे प्रेमाचे चाळे करायचे, हा त्याचा**

कार्यक्रमच ठरून गेला. त्यातल्या त्यात समाधानाची गोष्ट एवढीच होती, की ते जेव्हा जेव्हा तिच्या घरी जात, तेव्हा सुशीलाबाई घरी नसे. ती सीरियस केसवर कुल्यांला गेलेली असे. नाहीतर तिच्यापुढे त्याचे सोग उघडकीस येण्याचा बराच सभव होता. रोज रात्री झोपताना जेव्हा ते प्रार्थना करीत " देवा, माझी दाताची कवळी लवकर तयार होऊ दे ! " त्या वेळी त्या सीरियस केसशी त्यांचे काही सोयरसुतक नसतानादेखील ते त्या प्रार्थनेला पुरवणी जोडीत, " निदान माझी कवळी तयार होईपर्यंत तरी त्या रोग्याला जीवदान दे ! " देवानेहि जणू त्याची ती प्रार्थना ऐकली आणि ते एका सकटातन बचावले

अखेरीस सहा दिवसानतर त्याची नवी कवळी तयार होऊन आली तेव्हा त्याचा आनद गगनात मावेना ते सहा दिवस त्यानी कसे काढले होते ते तेच एक जाणे ! त्याना वाटे, हे दिवस कधी सपणार नाहीत काय ? आपली दाताची कवळी कधी तयार होणारच नाही काय ? आपल्या कै. वा. तीर्थरूपाचे—त्याना आता तीर्थरूप तरी कस म्हणाव ?—प्रेमाचे ऋण फेडताना होणारी विटबना पुढील सुखावर आशा ठेवून त्यानी एखाद्या हुतात्म्याप्रमाणे सहन केली होती ते सहा दिवस आता त्याना एखाद्या भयानक स्वप्नाप्रमाणे वाटू लागले होते ती कवळी तोंडात बसवून ते किती तरी वेळ आरशात पहात राहिले नी मग त्यानी एक समाधानाचा सुस्कारा टाकला आता त्याना सुशीलाबाईच्या आईची—त्या थेरडीची काय भीति ? ती कवळी म्हणजे त्याना तिच्या प्रेमाच्या माऱ्यापासून सरक्षण करणारी तटबदीच वाटली ते आता परत पूर्वीसारखे तरुण डॉ ढोबळ दिसू लागले होते. कायाकल्प करून तारुण्यप्राप्ति होते म्हणतात किंवा निरनिराळ्या जडीबुटी बुढ्ढ्याला चोवीस तासात जवानी करून देतात असे आपण जाहिरातीत वाचतो ते खरे की खोटे कुणास ठाऊक, पण ती कवळी ढोबळाना क्षणार्धात तरुण बनवीत असे एवढे मात्र खरे कवळी तयार झाल्यावर त्यानी सुशीलाबाईना " डॉ. ढोबळ गावाहून आले आहेत " असा निरोप पाठवला आणि ते तिची वाट पहात बसले साधारण अधार पडल्यावर दरवाजावर त्याची ओळखीची टिकूटिक् ऐकू आली. त्यानी मोठ्या आशेनें दार उघडलें, पण त्याची मोठीच निराशा झाली !

पहातात तो दरवाजात सुशीलाबाईऐवजीं म्हातारीच उभी !

तिला पाहाताच कवळी मिळाल्यामुळे त्याना जो आनद झाला होता तो निम्मा कमी झाला. त्यानी आपण तिला ओळखत नाही अशा चेहऱ्याने प्रश्न केला,

" कोण पाहिजे ? "

" तुम्हीच ! " छत्री कोपऱ्यात ठेवून ती म्हणाली.

" म्हणजे कोण ? " गोंधळून ढोबळानी विचारले.

" हे काय बाई विचारण ! तुम्ही म्हणजे तुम्हीच—श्रीयुत ढोबळ—डॉक्टर ढोबळाचे वडील ! " नतर ती त्याच्या चेहऱ्याकडे निरखून पाहून म्हणाली, " वा ! नवे दात बसवले वाटत ? किती सुदर दिसतात हो दात तुम्हाला ! मी सागणारच होते तुम्हाला खोटे दात वापरा म्हणून ! "

असा काही प्रकार होईल ह्याची ढोबळाना कल्पनाच आली नव्हती दाताची कवळी लावली की आपण डॉ ढोबळ होऊ, कुणाला दुसरा काही सशय येणार नाही असा आपला त्याचा सीधासरळ हिशोब होता. तिच्या बोलण्याचा पहिला धक्का ओसरताच स्वतःला सावरून घेऊन ते म्हणाले, " आपण चुकता आहात. मी डॉक्टर ढोबळ आहे. ढोबळाच मुलगा—खडेराव ! "

" खरच ! " आश्चर्याने पाहात म्हातारी म्हणाली, " मग ढोबळ कुठ गेले ? "

" ते गेले गावाला. "

" काहीतरीच ! मला न सागता कसे जातील ते ? "

" गेले खरे. मी गावाहून आलो नी ते गेले. "

" खर सागता हे ? "

" देवाशपथ खर ! "

" अरे देवा ! " कपाळावर हात मारून घेऊन ती म्हातारी एकदम एका खुर्चीवर मटकन् बसली. "मग आता माझ कस होणार ? इतक्या वर्षांनीं

भेट झालेली ! मला वाटल होत, निदान आता तरी मला ते फसवून जाणार नाहीत ”

नतर बराच वेळ झाला तरी तिच्या तोडून काहीच शब्द बाहेर पडला नाही. मान वाकडी टाकून ती खुर्चीत निश्चेष्ट पडून राहिली

सहा दिवसापूर्वी ती मूर्छित होऊन पडलेल्या प्रसगाची ढोबळाना आठवण झाली आणि त्याच्या शरीरातून एक शिरशिरी निघून गेली काही झाल तरी त्या प्रसगाची पुनरावृत्ति आज होऊ द्यायची नाही असा त्यानी निश्चय केला ! त्यानी एकदा आपला हात आपल्या तोडाकडे नेला, तिथे कवळी असल्याची खात्री झाल्यावर त्याना बरेच धैर्य आले

बराच वेळ झाला तरी म्हातारी काही हालचाल करीना डॉक्टरानी थोडेसे पाणी आणून तिच्या डोळ्याना लावले आणि जेव्हा तेवढ्यानेहि काम होईना, तेव्हा जराशा रागानेच बरेचसे पाणी घेऊन त्यानी तिच्या सुरकुतलेल्याा चेहऱ्यावर जोराने शिपडले तिचा चेहरा पाण्याने भिजून चिब झाला. नतर त्यानाच तिची कीव आली एका रुमालाने ते पाणी ते पुसून काढू लागले आणि मग त्याना जे दिसले त्यामुळ तर ते स्तभितच झाले ! जोराने मारलेल्या त्या पाण्याने तिच्या तोडावरील सुरकुत्या पार धुऊन निघाल्या होत्या !

“ कोण ? सुशीलाबाई ! ” ढोबळ आश्चर्याने उद्गारले. सुशीलाबाई आपले मिस्किल डोळे किलकिले करून त्याच्याकडे पाहून हसत होत्या

“ म्हणजे इतके दिवस माझी फसवणूकच केली म्हणायची तुम्ही ? ” ढोबळानी विचारले

“ आणि तुम्ही नाही का मला फसवण्याचा प्रयत्न केला ? प्रथम जरी मी फसले तरी थोड्याच वेळात तुमच बिंग फुटल ! ”

“ ते कस ? ”

“ त्या दिवशी मी इथून घरी जायला निघाले तो गणू मला बाहेरच भेटला. मीं त्याला विचारल, ‘ काय रे, डॉक्टराचे वडील आले आहेत का ?’ तर तो मोठ्यान हसायलाच लागला. त्याला ती थट्टाच वाटली. मग तो म्हणाला,

'साह्यबाच बापूस तर कधीच गुदरल !' आणि तेव्हाच तुमचा डाव माझ्या लक्षात आला मग म्हटल आपणहि गमत करू या !"

"आणि हे म्हातारीच सोग घ्यायला कुठ शिकलीस ?" ढोबळानीं सुशीलाबाईंना नकळत एकवचनात सबोधून विचारले

"वा ! माग आम्ही नर्सेसनी एक नाटक नव्हत का केल ? त्यात मी एका म्हातारीच काम केल होत ना !"

"ह तरीच ! मला सारख वाटे, आपण ह्या म्हातारीला कुठतरी पाह्यल आहे म्हणून ! नी तुझ्या तोडावरील हे रगकाम दिवसाउजेडी माझ्या लक्षात येईल म्हणून रात्रीच्या ब्लॅक–आौटमध्येच तू मला भेटत होतीस वाटत ?"

ढोबळाना एकदम ते सहा दिवस आठवले म्हातारीशी केलेले ते प्रेमाचे चाळे त्या वेळी त्याना कितीहि जुलमाचे वाटले असले तरी ढोबळाना अवघड वाटणारा एक प्रश्न त्यानी आपसूकच सोडवला होता त्या दोघा-मधला परकेपणा त्या सहा दिवसानी पार नाहीसा करून टाकला होता आता ढोबळाना सुशीलाबाईकडे आपल प्रेम व्यक्त करून दाखविण्याची जरूर राहिली नव्हती ते सहा दिवस इतका वेळपर्यंत त्याना भयकर वाटत होते, पण तेच आता त्याना मोठे रमणीय वाटू लागले

"आता आपण लग्न करून टाकू या !" थोड्या वेळाने ढोबळ म्हणाले.

"पण तुम्ही तर पुनर्विवाहाच्या विरुद्ध आहात ना ?"

"होय" यत्नेन ढोबळ म्हणाले

"पाहा बर !" मोठा कमनीय भ्रूविभ्रम करून सुशीलाबाई म्हणाल्या, "मग मला परत घेरी येईल !"

"येईना का ! त्यावरच औषध मला चागलं माहीत आहे. आतापर्यंत ते द्यायला भीत होतो मी "

नतर ते तिच्याजवळ जाऊन म्हणाले, "आता द्यायला मुळीच हरकत नाही, नव्हे आधीच देऊन ठेवतो, मग चक्कर यायची भीतीच नाहीं !"

असे म्हणून त्यानीं तिच्या ओठात आपल्या ओठातून ते 'औषध' ओतावयास सुरवात केली. हा प्रसग आपणावर येऊ द्यायचा नाही, असा त्यानी थोड्याच वेळापूर्वी निश्चय केला होता. सहा दिवसापूर्वी अशा प्रसगीं त्याना एरडेलाची आठवण झाली होती. पण आता मात्र त्याना अमृत चाखत असल्याप्रमाणे वाटले.

नतर मग ह्या प्रसगाची आठवण म्हणून ढोबळानी सुशीलाबाईंचा म्हातारीच्या वेषातला फोटो काढून घेतला आणि तो आपल्या शय्यागृहात टागून ठेवला. त्याकडे पाहिलें की त्याना त्या सहा दिवसाची आठवण येते आणि त्याच्या मनाला विलक्षण गुदगुल्या होतात

# शि का र क था

भाऊरावाचा शिष्ठपणा तो हाच ! केव्हाहि पाहा, त्याचं आपलं, 'तेरी उप्पर ठेवलेलं मेरी' असायचंच कुणी आपला कसलाहि अनुभव सांगो, आपल्या अनुभवापुढे तो अनुभव अगदी काहींच नाहीं, असे ते दाखवीत, आणि मग आपला अनुभव सांगत. पण, निदान आज तरी भाऊरावांना शेखसाहेबांवर कुरघोडी करता येणार नाही, अशी आमची कल्पना होती. शेखसाहेब आपल्या शिकारीच्या रोमांचकारी कथा अगदीं रंगवून सांगत होते. तोंडापासून शेपटापर्यंत दहा फूट लांब असलेले ते भयंकर वाघ, ती निबिड अरण्यें, तो काळोख, त्याच्यावर वाघानें घेतलेली ती झेप, जीवनमरणाचा तो निर्णायक क्षण, त्याचें प्रसंगावधान व धैर्य व शेवटी त्याची अचूक निशाणबाजी ! शेखसाहेबांनी सांगितलेली एकएक शिकारकथा ऐकून आमच्या अंगावर कांटा उभा राहत होता. आमच्या चित्तवृत्ती थरारून जात होत्या. त्याच्याकडे विस्मयचकित दृष्टींनीं पहात आम्ही त्याच्या त्या चित्तथरारक गोष्टी एकतानतेनें ऐकत होतो.

पण भाऊरावाचा खाक्या मात्र निराळा होता. शेखसाहेबांच्या त्या रोमांचकारी गोष्टी ऐकून आमच्या छातींत धडधडत असतांना, भाऊराव त्या गोष्टीकडे अर्धवट दुर्लक्ष करून व चेहऱ्यावर तुच्छता दाखवून डाव्या हाताच्या ओंजळींत घेतलेली तंबाखू उजव्या हाताच्या आंगठ्यानें चुरीत बसले होते.— हं ! जणू काय, शेखसाहेब बिछान्यातला एकादा ढेकूण मारल्याचीच गोष्ट सांगत होते !

कितीतरी वेळ झाला, भाऊरावाची ही वागणूक मी पाहात होतों,

अखेरीस, त्याची ती तुच्छतेची वृत्ति मला असह्य झाली व मी त्याना म्हणालो, "काय भाऊराव, किती भयंकर अनुभव आलेत शेखसाहेबाना, नाही ?"

त्यावर भाऊरावानी काही उत्तर दिले नाही एखाद्या लहान मुलाने आपला एखादा छोटासा पराक्रम वर्णन केल्यावर आपण जसे किंचित् कौतुकाने हसतो, तसे ते एकदा हसले, आणि तंबाखूचा बोकणा त्यानी तोंडात भरला.

भाऊरावाचा मला राग आला दुसऱ्याचा कोणताहि मोठेपणा मान्य न करण्याच्या त्याच्या वृत्तीची मला चीड आली मी म्हणालो, "असे नुसते हसता काय ? काय एकएक प्रसंग आला होता शेखसाहेबांवर ! त्याच्या जागी जर तुम्ही असता तर"

पण मग मी वाक्य तेवढ्यावरच सोडले ते बोलता बोलता जी कल्पना माझ्या मनात आली होती, तिच्यामुळे मला अनावर हसू आले होते ती कल्पना लक्षात येताच इतर मंडळीहि भाऊरावाकडे कुचेष्टेच्या दृष्टीने पहात हसू लागली.

आता मात्र भाऊरावाचा चेहरा गंभीर झाला आमच्या आव्हानाचा स्वीकार करण्याची ते तयारी करीत असावेत. खिडकीशी जाऊन दोन बोटामधून मुखरसाची एक पिचकारी मारून ते आपल्या जागेवर शांतपणाने येऊन बसले आमच्या कुचेष्टेने आपल्या मनाची शांति तिळमात्रहि ढळली नाही, असे दाखविण्याचा ते प्रयत्न करीत होते आपल्या उपरण्याने अगदी सावकाशपणे आपल्या झुलपी मिशा पुसून मग ते म्हणाले,

"अरे काय उगाच फुशारक्या मारता शिकारीच्या !—म्हणे शिकारी ! झाडाच्या फांदीवर उंच ठिकाणी माचन बांधून त्यावर सुरक्षित बसायच, खाली एखाद बकरू बांधून ठेवायच, सतराशे हाक्यानी रान उठवून जनावर हाकत हाकत अगदी बंदुकीच्या तोंडाशी आणून उभ करायच आणि मग साहेबबहादुरानी शिकार करायची—म्हणजे काय ? तर बंदुकीचा घोडा दाबायचा ! म्हणे शिकार ! खरच, ह्या शिकारी पाहून साहेबाच्या मडमा फोटोग्राफी करतात, त्याची मला आठवण येते. कुणीतरी त्याना कॅमेऱ्यात

फिल्म भरून द्यायची, फोटोग्राफरन ती फिल्म धुऊन काढायची, नतर त्यानच फोटोहि छापून द्यायचे ! मेमसाब करणार काय, तर फक्त कॅमेऱ्याच बटन दाबणार ! आणि ही म्हणे मेम-साहेबाची फोटोग्राफी ! ह्या साहेबाच्या शिकारीचा प्रकारहि ह्याचपैकी ! नाही तर आमचे खरे शिकारी पहा छत्रपति सभाजीमहाराज ! भर अरण्यात वाघसिंहासमोर एकटे उभे ठाकत, मग त्या दोघाच युद्ध होई ! ही खरी मर्दाची शिकार ! हू ! नाही तर ही शेखसाहेबाची शिकार !"

" त्या सभाजी महाराजाच्या गोष्टी राहू द्या हो !" भाऊरावाच्या ह्या शिष्ठपणाने चिडून जोशीबुवा म्हणाले, " तुम्ही स्वत. काय पराक्रम केलेत ते सागा ना ? कधी वाघ तरी पाह्यलाय् का ?"

" हो, पाह्यलाय् की त्यानी !" बाबूराव मध्येच छद्मीपणाने म्हणाले, " गेल्या वर्षी ' ग्रॅड इडियन सर्कस ' आली होती, तेव्हा पाह्यलाय् तुम्ही वाघ, नाही का हो भाऊराव ?"

बाबूरावानी भाऊरावाना चागलाच टोला हाणला, ह्या आनदात आम्ही मोठमोठ्याने हसलो आमचे हसून झाल्यावर भाऊराव शातपणाने म्हणाले, " हो, त्या सर्कशीत तर मी वाघ पाहिलाच आहे—नाही कशाला म्हणू ? पण एकदा जगलात माझी आणि वनराजाची समोरासमोर गाठ पडली आहे–आणि मी त्याला मारला आहे !"

त्याचे हे शब्द ऐकून आमची हसता हसता मुरकुडी वळली भाऊ-रावासारखा तुदीलतनु, नियमाने स्नानसध्या करणारा, आखूड पचा नेसणारा आणि बिनकॉलरचे कुडते घालणारा ब्राह्मण जेव्हा आपण वाघ मारला आहे, असे गभीरपणाने सागतो, तेव्हा तो प्रसग विनोदीच नव्हे काय ?

" वा ? वा ? भाऊराव, पण तुम्हाला बदुकीचा नेम कसा धरतात, हे तरी माहीत आहे का ?" शेखसाहेबानी विचारले.

" मुळीच नाही !" भाऊराव म्हणाले, " बदुक मी कधी हातात देखील धरली नाही —पण वाघ मारायला बदुक काय करायचीय् ?"

" हो ! तुम्ही अगदी बलभीमच की नाही ! एखाद्या काकडीप्रमाण

तुम्ही वाघाला दोन्ही हातात धरलं असेल, नि त्याचे दोन तुकडे करून ते दोन बाजूना फेकून, तुम्ही पुढें चालू लागले असाल, नाही ? " मी म्हणालों.

" अगदीं तसच काहीं नाहीं ! पण वाघ मारायला मला गुलेल पुरते. वाघ मारायला बदुकीची काही जरूरी आहे अस मला वाटत नाही " भाऊराव म्हणाले.

" भाऊराव, ह्या गुलेलीबिलेलीच्या थापा मात्र नका मारू ! " जोशीबुवा म्हणाले, " एक वेळ तुम्ही आपल्या शापान वाघाच भस्म केल, अशी थाप मारली तर आम्ही त्याच्यावर विश्वास ठेवू "

" हो. आणि त्या वाघाच भस्मच झाल ! " जोशीबुवाना मध्येंच अडवून भाऊराव म्हणाले

आता मात्र कमाल झाली भाऊरावाची ! त्याना चिडविण्याकरिता आम्हीं त्याना इतके टोचून बोलत होतो, पण त्यानी मात्र आपल्या मनाची शाति बिलकूल ढळू न देता, आमच्या प्रश्नाची उत्तरे गभीरपणाने देण्याचे चालूच ठेवले होते.

" गुलेलीन वाघाची शिकार ! हा हा ? " विकट हास्य करून शेखसाहेब म्हणाले, " बोलो, भाऊराव, सागाच तुमच्या ह्या अजब शिकारीची हकीकत ! "

भाऊरावाचे डोळे थोडेसे लुकलुकले. आम्ही त्याची टिंगल करीत असलो, तरी त्याची गोष्ट ऐकण्यासहि आम्ही उत्सुक आहोत, हे त्यानी ओळखलें होते. किचितशा विजयोन्मादाने त्यानी एकदा आम्हा सर्वावरून दृष्टि फिरवली आणि ते आपली अद्भुत शिकारकथा सागू लागले.

वीस एक वर्षापूर्वीची गोष्ट. त्या वेळी मी कारवारजवळ बिणगीला कस्टम क्लार्क होतो, हे तुम्हाला माहीतच आहे. बिणगी हें एक लहानस खेडच आहे. समुद्र—किनाऱ्यापासून थोड्याशाच अतरावर माझ घर होत. नारळीपोफळीच्या उच उच झाडानी, आणि आबे, फणस, जाभूळ ह्याच्या पल्लवयुक्त घनदाट वृक्षानी तें घर वेष्टिलेल होत. समोरच तो अर्धचद्राकृति समुद्रकिनारा होता. भरतीच्या वेळी मोठमोठ्या लाटा येऊन

किनाऱ्यावरील प्रचंड शिलाखंडावर टक्कर घेत आणि मग उंच उडालेल्या तुषाराची शोभा काही अवर्णनीय असे समोर पसरलेल्या अथांग नील सागराकडे पाहाण्यात माझे तासचे तास निघून जात आमची ही, मी व बव्या अशी आम्ही तिघच त्या घरात राहात होतो आमच आयुष्य कस शांततेत आणि सुखासमाधानात जात होत

कारवारपासून बिणगी दोनतीन मैलावरच आहे. पण ह्या दोन गावामध्यें एक मोठा डोंगर आहे, व त्यामुळ बिणगीहून कारवारला जायच यायच असल म्हणजे, डोंगराच्या कडेन वळणावळणान जाणाऱ्या मोठ्या रस्त्यान जाव लागे, व मग दहाबारा मैलाचा फेरा पडे हा फेरा चुकविण्याकरिता डोंगरातून पाऊलवाटीचा एक छोटासा घाट आहे. ह्या घाटातील रस्ता दोनतीन मैलाचाच आहे पण ह्या घाटाची चढण अतिशय अवघड आहे. त्यातून हा घाट घनदाट जंगलातून गेलेला आहे भर दुपारीदेखील तिथं सूर्यकिरणाचा शिरकाव होत नाही. अनेक जंगली जनावरही ह्या घाटातून हरहमेश भेटतात हा घाट अगदीच निर्जन आणि भयाण आहे ह्या घाटात भूतपिशाच्चहि असल्याची वदता होती तसाच खबीर मनाचा नि धडधाकट माणूस असल्याशिवाय ह्या घाटातून दिवसादेखील एकट जाण्याचा कुणाला धीर होत नसे मग रात्रीची गोष्ट कशाला!

मला कारवारला वरचेवर जाव लागे, आणि मोठ्या रस्त्यान पडणारा फेरा टळावा म्हणून मी बहुधा या घाटातूनच येत जात असे अगदीच रात्र झाली, तर मात्र नाइलाज म्हणून मला मोठ्या रस्त्यान जाव लागे. त्या वेळी मी ऐन तारुण्यात होतो. माझ्या शरीरातील एक एक स्नायु त्या वेळीं दगडासारखा टणक होता. अंगात तारुण्याची गुर्मीहि होती घाटात वाघबीघ भेटण्याची भीति असल्यामुळ घाटातून प्रवास न करण्याविषयी कित्येकानी मला सूचना देऊन पाहिल्या होत्या, पण मी तिकडे दुर्लक्षच करीत होतों. तो घाट मी अर्ध्या पाऊण तासात पार पाडू शकत होतो. मोठ्या रस्त्यान दोन अडीच तास घालविण माझ्या जीवावर येई.

एक दिवस दुपारचा काहीं कामाकरिता मीं कारवारला गेलो होतों. ऑफिसच काम उरकेपर्यंत सध्याकाळ झाली. नतर मला काहीं सामानसुमान

खरेदी करायचं होतं, ते बाजारात जाऊन खरेदी करीपर्यंत सूर्यानं समुद्रात बुडीदेखील मारली होती एका पिशवीत खरेदी केलेलं सामान घालून व ती खांद्यावर टाकून, बिणगीला जाण्याकरिता कोणी सोबत मिळते का, हे पाहण्या-करिता मी बाजरात फिरू लागलो त्या दिवशी मला चतुर्थी होती, व चंद्रो-दयाला जेवायला बसणं मला भाग होतं म्हणजे मला तासा दीड तासात घरी जाऊन पोचणं आवश्यक होतं आता मी घाटातून गेलो तरच मला वेळेवर घरी जाऊन पोचणं शक्य होतं घाटातून बिणगीला माझ्याबरोबर कुणी येतो का ह्याची मी पुष्कळ चौकशी केली, पण त्या तशा वेळी घाटातून प्रवास करण्यास कोणी तयार होईना त्यातील एकदोघांनी तर घाटातूनच दुपारीच येताना एक वाघ पाहिला होता घाटापासून थोड्याच अंतरावर एका जाळीत तो विश्रांति घेत पडला होता प्राण गेला तरी कुणाची माझ्याबरोबर यायची तयारी नव्हती. त्यांनी सांगितल्या ह्या वाघाच्या हकी-कतीत पुष्कळच तथ्यांश असावा, असं मलाहि वाटलं कारण, मी दुपारी येताना वाघानं रात्रीच मारून ठेवलेल्या शिकारीची दुर्गंधी माझ्या नाकाला जाणवली होती

कुणी सोबत मिळाली नाही तरी आता मला एकट्यालाच घाटातून प्रवास करणं भाग होतं. एखाद्या यःकश्चित् वाघाच्या भीतीनं मी माझा इतक्या वर्षांचा नियम मोडायला तयार नव्हतो शिवाय आतापर्यंत दोनतीनदा रात्रीचाहि मी त्या घाटातून सुखरूपपणे प्रवास केलेला होता

मी घाटाच्या रस्त्याच्या दिशेनं वळलो इतक्यात एका दुकानात विकण्याकरता टांगून ठेवलेल्या गुलेलीकडे माझं लक्ष गेलं मला बड्याची आठवण झाली. म्हटलं घेऊन जाऊ या त्याच्याकरता एक गुलेल—खेळेल बेटा. असा विचार करून मी एक चांगलीशी गुलेल विकत घेतली, आणि ती पिशवीत घालून घाटाच्या रस्त्याला लागलो

घाटाची चढण एक फर्लांगभर मी चढून गेलो असेन, एकदम मध्य-रात्र झाल्याचा मला भास झाला डोक्यावर वृक्षांच्या दाट पालवीनं जणू छतच घातलं होतं. त्यामध्यें कुठे क्वचित् एखादा झरोका असे, आणि त्यातून एखादी तारका लुकलुकताना दिसे. अंधार 'मी' म्हणत होता. डोळ्यात कुणी

बोट घातल असत तरी समजल नसत कुठ मध्येच जमिनीवर पडलेल्या पाचोळ्यात सळसळ होई झाडाच्या फांदीवर बसलेला एखादा पक्षी मध्येच आपल्या पखाची फडफड करी काही अस्पष्टशा सावल्या उगाचच इकडून तिकडे पळाल्याचा भास होई वन्य श्वापदाचे हृदय भेदून जाणारे चीत्कारहि मधून-मधून कानावर पडत हातातील विजेच्या दिव्याच्या प्रकाशात घाटाची चढण मी झहझप चढून जात होतो आजूबाजूला पाहण्याचा मला धीर होत नव्हता. जवळपास कुठ एखादा आवाज झाला की छातीत धडकीच भरे, आणि मग मी माझा वेग आणखीनच वाढवी एकदा वाटल, परत फिराव. पण आता त्यातहि अर्थ नव्हता घाटाचा माथा आता फारसा लाब राहिलेला नव्हता. एकदा तो ओलाडून उतरणीला लागलो की, मग फारशी भीति नव्हती. तोडान रामनाम पुटपुटत आणि जानव्याची ब्रह्मगाठ प्रसग पडला तर चटकन् हातात यावी म्हणून कानावर ठेवून मी तो भयाण रस्ता आक्रमीत होतो

साधारण घाटमाथ्याजवळ मी आलो असेन दुपारी आलेली दुर्गंधि एकदम खपकन् माझ्या नाकात शिरली मी उपरण नाकाला लावल, व माझा चालण्याचा वेग आणखी वाढवला

इतक्यात जगलात एकाएकी कोलाहल माजला 'ची ची' करीत माकड ओरडू लागली त्यानी ह्या फांदीवरून त्या फांदीवर मारलेल्या उड्यानी फांद्या झिगल्याप्रमाण खाली-वर होऊ लागल्या वन्य श्वापद माझ्या पायाजवळून जीव घेऊन पळू लागली. ह्या खळबळीचा अर्थ क्षणार्धात माझ्या लक्षात आला, आणि माझे हातपाय लटपटू लागले —

वनराजची स्वारी येत होती !

मला घरची आठवण झाली. माझी बायको—माझा बच्चा—माझ्या पश्चात् त्याच कस होईल ? परमेश्वरा, त्याचा साभाळ कर—

परमेश्वराची मी अशी करुणा भाकीत असताना कानाचे पडदे आरपार भेदून जाणारी एक डरकाळी माझ्या कानातून थेट माझ्या हृदयात शिरली. डोगरात उठलेल्या त्या डरकाळीच्या प्रतिध्वनीनी माझ्या हृदयात धरणीकप झाला. मला वाटल— प्रलयकाल जवळ आला—

पण धीर सोडून उपयोग नव्हता रामाचं नाव घेत मी आपला मार्ग आक्रमीत होतों. दहापाच पावलंच मीं टाकली असतील, वाघाची गुरगुर माझ्या कानावर आली

विजेच्या बत्तीच्या प्रकाशावर झोत मीं त्या गुरगुरीच्या दिशेने टाकला. साक्षात् कृतांतकाळच असा तो अवाढव्य वाघ शेपटी फटकावीत, आपल्या खदिरांगारासारख्या लाललाल डोळ्यांनी माझ्याकडे रोखून पाहात होता

काय करावं हे मला सुचेना येवढा भला मोठा वाघ माझ्यासमोर उभा होता, आणि मी तर हा असा गरीब ब्राह्मण–त्यातून नि:शस्त्र !

मी काहीहि विचार करण्यापूर्वीच त्या वाघानं आणखी एक भयानक डरकाळी फोडली, आणि आपला विशाल जबडा वासून माझ्यावर झेप टाकण्याकरिता त्यानं पवित्रा घेतला.

कुठल्याहि शिकार–कथेतल्याप्रमाणे हा क्षण निर्वाणीचा होता –जीवन-मरणाचा होता. ह्या वेळी मला विचार करण्यास निमिषमात्र उशीर झाला असता, तर शेखसाहेब, आज ही गोष्ट सांगण्याकरिता मी जिवंत राहिलो नसतो !

कशी कुणास ठाऊक, पण एकाएकी बड्याकरिता घेतलेल्या गुलेलीची मला आठवण झाली पिशवीतून ती गुलेल क्षणार्धात काढून घेऊन मी ती पिशवी बाजूस टाकून दिली. विजेच्या बत्तीचा प्रकाश जमिनीवर टाकून त्या प्रकाशात जो दिसला तो दगड मी उचलून घेतला. बॅटरी तोंडात धरून तिच्या प्रकाशाचा झोत त्या वाघावर फेकला आणि त्या प्रकाशात चकाक-णाऱ्या त्या खदिरांगाराच्या दिशेनं गुलेलीनं त्या दगडाचा नेम धरून, आता तो वाघ झेप घेणार, इतक्यात मी तो दगड त्याच्यावर मारला.

वाघ डरकाळी मारीत होता. पण त्याची ती डरकाळी एकाएकी घुस-मटल्यासारखी झाली. काय प्रकार झाला आहे, हे मलाहि कळलं नाहीं. तो वाघ चिडून शेपटी आपटीत होता, आणि स्वतःभोवतीच गिरक्या घेत होता. जोरजोरानं ओरडण्याचा तो प्रयत्न करीत होता, पण त्याचा आवाजच फुटत नव्हता.

त्याची ही केविलवाणी स्थिति पाहून, मला जरा वाईट वाटल, आणि आश्चर्यान मी त्याच्याकडे पहातच राहिलो. अखेरीस, ह्याप्रमाण थोडा वेळ निरर्थक धडपड करून झाल्यावर वाघान पुन्हा माझ्यावर झेप घालण्याकरिता नेम धरला.—बापरे, विजेच्या बत्तीच्या प्रकाशात त्याचे डोळे म्हणजे साक्षात् यमाचेच डोळे वाटले मला ! पुन्हा आपला जबडा वासून तो माझ्यावर चाल करून येत होता

त्याच्या त्या वासलेल्या जबड्याकडे मी बिजलीच्या प्रकाशात पाहिल, आणि साऱ्या प्रकाराचा मला उलगडा झाला. मी मघा मारलेला तो पाढरा दगड नेमका त्याच्या वासलेल्या तोडातून जाऊन त्याच्या घशात अडकून बसला होता !

माझ्या ह्या पराक्रमान मला स्फुरण चढल क्षणार्धात त्या दगडा-सारखाच एक दगड उचलून घेऊन, मी पुन्हा तो त्या वाघाच्या जबड्यात नेम धरून मारला. दगडावर दगड आपटल्याचा ' खट्ट ' असा आवाज झाला क्षणमात्र वीज चमकावी तसा प्रकाश पडला, आणि वाघ एकदम अदृश्य झाला !

ह्या चमत्काराचं मला आश्चर्य वाटल. मृत्यूच ते येवढ मोठ अवजड वहान, एकाएकी नाहीस कस झाल, हेच मला कळेना मी डोळे चोळून नीट पाहिल, पण त्या वाघाचा कुठ मागमूसदेखील दिसत नव्हता. तो पळून तर खासच गेला नव्हता. माझ्या बॅटरीचा प्रकाश मी त्याच्यावर सारखा रोखून धरला होता त्याची कुठलीहि हालचाल माझ्या दृष्टीस पडल्यावाचून राहिली नसती. मग काय झाल त्या वाघाच ? हा काही भुताटकीचा प्रकार तर नाही ना, अशीदेखील मला शका येऊन गेली. !

तो उभा होता, त्या जागी जाऊन मी विजेचा प्रकाश टाकून पाहिल. तिथ मला अर्थातच तो वाघ दिसला नाही.

भाऊराव येवढ सागून थाबले. नतर शेखसाहेबाकडे पाहून ते छद्मी-पणान म्हणाले, “ त्या वाघाची तोडापासून शेपटापर्यंत लाबी किती होती, हे अर्थातच मला मोजता आल नाही.—शिवाय माझ्याजवळ त्या वेळीं फूटपट्टीहि नव्हती.

"पुन्हा एकदा त्या दयाघन घननीळाला भक्तिभावान वदन करून मीं घाटाचा रस्ता आक्रमू लागलो. मी घराच्या अगणात पाऊल टाकल, नि तेव्हा चद्राची कोर हलकेच क्षितिजावर येत होती"

"पण काय हो भाऊराव, ही तुमची भानगड काहीच कळली नाही!" मी म्हणालो, "तुमते दगडावर दगड आपटल्यान त्या वाघाच भस्म कस झाल?"

"हेच तर तुम्हा बदुकीन शिकार करणाऱ्याना कळत नाही!" भाऊराव म्हणाले, "अहो, ते दोन्ही दगड गारगोटीचे होते!"

# ऐतिहासिक कथा

मध्यरात्रीचा समय होता बाहेर अंधार मी म्हणत होता. रातकिड्यांची कर्णकटु किरकिर अविरत चालू होती मध्येच एखाद्या भालूचे ओरडणे कर्णरंध्रावर येऊन पडत होते रस्त्यावरून गस्त घालणाऱ्या शिपायाच्या नाला मारलेल्या वहाणांचा आवाजहि मधून मधून कानावर येऊन पडत होता नाहीतर, सारे विश्व कसे निःस्तब्ध होते! अशा वेळी गावाबाहेरील एका बंगलीच्या एका सुसज्ज दालनात एक सुमारे वीस बावीस वर्षे वयाची युवती अस्वस्थ चित्ताने येरझारा घालीत होती

वाचकहो, हीच आमच्या कथेची नायिका! तिची अंगकाठी सडपातळ असून, ती गौरवर्ण आहे तिचे डोळे टपोरे असून सध्या त्यांच्यात खिन्नतेची छटा स्पष्ट दिसून येत आहे तिचा केशकलाप काळाभोर असून तो विस्कटलेला आहे तिची नासिका चाफेकळीसारखी नाजुक आणि टोकाशी किंचित् बाकदार आहे तिचा सुकुमार मुखचंद्रमा अत्यंत सुंदर असून सध्या तो कसल्या तरी दुःखरूपी मेघांनी आच्छादलेला आहे!

त्या दालनात पश्चिमेच्या खिडकीजवळ एक लाकडी पलंग आहे. त्याच्यावर एक जाडजूड गादी असून, त्यावर दोन पराच्या उशा ठेवलेल्या आहेत. बिछान्यावर नोकराने व्यवस्थित ठेवलेल्या पांघरुणाची घडी अजून मोडलेली नाहीं. पलंगावरून सोडलेली मच्छरदाणीहि अजून गादीच्या खाली तशीच खोवलेली आहे ह्या दोन गोष्टीवरून मध्यरात्र झालेली असली तरी निद्रेचा विचार आपल्या कथानायिकेला अजून सुचलेला नाहीं, असा चाणाक्ष

वाचकाना तर्क करिता येईल. प्रिय वाचक, असे कुठले दुःख त्या सुकुमार युवतीच्या हृदयाला व्यथित करीत असेल बरे ?

थोडा वेळ त्या युवतीनें ह्याप्रमाणे त्या दालनात अस्वस्थ मनाने येरझारा घालून झाल्यावर, तिच्या नासिकेतून एक दु.खपूर्ण निश्वास बाहेर पडला तिने आपले दोन्ही हात एकमेकावर धरून ते घट्ट चोळले. आणि ' प्राणनाथ, असे कसे हो तुम्ही निष्ठुर झालात ? ' असा आर्त स्वरात एक प्रश्न विचारून, त्या पलगावरील मच्छरदाणी बाजूस सारून, त्यावरच्या गादीवर तिने आपली देहलता धाडकन् फेकून दिली तिने आपले सुकुमार तोंड एका उग्गीत खुपसले व नयनातील दुःखाश्रूनी ती उशी भिजवू लागली

प्रिय वाचक, त्या सुदर युवतीला दु.खसागरात लोटून देणारा हा कोण दुष्ट असावा बरे ? अरे दुष्टा, नीचा ! ( ही विशेषणे वाचकाला उद्देशून नाहीत !) ह्या निष्पाप युवतीला दुःखात लोटून तू जे पापाचे डोगर रचून ठेवले आहेत, ते तू आता कोठे फेडशील ? चला वाचक, ती युवती त्याप्रमाणे मनसोक्त रडून घेऊन आपला दुःखभार हलका करून घेत आहे, तोवर आपण जरा शेजारच्याच एका दालनात फेरफटका मारून येऊ या. व आपल्या नायिकेच्या दुःखाचा तेथे काही उलगडा होतो की काय हे पाहू या.

ह्या दुसऱ्या सुसज्ज दालनात एक किरकोळ अगकाठीचा युवक एका ढणढण जळणाऱ्या दिव्याच्या अंधुक प्रकाशात कोठले तरी भयकर कर्म करण्यात गढून गेलेला आहे. त्याचा भालप्रदेश विशाल असून त्याची नासिका सरळ आणि तरतरीत आहे. त्याच्या मस्तकावरील काळाभोर केशसभार स्क टून गेलेला आहे. त्याच्या तारवटलेल्या आरक्त डोळ्यात कसला तरी खून चढलेला दिसत आहे. त्याच्या हातात ज्याचें अग्र अणकुचीदार आहे, असे एक भयकर शस्त्र आहे, आणि सूर्यास्ताचा समय झाल्यापासून तो ते शस्त्र निर्दयपणाने अप्रतिहत चालवीत आहे. भगवान् सहस्ररश्मि अस्ताचलावर गेल्यापासून तो आतापर्यंत त्यानें त्या शस्त्राने तीन खून पाडले आहेत, आणि त्याचे ते क्रूर शस्त्र सारखे रक्ताचे पाट वाहवीत आहे. साऱ्या चराचर सृष्टीला विसरून आपले क्रूरकर्म पार पाडण्यात तो तल्लीन झाला आहे.

आतापर्यंत त्याने एका म्हाताऱ्याचा, एका अनाथ विधवेचा, व एका दरोडेखोराचा असे तीन खून पाडले आहेत. तरी पण त्याच्या आसुरी लालसेची अजून तृप्ति झालेली दिसत नाही. प्रिय वाचक, आपण जरा वेळ इथे ह्या पडद्याच्या आड लपू या, व तो युवक आणखी काय काय दुष्ट कृत्ये करतो, त्यावर नजर ठेवू या

तो पहा! त्याने एका निष्पाप कोमल अर्भकाचा आणखी एक खून पाडला! त्या अजाण बालकाने फोडलेल्या किंकाळ्या, प्रिय वाचक, तुम्हाला ऐकू आल्या ना? ती पहा, त्या अर्भकाची असहाय माता! ती टाहो फोडून आपल्या अपत्याच्या मृत्यूबद्दल शोक करीत आहे. तिचा तो शोक ऐकून कोणाचेही हृदय विदीर्ण होईल. परतु आमच्या खलनायकाला त्याचे काय? त्याच्या डोळ्यावर कैफ चढलेला आहे, आणि त्याच्या चेहऱ्यावर राक्षसी आनद खेळतो आहे!

कचेरीत एकाचा ठोका पडला, तरी पण त्या दुष्ट युवकाची बलात्कार, पळवापळवी, दरोडे, खून अशी अधम कृत्ये चालूच आहेत जरासुद्धा विश्राति न घेता आपल्या हातातील शस्त्र तो अविरतपणे चालवीत आहे! त्यामुळे त्या सुसज्ज दालनाला एखाद्या उध्वस्त रणक्षेत्राचे स्वरूप प्राप्त झाले आहे. त्याच्या ह्या दुष्ट कृत्यापासून त्याला परावृत्त करण्याची शक्ति कोणालाच नाही काय? तो सर्व शक्तिमान जगन्नियताहि ह्या वेळी निद्रासुखाच्या आधीन झाला आहे काय?

प्रिय वाचक, चला आता आपण पुन्हा मघाच्या त्या पहिल्या दालनात जाऊ व आपल्या कथानायिकेची काय हालहवाल आहे, ह्याची चोकशी करू.

जवळ जवळ अर्धी घटका आपल्या नयनावाटे त्या पराच्या उशीवर अश्रू ढाळून, तिने ती उशी ओलीचिंब केली आहे, व तसे करून तिचा दुःखभार हलका झाला आहे. तिचे डोळे रडून रडून आरक्त झाले आहेत, आणि तिच्या नाजुक पापण्या सुजल्या आहेत. अखेरीला बराच वेळ ह्याप्रमाणे अश्रुविमोचन करून झाल्यावर ती युवती पलगावरून उठून उभी राहिली. तिच्या सुदर मुखावर कसल्यातरी निश्चयाचे तेज झळकू लागले. आपला खालचा ओठ तिनें आपल्या वरच्या दातानी किंचित दाबला व

प्रत्येक पाऊल आत्मविश्वासाने टाकीत तिने त्या क्रूरकर्म्यांच्या दालनात पदार्पण केलें !

तो युवक आपल्या संहारकार्यात गढून गेलेला असल्यामुळे आपल्या कथानायिकेच्या सुकुमार पावलाची चाहूल अर्थातच त्याला लागली नाही. आपली कथानायिका त्याच्या पाठीशी जाऊन केव्हा उभी राहिली, हेदेखील त्यास कळून आलें नाही. त्याच्या पाठीशी थोडा वेळ उभी राहून अखेरीस ती युवती म्हणाली, " प्राणनाथ, चलायचं ना आता झोपायला ? "

तिचा मजुळ स्वर कानी पडताच तो युवक तद्रीतून एकदम दचकून जागा झाला. पण संहारकार्यात मग्न झालेल्या आपल्या अणकुचीदार शस्त्रा-वरून दृष्टि न हलविता तो म्हणाला, " प्रिये, जरा थाब, आता थोडेच राहिले. हे आणखी दोन दरोडेखोर मारले की झालेच माझे काम ! "

" तुमचे हे नेहमीचेच आहे !" रोषपूर्ण स्वरात नायिका म्हणाली नतर थोडा वेळ आपल्या पतीच्या हातात असलेल्या शस्त्रावर आपली नजर खिळवून ती उभी राहिली व अखेरीस न राहवून ते शस्त्र एकदम त्या युवकाच्या हातातून हिसकावून घेऊन किंचितशा कठोर स्वरात ती म्हणाली, " तुमचे लग्न माझ्याशी लागले आहे की ह्या काळतोंडीशी ? "

तिच्या त्या कृतीच्या व प्रश्नाच्या अचानकपणामुळे तो युवक किंचित् काल गोंधळून गेला, पण लगेच स्वतःला सावरून घेऊन व एक विकट हास्य करून तो म्हणाला, "हाः हा. हाः ! मग तुला तिचा मत्सर वाटतो की काय ?"

" सदान् कदा मेला तिचाच सहवास !" ती युवती म्हणाली, "दिवसभर तर त्या काळतोंडीच्या सहवासात असता. पण आताशा रात्रीदेखील तुम्ही तिच्या सहवासात घालवू लागला आहात ! ती तुम्हाला जर येवढी प्रिय होती, तर माझ्याशीं देवाब्राह्मणाच्या साक्षीनें लग्न तरी का केलेंत बरे ?"

" बरे, बरे. आण तिला इकडे." तो युवक म्हणाला.

" बरें, " ती युवती म्हणाली, " त्या मेलीच्या सहवासात राहून काहीं

फायदा होत असेल तर तेहि नाही! साऱ्या संसाराचे वाटोळे झाले तिच्या पायीं! वर आणखी साऱ्या जगात फजिती होते ती निराळीच!"

येवढें बोलून त्या युवतीनें पटकन् फुंकर घालून तो ढण्ढण् जळणारा दिवा मालवून टाकला.

"हे काय बरे! हे काय बरे?" त्या युवकाने गोंधळून विचारलें. "माझे थोडे काम अजून राहिले आहे ना? ते दरोडेखोर आता चांगले ताव-डीत सापडले आहेत. त्यांचा एकदा शिरच्छेद करूं दे, म्हणजे मग मला सुखानें झोप येईल"

"बस्स झाला आता हा चावटपणा!" ती तरुणी निश्चयात्मक स्वरात म्हणाली, "चला आता गुपचुप शयनगृहात. आधीच घासलेट मिळत नाही आणि जें काय थोडेफार मिळते ते असे निष्कारण जाळून टाकायचे!"

वाचकहो! आपल्या कथानायिकेच्या त्या बोलण्याने माझ्या वर्मी—आपल त्या युवकाच्या वर्मीच—घाव बसला. मी गोंधळून म्हणालो--अह!—आपला तो युवक गोंधळून म्हणाला

सारंच मुसळ केरात! लिहिण्याच्या भरात मी खरं तेंच लिहून गेलो. तो विशाल भालप्रदेशाचा व तरतरीत नाकाचा युवक म्हणजे मीच-हे चाणाक्ष वाचकानी आता ओळखलच असेल, व आमच्या कथेची ती सुंदर नायिका म्हणजे दुसरी तिसरी कोणी नसून माझी पत्नी सुलूच होय, हे तर बिनचाणाक्ष वाचकानीदेखील ओळखल असेल!

ह्या गोष्टीचा शेवट—शेवट कसला आलाय् कपाळाचा! मी लिहीत असलेल्या त्या रोमांचकारी गोष्टीचे लिहून झालेले सारे कागद सुलून गोळा केले व त्या कागदाचे निर्दयपणाने राईराईएवढे करून, माझ्या अपूर्ण कथेचा—व त्याबरोबरच या कथेचाहि—तिनें एकाद्या अद्यावत् लघुकथेला शोभून दिसेल इतका आकस्मिक शेवट करून टाकला!

# तुकोबा आणि सालोमालो

आधुनिक तुकारामबुवा अशी रगोबाची ख्याती सगळीकडे आहे. पण आमचा अनुभव विचाराल तर तसा नाही. त्याची ती नम्रता, तोंडावरचें ते नेहमीचे हास्य, आणि उठल्यासुटल्या त्याचे ते 'रामकृष्ण हाऽरी' हें सारे ढोंग आहे, तो माणूस वाटतो तितका सरळ नाही असे समजण्याइतका पुरावा आमच्याजवळ आहे.

ऑफिसला जाण्याकरता तयार होऊन आम्ही ब्लॉकला कुलूप लावीत होतो. तोच आमच्या कानावर शब्द पडले, ' रामकृष्ण हाऽरी !'

आम्ही पाहिले तों रगोबा हात जोडून पायरीवर उभे ते का आले असावेत ह्याविषयी आम्हाला काहीच तर्क करता येईना आम्हीही हात जोडून त्याचे ' रामकृष्ण हारी ' परत केले.

" काल माझ्या दुकानातून आपण गाद्या विकत आणल्या ना ? " रगोबानी विचारले. त्याच्या चेहऱ्यावर नेहमी असणारे ते नम्र हास्य ह्या वेळी गैरहजर होते.

आम्ही ' होकार ' दिला.

" त्या गाद्या आपण मला परत देऊ शकाल का ? रामकृष्ण हारी ! " ते हात जोडून म्हणाले.

रगोबाचा गाद्या बनविण्याचा कारखाना होता. आम्ही चौघे नुकतेच देवळालीच्या एम्. अी. एस. मध्यें नौकरी लागल्यामुळे नाशकास येऊन

राहिलो होतों. आणि कालच आम्ही रंगोबाकडून चार गाद्या खरीदल्या होत्या. त्या त्यानी अशा परत मागितलेल्या पाहून अर्थातच आम्हाला आश्चर्य वाटलें.

" वा ! त्या कशा आता परत देता येतील ? " मीं विचारले.

" त्याचे पैसेही आम्ही रोख दिलेत. " खरे म्हणाले.

" आणि गाद्या तुम्हाला परत करून आम्ही रात्री झोपायच कशावर ?" फडक्यानी प्रश्न केला.

" का ? पण तुम्हाला त्या गाद्या परत कशाला हव्यात ? " काळ्यानी विचारले.

आमच्या ह्या प्रश्नाच्या भडिमाराला अडविण्याकरता त्याचे ते नम्र हास्य त्याच्या चेहऱ्यावर उगवले आमच्या प्रश्नाचा ओघ परतविण्याकरता त्यानी आपले गुबगुबीत हात जोडले. आणि ते सुहास्य वदनाने म्हणाले, " आनद आहे ! आनद आहे ! आपण जे हे प्रश्न विचारले ते ऐकून आनद झाला रामकृष्ण हाऽरी पण त्याच असं आहे त्या गाद्या मी दुसऱ्या एका गिऱ्हाइकाकरता तयार केल्या होत्या. तो गृहस्थ पाचसहा दिवसाकरता म्हणून गावाला गेला होता मला वाटल, तो परत येईपर्यंत त्याच्याकरता आपण दुसऱ्या नवीन गाद्या तयार करून ठेवू पण तो गृहस्थ आज एकाएकी हजर झाला आहे, आणि ' ऑर्डर ' प्रमाणं गाद्या मागतो आहे असा झालाय् घोटाळा रामकृष्ण हाऽरी !"

त्याची ही अडचण आम्हाला निरुत्तर करणारी होती खरी. पण आम्ही तरी त्याना गाद्या परत देऊन काय करणार !

"पाहू नतर. आता आम्हाला ऑफिसला गेल पाहिजे. चला खरे. नाहीतर मोटार चुकायची !". मी म्हटल, आणि आम्ही चालू देखील लागलो

" हे पहा, पाहिजे तर मी तुम्हाला दीडपट किमत देतो. " रंगोबा म्हणाले, " दुप्पट घ्या ! "

" सध्याकाळीं या, मग पाहू. "

" छे छे ! रामकृष्ण हारी ! अस नका करू. मला येवढी भीक घालाच" हात जोडून रगोबा विनवू लागले. " तिप्पट किमत घ्या. पण मला त्या गाद्या द्याच. माझा शब्द गेला आहे. "

" काहो रगोबा ? " त्यानी नमस्कार केला, तेव्हा त्याच्या अनामिकेवर उमटलेला आगठीचा वळ माझ्या दृष्टीला पडला. आणि एकदम आठवण होऊन मीं विचारले,

" तुमची हरवलेली आगठी सापडली का ? "

माझा हा प्रश्न ऐकून ते एकदम चमकलेले दिसले, पण एकदम नम्रतेने हसून ते म्हणाले, " रामकृष्ण हारी अजून नाही मिळाली. आनद आहे ! आनद आहे ! फार वाईट झाल त्या आगठीची किमत ह्या दिवसात पाचसहाशे तरी सहज होईल सहा हिऱ्याचे खडे आहेत तिच्यावर !"

" बापरे ! " काळे उद्गारले.

" आनद आहे ! आनद आहे ! रामकृष्ण हारी ? " असे म्हणून त्यानी हात जोडले, व हास्याने त्याचे मुखकमल फुलले शिवाजी महाराजानी पाठविलेले दागिने परत करणाऱ्या तुकोबाच्या विरक्तीची मला तेव्हा आठवण झाली.

" मग काय गाद्याच ? " रगोबानी विचारल.

त्यावर आम्ही " रामकृष्ण हारी " करून ऑफिसचा रस्ता चालू लागलो.

आम्ही ऑफिसला पोचलो तरी रगोबाच्या विचित्र वागणुकीवर मी विचार करीत राहिलो. कालच विकलेल्या गाद्या परत मागावयास हा गृहस्थ येतो, त्याची तिपटीने हि किमत द्यायला तयार होतो, त्या अर्थी ह्यात काहीं तरी पाणी मुरत असावे, असे मला सारखे वाटू लागले. आणि मग मनात एकदम एक शका आली.

काल आम्ही गाद्या विकत घ्यावयास रगोबाच्या दुकानात गेलो असतानाचा प्रसग मला आठवला. रगोबासारखा येवढा विरक्त माणूस—आधुनिक

तुकारामबोवाच !—पण त्याचा चेहरा जरासा उतरलेला दिसला. लवकरच आम्हाला त्याच्या ह्या उदासपणाचे कारण कळून आलें. त्याची सहा खड्याची हिऱ्याची आगठी हरवली होती ना ? आज सकाळपर्यंत ती त्याच्या अनामिकेवर होती. नतर त्यानी आमच्या गाद्या तयार केल्या होत्या. आम्ही गेलो त्याच्या थोडाच वेळ पूर्वी आपली आगठी हरवल्याचे त्याच्या लक्षात आले होते. आणि त्याची आगठीची शोधाशोध चालली होती. त्याच गडबडीत त्यानी आमच्याशी गाद्या विकण्याचा व्यवहार पुरा केला होता.

मग अस तर नसेल ! आमच्या गाद्या तयार करताना एखाद्या गादीत रगोबाची आगठी बोटातून गळून तर पडली नसेल ! हा प्रकार काही अगदीच अशक्य नव्हता. शक्रघाटावर शची तीर्थाला नमस्कार करीत असता कालिदासाच्या शकुतलेच्या बोटातील आगठी नाही का गळून पडली ! खद-खदा हसताना शातारामाच्या शकुतलेच्या बोटातील आगठी नदीत नाही का गळून पडली ! मग रगोबाच्या आगठीनेंच काय पाप केलय् ! हो, असच असेल. आमच्या गाद्या तयार करताना एखाद्या गादीत रगोबाची आगठी गळून पडली असेल. नाहीतर गाद्याची तिप्पट किमत द्यायला रगोबा आपण होऊन कशाला तयार झाले असते ? ती गिऱ्हाइकाला दिलेल्या शब्दाची निव्वळ थाप असावी. त्या हरिश्चद्रावताराच त्याच नुसत ढोग असाव.
ती आगठी माझ्याच गादीत मिळाली तर काय बहार होईल !

रात्री खाणावळीतून जेऊन घरी आलो, तो शेजाऱ्याकडून रगोबानी सध्याकाळीं एकदोन फेऱ्या टाकल्याचे कळले. मग माझ्या शकेला पुष्टिच मिळाली, आणि खोलीचे दार बद करून अगदी गुप्तपणानें मी माझ्या शंकेचा पडताळा पाहू लागलो. गादीची शिवण एका वस्तऱ्याच्या पातीने मी तडातड कापून काढली, आणि आतील कापसाचे ढीग बाहेर काढू लागलो. सारा कापूस बाहेर काढून झाला तरी आगठी काही मला दिसली नाहीं. एकदोन ढेकूण मात्र सापडले. मला शका आली, प्राचीन तुकोबाच्या उक्तीप्रमाणे अर्वाचीन तुकोबाच्या आगठीचे हिरे ‘ ढेकणाच्या सगे ’ भग तर पावले नाहींत ना ? पण मला अजून आशा होती. मीं मग बोटानीच कापूस पिंजायला सुरवात केली. थोडासा कापूस पिंजून झाला असेल नसेल तोंच

कापसाच्या कणानी माझ्या नाकात प्रवेश करून मला एकामागून एक शिंका येऊ लागल्या.

इतक्यात दरवाजावर ' टिक्‌टिक्‌ ' ऐकू आली

पण मला ह्या वेळी दार उघडायचे नव्हते. मला आलेली शंका मला गुप्त ठेवायची होती. आम्हा चौघापैकी कुणाच्या तरी गादीत ती रगोबाची मूल्यवान आगठी होती, हे निश्चित ! तसच, माझ्या गादीत ती नव्हती, हेंहि निश्चित. म्हणजे खरे, काळे, किंवा फडके ह्या तिघापैकी कुणाच्या तरी गादींत ती होती, खास. आता मी दार उघडले तर मीं केलेल्या विचित्र प्रकाराकडे पाहून माझ्या मित्राना शका येणार, व मग सत्राशें प्रश्न विचारून खरा प्रकार माझ्याकडून ते काढून घेणार !

मग कसची मिळते मला ती आगठी !

म्हणून मी जोराने घोरण्याचा आवाज काढून झोपी गेलो असल्याचे जाहीर करू लागलो.

पण ते नीटसे जमले नाही. घोरता घोरता मला मध्येच शिका येऊ लागल्या

" आहे माहीत हो बाळोबा !" बाहेरून खऱ्याचा आवाज आला " काय उगाच झोपेच सोग करता ? झोपलेल्याला शिका येत नसतात. उघडा दार ! "

नाइलाजान मी दार उघडल खऱ्यानी आत डोकावून पाहिल त्याबरोबर त्यानाहि दोनतीन शिका आल्या.

" हा हो काय मूर्खपणा ? " त्यानी विचारले " गादी कशाला उसकटून ठेवली ?"

मी उगाचच हसलो. माझे खोटे उत्तर तयार नव्हते. आणि खरा प्रकार सागणे तर मुळींच शक्य नव्हते, खऱ्यानीही मग तिकडे दुर्लक्ष केले, आणि त्यानी विचारले, " काय हो बाळोबा, उद्या मोटार कितीला येणार . ?" पण एवढे बोलून ते एकदम थबकले. त्याचा चेहरा एकदम गभीर झाला. मनात उडालेली कसली तरी खळबळ माझ्यापासून लपवून ठेवण्याचा त्यानीं प्रयत्न केला, आणि ते त्रोटक म्हणाले, " बर मी जातो. "

येवढे बोलून होईतो ते खोलीबाहेर पडलेही ! त्याच्या ह्या चमत्कारिक वागणुकीचे मी आश्चर्य करीत राहिलो.

ह्या आश्चर्यसागरात मी फार वेळ पोहत राहिलो नसेन, इतक्यात काळे आले. आणि येता येताच म्हणाले, “ बाळोबा, जरा तपकीर द्या पाहू. पडस आल्यासारख वाटतय्. ”

“ तपकीर ? ” मी म्हणालो, “ कुठ आहे तपकीर माझ्याजवळ ? ”

“ नाहीं ? मग मघापासून येवढ्या शिका कसल्या काढताहात ?”

त्याचे येवढें बोलून होतय् तो त्यानाही एक शिक आलीच. तेवढ्यात फडके आले आणि म्हणाले, “ कायहो बाळोबा, ही पिजार गल्लींतील जागा कशाला घेतली ?”

“ ही पिजार गल्ली नाही. चादवडकर गल्ली आहे !”—मी.

“ पण मग इतका कापूस पिजल्याचा वास कसा सुटलाय् ? ऍक्शी: !” फडक्यानी विचारले.

“ ऍक्शी. ? ” काळ्यानी विचारले

“ ऍक् शी !” मी उत्तर दिले

“ ऍक्शी: !” आपल्या खोलीतून खरे उद्गारले.

ह्याप्रमाणे थोडावेळ ‘ नाका ’च्या ह्या स्वर्गीय भाषेत आमचे सभाषण झाल्यावर फडके आणि काळे अधिक न बोलताच आपआपल्या खोल्यात निघून गेले

माझी गादी मी उस्कटून ठेवल्यामुळे झोपण्याचा प्रश्नच नव्हता. ऐन रात्री दुसऱ्या गादीची व्यवस्था न करता असलेली गादी उस्कटून ठेवण्यात मी बराच मूर्खपणा केला असे आता आगठी न मिळाल्यावर, मला वाटू लागले माझ्या गादीत आगठी असती तर कुठे पळून थोडीच जाणार होती ? सिगारेटवर सिगरेट ओढून झोपेला पळविण्याचा प्रयत्न करीत मी येरझारा घालीत होतो.

इतक्यात माझ्या तीन मित्रात स्वर्गीय भाषेतील मघाप्रमाणेंच सभाषण सुरू झालेलें माझ्या मनात एक शका आली आणि मीं खऱ्याच्या खोलीचा

दरवाजा ठोठावला. त्यानी शिकाखेरीज दुसरे काही उत्तर दिले नाही. दरवाजावरील व्हेंटीलेटरला लटकून मी त्याच्या खोलीत दृष्टिक्षेप केला. काळ्याचा आणि फडक्याच्याहि खोल्यातून ह्याच युक्तीने पाहून घेतले.

तिन्ही खोल्यातून एकच प्रकार दिसून आला होता. गादी उस्कटलेली, कापसाचे ढीग खोलीभर पसरलेले, खोलीतील साऱ्या वातावरणात कापसाचे बारीक कण तरगत असलेले आणि प्रत्येक जण शिकता शिकता अगदी एक चित्ताने कापसाच्या कणाकणाच सशोधन करीत बसलेला ! जरी मी स्वत:च ह्या कल्पनेचा प्रवर्तक असलो, तरी ही दृश्ये पाहून मला हसू आल्यावाचून राहिले नाही.

चौघाच्याहि गाद्या उस्कटलेल्या असल्यामुळ आम्ही चौघेहि प्रथम हॉटेलात चहा घेण्याकरिता निघालो. पहिल्याने प्रत्येकाने लपविण्याचा प्रयत्न केला तरी नतर प्रत्येकजण आगठीच शोधत होता, हे सत्य हळूहळू बाहेर पडले. त्यातल्या त्यात आनदाची गोष्ट अशी होती की त्या तिघापैकी कुणालाच ती आगठी मिळाली नव्हती

रात्रीच्या जागरणामुळे आम्ही सकाळीच गाद्या दुरुस्त करण्याकरिता रगोबाच्या दुकानी गेलो. 'रामकृष्ण हारी' करून त्यानी मोठ्या सुहास्य वदनाने आपले लठ्ठ हात जोडले. त्याच्या हातातील ती सहा हिऱ्याची आगठी बालार्काच्या कोमल किरणात चकाकली. जणू आम्हाला कसे बनवले म्हणून ती हसत होती.

"मिळाली काहो आगठी?" मीं विचारले.

"रामकृष्णहारी ! मिळाली बर. आनद आहे ! ह. काय हुकूम?"

"ह्या गाद्या दुरुस्त करायच्या आहेत." काळे म्हणाले.

"पण ह्या साऱ्या उस्कटून का टाकल्या?" रगोबानीं अगदी सहज विचारले.

"किती ढेकूण हो त्यात !' फडके समयसूचकतेने म्हणाले, "रात्रभर मुळींसुद्धा झोप नाहीं !"

" अरे अरे ! रामकृष्ण हारी. बर तर सध्याकाळी येऊन घेऊन जा गाद्या."

रगोबाच्या दुकानातून बाहेर पडल्यावर खरे म्हणाले, " काय लुच्चा आहे हा रगोबा ? किती छान बनवलन् त्याने आपल्याला ? आगठीच्या लोभान आपण गाद्या फाडल्या, आणि त्या परत शिवून देण्याचे पैसे मात्र त्याला मिळाले ! "

आमची सर्वांची ह्या बाबतीत एकवाक्यता झाली. आणि अजूनहि आमचे तेच मत आहे सारा गाव रगोबाना ' तुकोबा ' म्हणतो, पण आम्ही मात्र त्याना ' सालोमालो'च म्हणतो.

तुम्ही म्हणाल, " रगोबानी तुम्हाला फसविण्याकरताच आगठी हरवल्याची हूल उठवली ह्याला पुरावा काय ? त्याची आगठी खरोखरीच हरवलीहि असेल ? "

असेल ! पण मी म्हणतो, तुम्ही जरा आमच्या दृष्टीने विचार करून पहा, आणि मग सागा तुम्हाला काय वाटत ते. रगोबा हे तुकोबा की सालोमालो ?

# विषारी भाजी

मिसेस एम्प्टीहेडची पार्टी ऐन रंगात आली होती काबळ्याच्या छत्र्याच्या भाजीची मुख्य 'डिश' टेबलावर येणार होती. मिसेस एम्प्टीहेडनी आपलें सर्व कौशल्य खर्ची घालून ती भाजी तयार केली होती त्या आता बटलरला भाजीच्या बशा आणण्याचा हुकूम करणार, इतक्यात खुद्द बटलरच अगदी रडवा चेहरा करून त्याच्या खुर्चीमागे येऊन उभा राहिला. आपल्या धनिणीला काही तरी भयंकर बातमी सांगण्यासाठी तो आला होता हे त्याच्या गंभीर, पण खिन्न अशा मुद्रेवरून स्पष्ट दिसून येत होते. मिसेस एम्प्टीहेडनी हुकूम सोडण्यासाठी म्हणून त्याच्याकडे मान वळविली मात्र, तो तो एकदम मान लववून मोठ्या दिलगिरीच्या आवाजात म्हणाला,

"बाईसाहेब, मी मध्येंच बोलता ह्याबद्दल माफी असावी, परंतु आजची ती मुख्य भाजी विषारी असावी, असा मला दाट संशय येतो आहे."

सबंध पार्टीत ह्या त्याच्या बोलण्याने बॉंबचा स्फोट व्हावा तसा गोंधळ उडाला. मिसेस एम्प्टीहेडनी त्या भाजीचे गुणवर्णन नुकतेच संपविले होते. सर्व लोक आज एका नवीन तऱ्हेच्या चमचमीत भाजीवर ताव मारावयास मिळणार म्हणून खुषीत होते. आपल्या हुशार पत्नीने पार्टीची सर्व व्यवस्था सुंदर करून सर्व लोकास खूष करून सोडले म्हणून कोपऱ्यातल्या एका खुर्चीवर बसलेल्या मि. एम्प्टीहेडच्या लठ्ठ चेहऱ्यावर कौतुकमिश्रित स्मित विराजत होते. अशा वेळी तो बॉम्ब पडणे अगदीच अयोग्य. ती अभद्र बातमी त्या वेळी सांगून त्या बटलरनें आपणाला मुळीच मुत्सद्देगिरी नाहीं असें दाखविलें होते.

सर्वांची तोंडे एकदम खर्रकन् उतरली ! मिसेस एम्प्टीहेडखेरीज बाकीचे सर्वजण एकमेकाकडे अर्थपूर्ण नजरेने पाहू लागले मि. एम्प्टीहेडनी खुर्चीत बसल्याबसल्याच अवाढव्य देह जरासा हालवला व आपल्या कोटाची कॉलर नीट केली. त्यांच्या शेजारीच एका खुर्चीवर कापसाच्या गोळयासारखा दिसणारा मिसेस एम्प्टीहेडचा लहानसा कुत्रा बसलेला होता. त्यालाही जणू काय ही अशुभ बातमी समजून, त्याने आपल्या शेपटीचे निशाण खाली उतरविले. मिसेस एम्प्टीहेडना तर ' दे माय धरणी ठाय'च झाले हिंदुस्थानातून कलेक्टरच्या जागेवरून सेवानिवृत्त झालेले त्याचे पतिराज आणि त्या नुकत्याच आपल्या मायदेशी परत आलेल्या होत्या मायदेशी येताच त्यानी आपल्या गावी एक लहानशी 'झोपडी' ( Cottage ) विकत घेऊन तिच्या अनावरणविधीसाठी म्हणून आजची पार्टी देण्याचा बूट काढलेला होता. ही पार्टी आकर्षक व्हावी, म्हणून मिसेस एम्प्टीहेड सकाळपासून स्वयपाकघरात जातीनिशी खपत होत्या. आजच्या पार्टीचे वैशिष्ट्य म्हणजे कावळयाच्या छत्र्याची भाजी होय. मिसेस एम्प्टीहेडनी ही भाजी करण्याची कला हिंदुस्थानातच हस्तगत केली होती. ह्या भाजीची आजच्या पार्टीत मुख्य 'बशी' ठेवण्यात आली होती त्या भाजीच्या गुणवर्णनपर जाहिराती आज त्या लहानशा गावात आठ दिवस फडफडत होत्या त्यामुळे आमत्रिलेले सर्व पाहुणे आज आपणाला एक नवीन स्वादिष्ट खाद्य खावयास मिळणार म्हणून मोठ्या कुतूहलाने आणि आशेने जिभल्या चाटीत आलेले होते गावातल्या त्या सर्व मोठमोठ्या लोकासमोर, झाला हा प्रकार मिसेस एम्प्टीहेडना अपमानास्पद वाटला. त्याच्या हळव्या मनाला तो प्रसग फारच लागला व खिन्न चेहऱ्याने त्या निष्कारण त्रास दिल्याबद्दल सर्वाची माफी मागण्यासाठी म्हणून उठल्या.

मि. एम्प्टीहेडनाहि काय करावे हे सुचेना. त्यानी हिंदुस्थानात कलेक्टर म्हणून खूप वर्षे काढली होती, परतु तेथेहि त्याना इतका घोटाळयात पाडणारा प्रसग क्वचितच आला होता परिस्थितीचे गाभीर्य लक्षात घेऊन त्यानी एक लट्ठ चिरुट शिलगवला, व आता त्याची सुशील आणि कर्तबगार पत्नी सर्व पाहुण्याची माफी मागण्याचा लज्जास्पद समारभ उरकणार, इत-

क्यात त्यानी बटलरला बोलावून एका बशींत थोडीशी भाजी घेऊन येण्याचा हुकूम सोडला. एका सेकदाच्या आतच एक बशी भरून भाजी टेबलावर मि. एम्टीहेडच्या पुढ्यात हजर झाली. आता मि. एम्टीहेड काय करतात, इकडे सर्वांचे डोळे लागून राहिले. त्याच्या शेजारीच मि. ब्लॉकहेड ( Mr Blockhead ) बसलेले होते. त्यानीही त्या भाजीची परीक्षा सुरू केली. बराच वेळ त्यानी ती निरखून पाहिली, तिचा थोडासा वास घेतला, नतर त्यानी थोडीशी भाजी बोटानें चेपून पाहून आणि सरतेशेवटीं भाजीचे एक-दोन थेब जिभेवर ठेवून तिची चव चाखली. जितक्या तऱ्हानी म्हणून त्या भाजीची तपासणी करता येणे शक्य होते, तितक्या तऱ्हानी ती करून झाल्यावर त्यानी मनातल्या मनात काही तरी गणित केल्यासारखे केले. मि. ब्लॉकहेड आता काय निकाल देतात, इकडे सर्वांचे कान लागून राहिले. ब्लॉकहेडहि आपल्यावरील जबाबदारी पूर्णपणे ओळखून होते. पूर्ण विचार करून झाल्यावर गभीरपणानें त्यानी घोषणा केली–

"सभ्य स्त्रिया आणि सदगृहस्थहो ! माझ्या अल्पमतीला असे वाटतें कीं, ही भाजी विषारी नाही, असे जर मी म्हटले, तर तर ते फारसे चुकीचे होणार नाही"

सगळीकडे एकच आनद झाला. मि ब्लॉकहेड हे एक पूर्ण विचारी गृहस्थ आहेत, व त्याचे बोल नेहमी खरे ठरतात, अशी गावातील सर्व लोकाची श्रद्धा होती. तेव्हा सर्वांनी लवकरच "भाजी आणा" असा बटलरकडे तगादा लावला. मिसेस एम्प्टीहेडनाहि छातीवरची एक मोठीच धोड उतरल्यासारखी वाटली. पाडव वनवासात असता कौरवानी अपरात्री जेवावयास येऊन द्रौपदीची अब्रू काढण्याचा प्रयत्न केला होता त्या वेळीं श्रीकृष्णानी धावून येऊन द्रौपदीची अब्रू वाचवली होती. तशीच स्थिति मिसेस एम्प्टीहेडची झाली असल्यास नवल नाहीं. बटलरहि मोठ्या आनदानें भाजीच्या बशा आणण्यासाठीं आत धावत गेला. पार्टीत परत सर्वत्र आनदाचा स्वच्छ सूर्य-प्रकाश पडला.

परतु मि. वीकहार्ट नावाचे गृहस्थ मि. ब्लॉकहेडच्या समोरच्याच खुर्चीवर स्थानापन्न झालेले होते. त्याच्या छातींत धाकधुक होऊ लागलें.

त्यानी ती भाजीची बशी समोर ओढून घेतली आणि बराच वेळ तिजकडे निरखून पाहिलें. मि. ब्लॉकहेडनी केलेल्या परीक्षेवरून ती भाजी विषारी आहे किंवा नाही हे समजणे कसे शक्य होते, ते त्यास समजेना. ते ब्लॉक-हेडना म्हणाले, " मला क्षमा करा, पण आपल्या मताच्या विरुद्ध जाण्याची मी आपली परवानगी घेतो. "

झालें. दोघाचे दोन पक्ष तयार झाले आणि आता खडाजगी उडणार असा रग दिसू लागला. भाजी वाढून झाल्यावर पार्टीला रग यावयाचा, तो ती वाढावी की नाही, ह्यावरच रण माजून ब्लॉकहेड व वीकहार्ट पार्टीचे लोक लालबुद झाले, मद्याचे पेगवर पेग खलास होऊ लागले, तसतशी बोलणींहि तिखट आणि अधिक निर्भीड होऊ लागली. मि वीकहार्टच्या बाजूचे म्हणणे असे पडले, की जिव्हालौल्याच्या क्षणिक सुखासाठी आपला बिनमोल जीव धोक्यात घालू नये राष्ट्राला त्याचा फार उपयोग होण्यासारखा आहे. तर ब्लॉकहेड पार्टीचे लोक त्यावर तिरस्काराने हसून आणि त्याच्या भित्रेपणाची टर उडवून म्हणत, " तुमच्यासारख्या भित्र्या लोकाचा राष्ट्राला काय उपयोग होणार आहे, ते दिसतच आहे. " डॉक्टर असते तर बरे झाले असते, असे सर्व म्हाताऱ्या बायाचे एकमताने म्हणणे पडले. आणखी थोडा वेळ गेल्यावर हा वादविवाद असाच चालला असता, तर पाहुणे मुद्द्यावरून गुद्द्यावर आलेले दिसले असते. असल्या युद्धाला आपण कारण झालो, ह्याबद्दल मिसेस एम्प्टीहेडना मुळींच अभिमान वाटेना. त्या बिचाऱ्या खिन्नपणाने खुर्चीवर बसून होत्या. वादळ शात झाले अशा समजुतीने मि एम्प्टीहेडनी आपला चिरूट नुक्ताच विझवून ठेवला होता. परतु तो त्याना परत शिलगावून धुराचे लोट सोडणे भाग पडले. लवकरच धुराच्या भपकाऱ्यातून त्याना एक मार्ग दिसू लागला. आपला स्थूल देह घेऊन ते टेबलाच्या आधाराने उभे राहिले, व तोडात चिरूट तसाच ठेवून बोबडे बोलू लागले,

" सभ्य गृहस्थहो, असे हमरीतुमरीवर येऊ नका ! मीं ह्या वादावर एक तोड काढली आहे. आपण ही भाजी एखाद्या कुत्र्याला खावयास घालू या. दहापधरा मिनिटात कुत्र्यावर काय परिणाम होतो, तें आपणास दिसून येईल. "

" वाहवा !" " सुंदर कल्पना !" अशा गजरातच मि. एम्प्टीहेडच्या

खुर्चीनें त्याचा देह झेलला. मिसेस एम्प्टीहेडनी 'माझ्या प्रियकरा' (My Darling) असे म्हणून आपल्या पतीकडे कौतुकाने पाहिले. थोड्याच वेळात सर्वांची नजर मिसेस एम्प्टीहेडच्या त्या कुत्र्यावर गेली. त्या नजरेतला क्रूर अर्थ मिसेस एम्प्टीहेडच्या लक्षात यावयास फारसा वेळ लागला नाही. त्याबरोबर त्या एकच किंकाळी फोडून आपल्या खुर्चीवरून उठून धावतच गेल्या. आणि आपल्या कुत्र्याला हातात घेऊन त्याचे एकदोन मुके घेऊन "नाही रे! नाही ह माझ्या प्रियकरा! अशी गोष्ट मुळीच होणार नाही!" असे त्या त्याला परोपरीने समजावून सांगू लागल्या शेवटी एखादे कुत्रे पैदा करून त्याला बरीचशी भाजी चारण्याबद्दल मि एम्प्टीहेडनी हुकूम सोडल्यावर त्या खुर्चीवर येऊन बसल्या

अजब तोड शोधून काढल्याबद्दल मि एम्प्टीहेडवर जिकडून तिकडून कौतुकोद्गाराचा वर्षाव झाला. मि. एम्प्टीहेड आधीच फार लठ्ठ होते म्हणून, नाही तर त्यामुळे त्याच्या अंगावर मूठभर मांस सहज चढले असते!

"छे छे! त्यात विशेष काही नाही." कोणीही सामान्य माणसान हीच गोष्ट केली असती, अशा आवजात मि. एम्प्टीहेड बोलू लागलें, "आम्ही हिंदुस्थानात ही युक्ति नेहमीच उपयोगात आणीत असू!"

"तरी पण ह्याला युक्ति नाही असे कोण म्हणेल? त्याला निदान जगाचा अनुभव तरी पाहिजेच की नाही?" मि. फॉक्स म्हणाले

"होय हो." मिसेस एम्प्टीहेड आपल्या पतीकडे कौतुकाने पाहत म्हणाल्या. "असाच हुशार आहे तो! हिंदुस्थानात कलेक्टर असताना असे आणीबाणीचे प्रसंग त्याच्यावर कितीदा तरी येऊन गेले. पण तो कधी डगमगला नाही. रात्रीच्या रात्री तो झोपेवाचून काढी, पण अखेरीस काहीं तरी बिनतोड शक्कल शोधून काढल्यावाचून राहात नसे."

"तर तर! असे लोक आमच्यात आहेत, म्हणूनच तर आमच्या साम्राज्यावर सूर्य कधीही मावळत नाही." मिस्टर फॉक्स म्हणाले.

थोड्याच वेळात अतःपुरातून बटलरने प्रवेश केला, आणि कुत्रा विकत आणून ( इग्लडात भिकाऱ्याप्रमाणेच रस्त्यावर भटकणारे कुत्रेहि दुर्मिळ आहेत ) त्याला दोन बशा भाजी खाऊं घातल्याचे त्याने सागितलें. त्याचप्रमाणे त्याच्यावर नजर ठेवावयास एका खास इसमाची नेमणूक करून कुत्र्यास काही कमीजास्ती झाल्यास ते ताबडतोब कळविण्यास सागितल्याचेहि जाता जाता आपल्या मालकिणीच्या नजरेस आणून द्यावायास तो विसरला नाहीं.

त्यानतर आणखी पधरा एक मिनिटे तरी तिष्ठत बसल्याशिवाय गत्यतर नव्हते. निकाल लागेपर्यंताचा पाहुण्याचा कळा अतिशयच मोठा कटाळवाणा गेला असता, परतु त्या वेळात मिसेस एम्प्टीहेडनी हिंदुस्थानातल्या कुत्र्यावर एस लहानसे माहितीपूर्ण व्याख्यान देऊन आपल्या श्रोतृवृदाला इग्लडातील व हिदुस्थानातील कुत्र्यामधील स्थूल भेद सागता येण्याइतके ज्ञान करून दिले. त्याबरोबरच आपणास कुत्र्याच्या प्रदर्शनात मिळालेली बक्षिसेहि त्यानी सर्वाना दाखविली. त्यामुळे सर्वाची चागलीच करमणूक झाली. बरोबर पधरा मिनिटानी बटलर आला, आणि ते कुत्रे चमचमीत भाजी खावयास मिळाल्यामुळे आनदात असून जिकडे तिकडे बागडत आहे, अशी आनददायक बातमी त्याने जाहीर केली. त्याबरोबर परत एकदा जिकडे तिकडे आनद झाला. गरमागरम वाफा निघणाऱ्या खमग वासाच्या भाजीने भरलेल्या बशा टेबलावर एकामागून एक येऊ लागल्या, त्याबरोबर सर्वांनी आपल्या जिभाना बोलण्यापेक्षा अधिक प्रियकर असलेले खाण्याचे काम करण्यास पूर्ण मुभा दिली. कास्याचमच्याचा खणखणाट सुरू झाला. आणि त्या आवाजात " तरी माझ म्हणण कधी खोट होणार नाही, " असे मि. ब्लॉकहेडनी उच्चारलेले वाक्य थोड्याच पाहुण्याना ऐकू गेलें.

सर्व पार्टी यथासाग पार पडली. भाजीमुळे फारच मजा आला ! एकदरीत बेत झक्क उडाला, असेच सर्वांचें मत पडले. मिसेस एम्प्टीहेडनें अशी स्वादिष्ट भाजी खाण्याचा प्रसग घडवून आणल्याबद्दल त्याचे एकमुखानें हार्दिक आभार मानण्यात आले. सर्व श्रम फळास आलेले पाहून मिसेस एम्प्टीहेडनीं एक समाधानाचा सुस्कारा सोडला.

सर्वजण आता धूम्रपान करीत शेवटच्या कॉफीचे घुटके घेत होते. सर्व वातावरण उची तबाखूच्या मादक दर्पान भरून गेले होते. इतक्यात मिसेस एम्प्टीहेडना दुर्दैवानें लागोपाठ तिसरा आणि पूर्वीपेक्षाहि बराच जोराचा धक्का दिला ! बटलर धावतच आला आणि धापा टाकीत म्हणाला. " बाई-साहेब, ते कुत्र मेल, अस तो त्या कुत्र्यावर नजर ठेवायला ठेवलेला इसम सागतो आहे !"

ही बातमी ऐकताच सगळीकडे हाहाकार उडाला. सर्वांना भाजी फारच आवडली होती, म्हणून त्यानी तिच्यावर चागलाच हात मारला होता. आता आपणा सर्वांना विषबाधा होणार, आणि आपल्या गावातील सर्व बडे लोक नाहक मृत्युमुखी पडून राष्ट्राचे, साम्राज्याचे आणि पर्यायाने सर्व जगाचे मोठे नुकसान होणार म्हणून जो तो हळहळू लागला. काहीना तर विष चढू लागल्याची स्पष्ट चिन्हेच दिसू लागली. त्याना चक्कर आल्यासारखी वाटू लागली कित्येकाच्या पोटात मळमळू लागले काहीच्या डोळयासमोर अंधेरी आली म्हाताऱ्या बाया परमेश्वराची शेवटी प्रार्थना उरकून घेऊ लागल्या. तरुणी आपल्या प्रियकराच्या बाहुपाशात घट्ट आवळल्या गेल्या. मिसेस एम्प्टीहेडना वेड लागावयाचेच तेवढे बाकी राहिले होते ! त्या आपल्या आवडत्या कुत्र्याला जवळ घेऊन विलाप करू लागल्या मि एम्प्टीहेड आणि जाणि मि. ब्लॉकहेड हे मात्र आल्या प्रसगाने यत्किंचितहि डगमगून न जाता, शातपणाने मि वीकहार्टच्या रागाकडे पूर्ण दुर्लक्ष करून बसले होते. मि ब्लॉकहेडची ती भाजी विषारी नाही, अशी प्रामाणिक आणि ठाम समजूत होती, आणि म्हणून ते निर्धास्त होते, तर मि एम्प्टीहेड राष्ट्रावरील ही महान् आपत्ति टळण्यासाठीं काही तरी तोड काढण्यात गर्क असल्यामुळे, त्याना स्वतःकडे लक्ष देण्यास फुरसद नव्हती. अखेरीस काहीं तरी निश्चय ठाम करून ते शातपणाने बाहेर गेले, आणि एका शिपायाला बोलावून त्याला " डॉक्टरकडे धावत जा, त्याना खूप सलाम साग आणि ताबडतोब घेऊन ये ! " असा त्याना हुकूम फर्माविला.

दुर्दैव एकदा पाठीशीं हात धुवून लागलें, म्हणजे तें आपल्या भक्ष्याची पुरी धूळधाण उडविल्याशिवाय राहत नाहीं. मिसेस एम्प्टीहेडच्या दुर्दैवानें

गावातील एकुलते एक डॉक्टर एक सीरियस केस पाहावयास नुक्तेच गेले होते परतु आनदाची गोष्ट एवढीच की ते तेथून मिसेस एम्टीहेडकडे मेजवानीलाच तडक येणार होते. डॉक्टर येईपर्यंतचा काल त्या सर्वाना अत्यत भयकर गेला त्यावरून त्याना प्रलयकालाची जराशी कल्पना आली. काहीं जण आपल्या प्रिय माणसाना कवटाळून अश्रू ढाळीत होते, तर काही आशावादी, डॉक्टरच्या वाटेकडे डोळे लावून बसले होते दहा मिनिटे काढल्यावर डॉक्टरच्या मोटारीचा तो सर्वाना परिचित असलेला भोगा ऐकू येऊ लागला आणि डॉक्टरानी दिवाणखान्यात पाय ठेवताच आपणास त्या नरकवासातून सोडविण्यास देवदूत आल्याप्रमाणे सर्वास वाटले त्याच्याभोवती सर्वानी एकच गर्दी केली डॉक्टर पार्टीसाठी म्हणून आलेले होते, आणि उशीर झाल्याबद्दल माफी कोणत्या शब्दात मागावी, ह्याचा ते विचार करीत होते. त्याना ह्या प्रकाराचा काहीच उलगडा होईना. त्या गोंधळलेल्या स्थितीतून मि. एम्टीहेडनी त्याची सुटका केली. त्यानी सर्वास आपल्या खुर्च्यावर बसावयास विनती केली, आणि त्याप्रमाणे सर्वानी केल्यावर त्यानी डॉक्टराना, " सर्वाना विषारी भाजी खाण्यात आल्यामुळे विषबाधा झालेली आहे, तरी ताबडतोब औषधोपचार करा, सविस्तर हकीकत नतर सागतो, " असे सागितले. त्याचबरोबर आपलीहि त्याना काही मदत होण्यासारखी असल्यास आपण ती मोठ्या आनदाने देऊ असे आश्वासनहि दिले डॉक्टराना त्याना त्रास न देणे योग्य वाटले म्हणून म्हणा, किवा त्याच्या शातपणाने हलणाऱ्या स्थूल देहाचा विशेष उपयोग होईलसा न वाटल्यामुळे म्हणा, त्यानी ती विनती साभार नाकारली.

डॉक्टरानी झटपट औषधोपचारास सुरवात केली. एका बादलीत पाणी घेऊन त्यात चारपाच मुठी मीठ घालण्यात आले व ते मिठाचे पाणी सर्वाना भरपूर पाजण्यात आले. इग्रजाच्या रोमारोमात भिनलेल्या स्त्रीदाक्षिण्याला अनुसरून आधीं स्त्रियास उपचार करण्यात आले. तोपर्यंत पुरुष त्या विषाचे वाईट परिणाम मोठ्या धैर्याने भोगीत उभे होते. चमचमीत भाजी ओकून टाकण्याचे पुष्कळाच्या जिवावर आले होते. पण करतात काय बिचारे ? ह्याशिवाय त्याना गत्यतर नव्हते !

सर्वांना उपचार करून झाल्यावर डॉक्टर थोडासा फराळ करण्यास बसले. सर्व पाहुणे ओकाऱ्या काढल्यामुळे म्लान होऊन विश्रांति घेत खुर्च्यांत बसले होते. आज आपणाला मृत्यूच्या दाढेतून ओढून काढल्याबद्दल जो तो डॉक्टराचे आभार मानीत होता. मिसेस एम्प्टीहेड एकेकाकडे येऊन त्याचा निष्कारण वेळ घेतला म्हणून दिलगिरी प्रदर्शित करीत होत्या. त्या अखेरीस डॉक्टराजवळ गेल्या. त्यांचे आभार मानावयास योग्य शब्द त्या आठवीत होत्या.

परंतु त्यांच्याकडे डॉक्टराचे लक्ष जाताच त्यांचा चेहरा एकदम मलूल झाला. मिसेस एम्प्टीहेडचा काही तरी मोठा अपराध केल्याबद्दल त्यांची सदसद्विवेकबुद्धि त्यांना चावे घेत होती, हे त्यांच्या अस्वस्थतेवरून स्पष्ट दिसून येत होते. बोलण्यास कशी सुरवात करावी हे त्यास सुचेना. अखेरीस त्यांना कंठ फुटला, आणि ते अत्यंत दिलगिरीच्या स्वरात म्हणाले, " मला तुम्ही क्षमा कराल अशी मला आशा आहे ! "

" कशाबद्दल ? " दुर्दैवाच्या तडाख्यांनी नामोहरम झालेल्या मिसेस एम्प्टीहेडनी त्रासून प्रश्न केला.

" तुमचं कुत्रं मारल्याबद्दल ! " डॉक्टर एखाद्या गुन्हा कबूल करणाऱ्या चोराप्रमाणे बोलले.

" काय ? " सर्वांनी आश्चर्याने प्रश्न केला !

" होय ! तुम्ही आजच नवीन विकत घेतलेले कुत्रं मी अप्रत्यक्ष रीतीने का होईना, पण मारल्याबद्दल ! "

सर्वजण डॉक्टराच्या ह्या बोलण्याचा काहीच अर्थ न समजून एक-मेकाकडे पाहू लागले.

" एक केस फार सीरियस होती, म्हणून मी जोरानं मोटर हाकीत तुमच्या दारावरून जात होतो. इतक्यात एक कुत्रं माझ्या मोटारीच्या आड आलं—तें तुम्हीं नुकतंच विकत आणलं होतं हें मला आता आत येताना त्या कुत्र्यावर रखवालीस ठेवलेल्या माणसाकडून कळलं—" सर्वजण बुचकळ्यात पडलेले पाहून डॉक्टर स्पष्टीकरण करू लागले, " मी त्याला वाचवण्याचा

पुष्कळ प्रयत्न केला, पण ईश्वराची इच्छा तशी नव्हती. माझ्या मोटारीखाली सापडून बिचारा तात्काळ गतप्राण झाला. मिसेस एम्प्टीहेड, आपणाला कुत्र्याचा फार शोक आहे, हे मला माहीत आहे, आणि म्हणूनच तुमच्या-जवळ असल्या बाबतीत माफी मागायला मला फार लाज वाटते आहे!" डॉक्टर कॉफीचा घोट घेत घेत म्हणाले.

मिस्टर एम्प्टीहेडनी नुकत्याच पेटविलेल्या चिरूटातून धुराचा एक भला लठ्ठ भपकारा सोडला!

"तरी माझं म्हणणं कधी खोटं व्हायचं नाही, म्हणून मी म्हणतच होतो." मि. ब्लॉकहेड म्हणाले.

# प्रसंगावधान

तुमच्या मेदूच्या सेक्रेटरीएटमध्ये ‘ नावे आणि चेहरे ’ ह्या खात्याचा चिटणीस कसा आहे कुणाला ठाऊक ! पण मला जो ह्या खात्याचा चिटणीस मिळाला आहे, तो मात्र फारच खल्याळ आहे अस दिसत. कधी एखादा ओळखीच्या चेहऱ्याचा माणूस मला पुष्कळ वर्षांनी भेटला व त्याच्या नावाची विचारणा मी ह्या माझ्या चिटणीसाकडे केली, तर ती माझ्या या विचारणेच उत्तर काही ताबडतोब पाठवीत नाही ! बहुधा माझ्या मेदूच्या सेक्रेटरीएटमध्येहि ब्रिटिश सरकारच्या सेक्रेटरीएटप्रमाणे ‘ लाल फिती’ची प्रथा चालू असावी ! ते काहीहि असल तरी अशा वेळीं माझी मात्र फारच विचित्र स्थिति होते माणूस ओळखीचा तर दिसतो, पण त्याच नावच जर आठवल नाही, तर त्याच गाव, धदा वगैरे वगैरे गोष्टी तरी कशा आठवणार ? आणि ह्या गोष्टी आठवल्या नाहीत, तर त्याच्याशी सभाषण तरी कस चालू ठेवणार ? किवा त्याची भावना न दुखवता ‘ तुमच नाव काय हो ? ’ म्हणून त्याला स्पष्ट प्रश्न तरी कसा करणार ? मग अशा वेळीं साहजिकच माझ्यावर जरा फजितीचाच प्रसग येतो. आता प्रसगावधान, समयसूचकता, सभाषणचातुर्य वगैरे वगैरे गुण माझ्यात आहेत नि त्याच्या जोरावर मी वेळ मारून नेतो, ही गोष्ट वेगळी !

असा एक प्रसग परवाच माझ्यावर येऊन गेला आणि मोठ्या प्रसगावधानाने मी वेळ मारून नेली. सकाळचा चहा झाल्यावर सिगरेटचे झुरके घेत व एका पुस्तकाच वाचन करीत मी आरामखुर्चीवर अगदी आरामशीरपणान पहुडलो होतो. सार जग कस वगण घातलेल्या गाड्याप्रमाण

सुरळीत चालल होत. अशा वेळी माझ्या खोलीत उघड्या असलेल्या दरवाजातून एकदम एक व्यक्ति आत शिरली ती व्यक्ति मला अनोळखी वाटल्यामुळ ' कस्त्वम् ? कुत आयात. ? ' वगैरे प्रश्न विचारणारी दृष्टि मी त्याच्याकडे लावली पण माझ्या भेटीमुळ त्या गृहस्थाला इतका आनद झालेला दिसला, की त्या गडबडीत माझ्या दृष्टीचे हे प्रश्न त्याच्या दृष्टीला ऐकू गेले नाहीत! आपला हात हस्तादोलनाकरता पुढ सरसावून सहास्य वदनान माझ्याकडे येता येता तो म्हणाला, " ओहोहोहोऽऽ! बाळासाहेब काय ओळखबिळख आहे की नाही ?"

" ओहो हो ऽ ऽ ! वा ! तुम्ही का ? " मीहि उद्गारलो

मी सत्यवक्ता असल्यामुळ व ' होय ' किंवा ' नाही ' ह्यातील कुठल उत्तर दिल्यास ते आपणाला फायदेशीर होईल ह्याची नक्की कल्पना नसल्यामुळ त्यान विचारलेल्या प्रश्नाच सरळ सरळ उत्तर देण्याच मी टाळल होत, व ते काम जिभेकडे न सोपवता मी ते माझ्या चेहऱ्याकडे सोपवल होत. अशा वेळीं स्वतःला शब्दात पकडू न देता खोट बोलण्यात माझा चेहरा मला चागलाच उपयोगी पडतो, असा मला आतापर्यंत पुष्कळच अनुभव आलेला होता. अर्थातच ह्या कामगिरीवर मीं त्याचीच नेमणूक केली हे योग्यच झाल. त्यानहि हसरा मुखवटा धारण करून व त्या प्रश्नाच उत्तर ' होय ' अस आहे अस त्या पाहुण्याला भासवून त्याला चागल चकवल ! मी खुर्चीवरून मोठ्या गडबडीत उठलो व मोठ्या आदबीन त्या व्यक्तीचा हात आपल्या हातात धरून मोठ्या प्रेमभरात त्याच्याशी हस्तादोलन केल.

हळूहळू मला आठवल, की ह्या गृहस्थाचा चेहरा आपण केव्हातरी नि कुठेतरी पाहिलेला आहे. पण त्याच नाव मात्र मला आठवेना. म्हणून मग मी त्या व्यक्तीची चेहरेपट्टी, उची, पोषाख, आवाज, वगैरे गोष्टीच कामचलाऊ ढोबळ टाचण करून ते माझ्या ' ना. अणि चे. ' खात्याच्या चिटणिसाकडे पाठवून दिल आणि त्याला निरोप पाठवला, ' ह्या वर्णनाच्या व्यक्तीच नाव कळवा—ताबडतोब ! '

" बसा ना ! " एकीकडे मी ह्या उद्योगात गर्क असता, एका खुर्चीकडे बोट करून मी त्या व्यक्तीला विनती केली व चिटणिसाच उत्तर अजूनहि

न आलेल पाहून पुन्हा एकदा त्या गृहस्थाच्या नावाविषयी तातडीची विचारणा केली.

पुष्कळ वेळ—मला तर ते एक युगच वाटल—वाट पाहूनहि चिटणिसाकडून उत्तर येईना अस जेव्हा मीं पाहिल, तेव्हा एक तर चिटणीस आज झोपी गेला असावा किंवा ह्या गृहस्थाच्या नावाच टाचण असलेली फाईल कुठतरी इतर फायलीच्या गठ्ठ्याखाली दडलेली असल्यामुळ त्याला लवकर सापडत नसावी, असा तर्क करून आल्या प्रसगाला तोड देण्याकरता जरूर असलेल्या प्रसगावधान, चातुर्य वगैरे गोष्टीची मी जमवाजमव सुरू केली.

असा प्रसग ओढवला की प्रथम मी त्या माणसाच सूक्ष्म निरीक्षण करून घेतो व त्याच्या शरीरातील एखाद्या वैशिष्ट्यावरून किंवा व्यगावरून, त्याच्या पोषाखावरून किंवा त्याच्या बोलण्याचालण्याच्या लकबीवरून त्या गृहस्थाची ओळख पटते की काय हें पाहण्याचा प्रयत्न करतो. अशा वेळीं माझ्या अगात अगदी शरलॉक होम्स सचरतो व पुष्कळदा ह्या पद्धतीन पत्ताहि लागतो.

आज आलेल्या त्या व्यक्तीच माझ्या सरावलेल्या गरुड—दृष्टीन मीं क्षणार्धात निरीक्षण करून घेतल व एका काल्पनिक कागदावर एका काल्पनिक पेन्सिलीन मिळालेल्या माहितीची नोद केली—

**गृहस्थाचें सूक्ष्म वर्णन**– उची मध्यम, बाधा मध्यम, वय मध्यम, रगरूप मध्यम, सामाजिक दर्जा मध्यम, पोशाख मध्यम, पण किंचित् छटेल; शैक्षणिक सास्कृतिक दर्जा मध्यम, इग्रजी शब्द सभाषणात वरचेवर वापरतो. बोटावर पिवळे डाग, धूम्रपान करतो .

माझ्या निरीक्षणशक्तीवर खूष होऊन ' ना. आणि चे. ' च्या चिटणिसाकडे ह्या तक्त्याची एक काल्पनिक नक्कल मीं ' एक्स्प्रेस डिलिव्हरी'नं पाठवून दिली. सुदैवान ह्या वेळीं मात्र चिटणिसान ताबडतोब उत्तर पाठवून दिल. इतक्या ताबडतोब, कीं माझ मन जरा साशकच झाल. थरथरत्या काल्पनिक हातानीं चिटणिसान पाठविलेला तो काल्पनिक लिफाफा मीं फोडून पाहिला आणि चिटणिसाला खाऊ कीं गिळू अस मला होऊन गेलं !

चिटणिसाच उत्तर त्रुटितच होत–"आपण पाठविलेल्या वर्णनाशीं जुळत्या असू शकणाऱ्या माणसाच नाव–अ. वा. वर्टी "

चिटणिसान माझ्या सूक्ष्म निरीक्षणशक्तीची अशी टर उडविलेली पाहून मग मीं त्या व्यक्तीला मोघम प्रश्न विचारून, ती व्यक्ति कोण आहे ह्याविषयी काही सुगावा लागतो की काय हे पाहू लागलो. कधी कधी ही रीत-देखील यशस्वी होते.

"काय ? कधी आलात ? "–मी.

"झाले दोन दिवस. "–तो

अर्थात् तो परगावचा होता.

"ठीक चाललय् ना !"–थोड्या वेळाने मी.

"वा ! झकास ! "–तो.

तो बेकार नव्हता.

"आपली भेट होऊन बरीच वर्षे झाली, नाहीं ? "–भीत भीत मी.

"हो. चागली सातआठ वर्षे तरी झाली. "–तो.

एक सुटकेचा सुस्कारा टाकून माझा चिटणिसाला निरोप–' सातआठ वर्षापूर्वीच्या फायली चाळा ! '

"कुठ असता सध्या ? "–उघडपणे मी.

"मुबईला. "–तो

चला. ह्या माणसाची ओळख शोधून काढण्याच क्षेत्र सबध महाराष्ट्राच्या दोन अडीच कोट वस्तींतून मुबईच्या पचवीस लाखापर्यंत मर्यादित झाल !

साधारण मोघम प्रश्न विचारून एवढी महत्त्वाची माहिती मी मिळवली तरीसुद्धा चिटणिसानीं ती केराच्या टोपलीत भरकावून दिली. आता ह्यापेक्षा अधिक प्रत्यक्षपणें त्या गृहस्थाला काही माहिती विचारायची म्हणजे आप-णाला अजून त्याची ओळख पटलेली नाहीं अस दाखविण्यासारखच होत. आणि अगदींच स्वस्थ बसून राहिल तरीहि तसच दाखविण्यासारख झालं असत. म्हणून मग मी हवापाणी, देशाची सद्यःस्थिति, आतरराष्ट्रीय राज-

कारण वगैरे वगैरे सर्वसामान्य विषयावर अघळपघळपणान गप्पा मारावयास सुरवात केली सुदैवान मला भेटावयास आलेला तो गृहस्थहि ह्या विषयाशी चागलाच परिचित दिसला आणि म्हणून मोकळेपणाला फारसा बाध न येता आमच्या सभापणाचा ओघ अप्रतिहत चालू ठेवण मला सोप पडल

चिटणिसाकडे मधूनमधून 'सापडल का नाव ?' अशी पृच्छा मी करीतच होतो व त्याच आपल नन्नाचा पाढा वाचण चालूच होत मोठ्या प्रसगान का होईना, सर्व व्यक्तिगत प्रश्न टाळून त्या पाहुण्याशी मी सभाषण चालू ठेवल होत !

"इदिरा नाही दिसत कुठ ?" युद्धात जर्मनीचा पराभव का झाला, ह्याविषयींची अतस्थ माहिती देण्याच्या ऐन भरात मी आलो असता त्यान मधेच प्रश्न केला.

"कोण इदिरा ?" मी एकदम गोधळून प्रश्न केला. आमच्या घरीं इदिरा तर कुणी नव्हती एकदम एक सुखकारक शका माझ्या मनात चमकून गेली. मला दुसराच कुणी समजून तर हा गृहस्थ चुकून आला नसावा ना ?

"अहो, इदिरा म्हणजे वहिनी ! तिच माहेरच नाव इदिरा नव्हे का ?" त्यान स्पष्टीकरण केल. "सातआठ वर्ष झाली तिला पाहून लग्नात पाहिली होती."

"ओ. ! ती होय !" निराशेचा सुस्कारा टाकून मी म्हटल त्याच्या मघाच्या प्रश्नाचा अर्थ आता माझ्या लक्षात आला होता. सुलूच माहेरच नाव इदिरा होत खर. एकूण गृहस्थ माझ्याकडे आलाय् तो काहीहि नशापाणी न करता बरोबर पत्ता काढूनच आलाय् तर !

कोण हा ? काय ह्याच नाव ?

हा, अस तर नसेल ना ? हा हिचाच कुणी नातेवाईक असावा. सुलूला काका, मामा, काकेमामा, मामेकाका, मावसकाका, काकेमावसा वगैरे सर्व प्रकारचे काके, मामे, मावसे मिळून पन्नास एक मध्यम वयाचे नातेवाईक आहेत, हें मला चागलच ठाऊक होत ! मी लग्नाला (स्वतःच्या) पन्नपूरला सात आठ वर्षापूर्वी गेलो होतो. तेव्हा त्या सर्वांशी माझी ओळख करून

देण्यात आली होती व कौरवाच्या चक्रव्यूहात सापडल्यावर बाळ अभिमन्यूच्या मनाची स्थिति काय झाली असेल, ह्याचीहि मला तेव्हा थोडीशी कल्पना झाली होती. ज्याचा चेहरा मी कधी सात जन्मातदेखील पाहिला नसेल अशी माझी समजूत असे, असे वयस्क लोक माझी मोठ्या अगत्यान विचारपूस करीत व 'हे श्रीयुत कोण असावेत–हिचे काका की मामा की मावसा ?' हा कूट प्रश्न मी सोडवीपर्यंत अदृश्य होऊन जात. ह्याचा परिणाम असा झाला होता, की पद्मपुरात त्यावेळी कुणीहि मध्यम वयाचा गृहस्थ कुठहि दिसला की तो आपला काके,मामे, आते किंवा मावस सासरा आहे अस गृहीत धरून, मी त्याला मोठा मान देई त्यानतर ह्या आठ वर्षात पद्मपुराला जाण्याची काही मला सवड घडली नव्हती. आणि तशी सवड झाली असती तरी तिथ जाण्याची मी हिंमत केली असती की नाहीं ह्याचीहि शकाच होती. मधे एकदादोनदा मुबईला गेलो असता सुलूचे एक-दोन मावस–चुलत मामा व आते–चुलत मामा व आते–चुलत काका मला भेटले होते व त्याच्याशीं सभाषण चालू असता त्याची ओळख न पटल्या-मुळ माझ प्रसगावधान, सभाषणचातुर्य वगैरे सारे गुण कसोटीला लागण्याची वेळ आली होती.

हा गृहस्थ सुलूचा कोणीतरी नातेवाईक असावा. ह्या कल्पनेन मला एकदम आनद झाला. सुलू त्याला ओळखू शकेल व एकदा त्या गृहस्थाच नावगाव कळल की सभाषणाचे जखडबद पुष्कळच सैल होतील, ह्या उद्देशान मीं प्रसगावधान राखून त्याला विचारल,

"काही चहा वगैरे ?"

"हो, अवश्य घेऊ की !"

"चला तर आत."

मी त्या गृहस्थाला आतील खोलीत घेऊन गेलो व त्याला एका खुर्चीवर बसवून सुलूला हाक मारून म्हटल, "अग, हे पाहिलस का बाहेर कोण आलेत ते ?"

पदरान हात पुशीत सुलू मोठ्या गडबडीन आणि आनदी चेहऱ्यानं बाहेर आली. अस कुणी माहेरच आल की तिला नेहमीच आनद होई. ती

खोलीत येताच त्या पाहुण्यान मघा मला जस विचारल होत, तितक्याच मोकळेपणान तिला विचारल, " काय इंदिरा, ओळखबिळख आहे का ? . हो ! आता कशाला ओळखशील तू ? मोठी डॉक्टरीणबाई झालीस ! "

" ओळखल तर ! अशी थोडीच ओळख विसरता येते ! " सुलू निश्चयाच्या स्वरात म्हणाली. तिच्या चेहऱ्यावरील भावावरून व तिच्या शब्दातील सहजपणावरून मला वाटल, बहुधा ह्या पाहुण्यान सुलू लहान असताना तिला अंगाखाद्यावर खेळवली असावी ! तिचे ते शब्द ऐकून निबिड अधःकार पडलेला असताना भगवान् सहस्त्ररश्मि उदयाचलावर यावेत तसा मला आनद झाला. हुश्श ! चला, आपण तर एका मोठ्या जबाबदारींतून सुटलो एकदाचे ! आता हळूहळू सर्व उलगडा होईलच.

सुलू नतर चहा करावयास गेली नि मी मग पद्मपूरच्या गोष्टी काढल्या. पद्मपूरची वनश्री, तिथला तो पडका किल्ला, तिथल रेशनिंग, पाऊसपाणी. यदाच आब्याच पीक ह्यावर आमची प्रश्नोत्तर झाली. माझ्या स्वरावर आता आदराची दाट छाया पडलेली कुणालाहि दिसून आली असती. आपण त्याला पूर्ण ओळखलेल आहे, हे त्याला पटाव म्हणून मधूनमधून मला आठवत असलेली एकदोन चुलत सासऱ्याची व मावस सासऱ्याची नावहि उच्चारली व त्याची मोठ्या आस्थेन चौकशी केली. मी उच्चारलेल्या नावापैकींच एखाद नाव त्या पाहुण्याच निघाल नाही, ह्या योगायोगाबद्दल मी जगन्नियत्याचे आभार मानले.

लवकरच सुलून चहा आणला. चहापान चालू असताना सुलून विचारल, " उतरलात कुठे इथ ? "

" गाडगेबुवाच्या धर्मशाळेत. "

" वा ! आम्ही इथ असताना तुम्ही धर्मशाळेत उतरलेल शोभत का ? सध्याकाळपासून आमच्याकडेच या ना मुक्कामाला. आम्ही परके का आहोत ? "

पाहुण्याची—त्यातून माहेरच्या—सरबराई कशी ठेवावी हें बायकानाच कळतं. त्या गृहस्थाला—कुठल्यातरी प्रकारच्या त्या माझ्या सासऱ्याला—धर्म-

शाळेतून आमच्या घरी राहायला बोलवायच काही मला सुचल नसत. थोडे आढेवेढे घेऊन पाहुणा आमच्या घरी पथारी आणून टाकायला तयार झाला आणि सध्याकाळी येण्याच आश्वासन देऊन निघून गेला.

त्याची पाठ फिरली तोच सुरून मला करपल्लवीन विचारल,

" कोण हे ? "

मी डोळे विस्फारून डोळ्यानीच उत्तर दिल, "मला ग काय ठाऊक !"

" कोण ते आलेले ? सागा ना ! " सुरून आता जिभेन विचारल.

" खर सागू ? मला नाही त्याच नाव आठवत ! " तिच्या माहेरच्या माणसाच नाव माझ्या लक्षात नसाव म्हणून मी शरमिदा झाल्याच दाखवून म्हणालो, " साग पाहू कोण आहेत ते ? "

" वा ! मला काय विचारता त्याच नाव ? तुम्हालाच ठाऊक असायला पाहिजे ते. सागा ना ! "

" वा वा ! नातेवाईक तुझे, अन् मला काय विचारतेस ? "

" माझे कुठले नातेवाईक ? माझ्या सर्व नातेवाईकाना मी नीट ओळखते म्हटल. "

" पाहा. नीट आठवण करून, एखादा तुझा कुणी मामेमावस काकाबिका असेल ! तुला ' इदिरा ' म्हणून हाक मारीत होता ! "

" पण मी निक्षून सागते ना, की ते माझे कुणी नाहीत म्हणून ? "

" मघा तर म्हणालीस त्याची चागली ओळख आहे म्हणून म्हणे, अशी ओळख कुठ सहजासहजी विसरता येते का !"

" मग काय याना एकदम ओळखल नाही म्हणून सागूं ? मला वाटल, ते तुमचेच कुणी काकेमामा वगैरे असतील म्हणून ! मग त्याचा अपमान का करायचा ? "

" छट् ! माझे नातेवाईक का असे दिसतात ?. "

पण हें वाक्य मीं पुर करण्याच्या पूर्वीच ' ना. आणि चे.' च्या खात्याच्या चिटणिसान पाठविलेला निरोप सिनेमांच्या विद्युद्दीपाच्या जाहिरातीप्रमाण

माझ्या डोळ्यासमोर झगझगत होता–" आलेल्या गृहस्थाच नाव–बगोबा. धदा आचारी. तुमच्या लग्नाच्या जेवणावळीच कॉट्रॅक्ट घेतल होत ती ओळख. "

मला कृष्ण समजून सुळ, टेबल, खुर्च्या, खोलीतील यच्चयावत् वस्तू माझ्याभोवती फेर धरीत आहेत असा मला भास झाला !

पण ही रासक्रीडा थाबताच मी मोठ्या प्रसगावधानान सुळला म्हणालो, " आपली उगाच गमत केली ग तुझी–माझ्या मावशीच्या नणदेचे चुलतभाऊ आहेत ते ! बर, मग रात्री जेवणाला बेत काय ?"

# प्रेमाची डेक्कन क्वीन !

जेव्हा जेव्हा नायक–नायिकाची प्रथम भेट आगगाडीच्या डब्यात झाल्याच मी कथाकादबऱ्यातून वाचीत असे, तेव्हा तेव्हा तो मला निव्वळ कल्पनाविलासच वाटे. प्रवास करून आलेला माझा एखादा मित्र जेव्हा मला ऐटीत सागे, 'आगगाडीत अशी एक फाकडू छोकरी भेटली होती की यव्!' तेव्हा मी त्याला बाताड्या न. १ अशी पदवी बहाल करीत असे. अशी गोष्ट सत्यसृष्टीत कधी घडून येण शक्यच नाही, अशी माझी अनुभवाती ठाम झालेली समजूत होती

आगगाडीतून मी कित्येकदा प्रवास केलेला आहे, पण कधी टपोऱ्या डोळयाची, धनुष्याकृति भुवयाची, शेपटीची मुलगी सहप्रवासी म्हणून मला लाभली असेल तर शपथ! अशी एखादी छोकरी हेरून मोठ्या मुत्सद्देगिरीन एकाद्या डब्यात आसन माडल, तर ती छोकरी दुसऱ्याच स्टेशनावर उतरून जाई. आणि मग माझा प्रवास आपला नेहमीप्रमाणच निष्प्रेम, शुष्क होई. एखाद्या स्टेशनावर कुणी शुभागी गाडीत चढण्याच्या तयारीन उभी असलेली दिसली की, खिडकीतून मोठ्या आशाळभूतपणान डोक बाहेर काढून मी पहात राही. आणि ती अचूक स्त्रियाच्या नाही तर दुसऱ्या एखाद्या डब्यात शिरली की माझ हृदय एकदम बुटात गळून पडे. एखादी सुरकुतलेल्या चेहऱ्याची म्हातारी, किवा कुणबाऊ बाया ह्याच्या सहवासातच मी आजपर्यंतचा सारा प्रवास केलेला होता.

आज डेक्कन क्वीनन पुण ते मुबई प्रवास करण्याची सधी मला लाभली होती. इतक्या दिवसाच्या कटु अनुभवावरून जरी

मला आजही एखाद्या नायिकेशी गाठ पडेल अशी मोठीशी आशा वाटत नसली, तरी मधून मधून वाटे, त्याच काय सागाव ? कदाचित् ह्या काळी चद्रकळा नेसलेल्या वैभवशाली ' दख्खनच्या राणी 'तच नायिकेच प्रथम दर्शन व्हाव, अशीच दैवाची योजना नसेल कशावरून ? पण माझी हीहि आशा फार वेळ तग धरून राहू शकली नाही. गाडी सुटण्याची घटा झाली. एन्जिन ड्रायव्हर मान लाब काढून गार्डाच्या दिशेन पाहू लागला. गभीर चेहऱ्यान गार्ड आपल्या डब्याकडे पाहू लागला. गाडीन जाणारे लोक एकएक गाडीत चढू लागले. पण माझा डबा मात्र अगदी सहारा वाळवटाप्रमाण किंचितहि ओलावा नसलेला असाच राहिला. नेहमीचा अनुभव आजहि येणार. डेक्कन क्वीनन प्रवास करण्याची मिळालेली सधीहि अशीच वाया जाणार, ह्या विचारान मी खिन्न झालो. दैवाला दोष देत इतक्या जड पावलानी मी डब्यात चढलो की त्या भारान गाडी थोडीशी कललेली मला स्पष्ट जाणवल !

गार्डाची शिटी झाली एन्जिनन ' भोः ' केल. आणि गाडी केव्हा चालू झाली आहे, हे समजण्यापूर्वीच धक्क्यावरील माणस आणि खाब हळूहळू मागे पडू लागले. आता मी निराशेन डवरलेला असा एक दीर्घ निश्वास टाकणार, इतक्यात—

काय आश्चर्य ? माझी नायिकेशी प्रथम भेट दैवान खरोखरीच डेक्कनक्वीनकरता राखून ठेवलेली होती तर !

चालत्या गाडीत मोठ्या शिताफीन चढलेली एक सुदर तरुणी धापा टाकीत माझ्या डब्यात उभी होती. त्या डब्यात आम्ही दोघेच उतारू होतो. मी तिच्याकडे पहातच राहिलो. त्या दृश्यावर माझा सहजासहजी विश्वास बसण शक्य नव्हत.

" मुबईला पोचल्यावर पत्र लिही हा ! " धक्क्यावरून कोणीतरी खूपच मोठ्यान ओरडून तिला सागितल. बोलणारी व ऐकणारी व्यक्ति ह्याच्यामधील क्षणाक्षणाला वाढत जाणार ओरडून सागण भागच होत.

" हो ! उद्याच जाईन. " त्या तरुणीनही ओरडून उत्तर दिल.

' कुठ तरी जा ' म्हणून सागितल असत तर त्यावर त्या तरुणीन दिलेल उत्तर योग्य झाल असत. पण निरोप घेताना माणसाच असच होत. काय बोलू नि किती बोलू अस होऊन जात त्या वेळी. आणि मग प्रश्नाला आणि उत्तराला मेळ रहात नाही. मला मोठी गमत वाटली ह्या प्रकाराची.

पुण्याच स्टेशन माग पडल्यावर त्या तरुणीन डब्यातून दृष्टि फिरवली. माझ्या समोरचाच बाक नायकनायिकेच्या आगामी प्रथम भेटीकरता दैवान जणू रिझर्व करून ठेवला होता. त्यावर ती ' हुश्श ' करीत येऊन बसली.

एखाद्या कादबरीची नायिका होण्याइतकी ती सुदर होती. टपोरे काळेभोर डोळे, धनुष्याकृति भुवया, लाघवी हास्य, वगैरे आधुनिक नायिकेच्या साऱ्या लक्षणानी ती युक्त होती. गाडी पकडण्याकरता केलेल्या धावपळीमुळ तिच्या कपाळावर घामाचे–छे ! घर्मबिदु उभे होते. नाकाच्या कोमल पाकळ्या किंचित् विस्फारित नि आरक्त झाल्या होत्या थोडक्यात सागायच म्हणजे, एखाद्या रोमॅटिक प्रसगी जें जे असायला पाहिजे ते ते सार जागच्या जागी व्यवस्थित होत आपल्या टीचभर रुमालान ती कपाळावरील घर्मबिदु पुसून काढू लागली

' हुश्श ! सापडली बाई गाडी एकदाची ! ' हे किवा असच काही-तरी वाक्य, कथा–कादबऱ्यातील नियमानुसार आपल्या इवल्यागा जिवणी-तून बाहेर सोडून, सभाषणाला आतुर असलेल्या नायकाला तिन उत्तेजन द्यावयास हव होत. पण ती तस काहीच बोलली नाही. ती आपली खिडकीतून दिसणाऱ्या वडाऱ्याच्या झोपड्याकडे पहात राहिली.

आकाशात ढग जमले होते. उकाडाही बराच होत होता. तिन एक लहानसा घडीचा पखा काढला, आणि ती वारा घेऊ लागली. पधरावीस मिनिट अशीच गेली.

' काय बाई उष्मा होतोय् ! पाऊस पडला तर बर होईल ! ' अशा अर्थाची काहीतरी वाक्यें उच्चारून नायकाला प्रियाराधनाची सधि देण्या-करता, खर पाहता, ही वेळ आता योग्य होती. पण तिन तसंहि काहीं म्हटल नाहीं !

डेक्कन क्वीन आपला लोखंडी मार्ग वेगान आक्रमीत होती. स्टेशना-मागून स्टेशन भराभर माग पडत होती मला एकदम जाणीव झाली, आता अडीच तासात बोरीबंदर! काय करायच असेल त्याला लवकर सुरवात केली पाहिजे. नाहीतर आमची ओळख होण्यापूर्वीच बोरीबंदर यायच! डेक्कन क्वीनच्या वेगाचा मला रागच आला. एखाद्या मालगाडीच्या वेगाने ती चालली असती, किंवा एखाद्या पॅसेंजर गाडीप्रमाण कुठल्याहि भुरट्या स्टेश-नवर तासभर थांबत, रखडत तिन आपला प्रवास चालू ठेवला असता, तर किती बर झाल असत, अस मला वाटत होत पुण ते मुंबई ह्यामध्ये दोनच स्टेशन उभी राहणाऱ्या डेक्कन क्वीनची कल्पना काढणाऱ्या जी. आय. पी. चा मला राग आला. पण ती वेळ ह्या विषयावर अधिक विचार करीत बस-ण्याची नव्हती. चालला क्षण मोलाचा होता. डेक्कनक्वीन बोरीबंदरला पो-चण्यापूर्वीच आमच्या प्रेमाच्या आणाभाकाच बोरीबंदर गाठण मला अवश्य होत. व त्याकरता डेक्कन क्वीनच्याच वेगान प्रेमाची प्रगति करण जरूर होत. नायिकेन पुढाकार घेतला नाही, तर नायकाला हातपाय हालवण भाग होत.

गाडीतून चहाचे 'ट्रे' घेऊन पाढऱ्या पोशाखातील वेटर फिरत होते. सकाळी निघण्याच्या गडबडीत मी एक सिंगल मारला होता. पण माझी चहाची खरी तल्लफ त्यान भागली नव्हती नायिकेच्या असामान्य सौंदर्याच मी इतका वेळ अनिर्मिष पान करीत असलो, तरी त्यामुळ चहाची तहान शमण शक्य नव्हत. मी चहा मागवण्याच ठरवल आणि हो. नायिकेलाहि 'चहा हवा का' म्हणून विचारल तर?—आयतीच ओळखहि होईल!

"चहा घेता का हो थोडा?" मी जरा चाचरतच विचारल.

त्यावर तिन काही उत्तर दिल नाही किंबहुना, तिन माझ्याकडे वळून देखील पाहिल नाही! गाडीच्या खडखडाटात तिला तो प्रश्न कदाचित् ऐकू गेला नसेल, असा विचार करून व मनाचा मोठा हिय्या करून मी तोच प्रश्न जरा मोठ्यान विचारला.

आता मात्र माझा उद्देश पूर्णांशान झाला नसला तरी बराचसा सफल झाला. खिडकींतून आपल डोक काढून घेऊन तिनें माझ्याकडे पाहिल, व मधुर स्मित केल. पण बोलली मात्र काहीं नाही!

स्त्रियाच्या 'नकारा'चा अर्थ 'होय' असा घ्यावा, अस मानसशास्त्रविशारदानी लिहिलेल मी वाचल होत. पण स्त्रीच्या अशा नुसत्या हसण्याचा अर्थ काय घ्यावयाचा, हे माझ्या वाचनात कुठच आलेल नव्हत. त्यामुळ तिच्या त्या स्मिताचा अर्थ काय घ्यावा, हे न समजून मी गडबडलो

मग मी माझ्या मघाच्याच चहाविषयक प्रश्नाची तृतीय आवृत्ति काढली. मण त्या आवृत्तीचे गठ्ठेहि तसेच पडून राहिले. परत थोडस हसून तिन आपल सुदर आकाराच डोक खिडकीतून बाहेर खुपसल.

मी मग माझ्या एकट्याकरताच चहाची ऑर्डर दिली, आणि तिच्या आत्ताच्या विचित्र वागणुकीचा विचार करू लागलो धड ' हो ' किवा ' नाही ' सागायला तिला काय झाल होत ? तिच हसतेवेळच मुख कितीहि सुदर दिसत असल, तरी त्यान शब्दाची उणीव थोडीच भरून निघणार ? ती काही मुकी नव्हती मघा गाडी सुटतेवेळी मी तिच पचमातल कूजन ऐकल होत—मग ?

अस तर नसेल ? हो. असच असेल येवढी सुदर पोरगी ह्या दिवसात मोकळी थोडीच राहणार ? तिच्या माग कॉलेजातील शेकडो पोर नि काही प्रोफेसरहि असतील ! कुठतरी तिच जमलेल देखील असेल ! मग तिन मला उत्तेजन दिल नाही, तर त्यात काही नवल नव्हत

एकूण आजचा मोकाहि फुकट जाणार तर ! हायरे निष्ठुर दैवा ! !

वेटरन आणून दिलेल्या चहाचे घुटके घेत मी दुर्दैवाला दोष देत बसलो होतो. इतक्यात सूर्यापुढील ढग बाजूला होऊन बाहेर स्वच्छ प्रकाश पडला. आणि ती सुदरीहि बोलली, " मलाहि मागवा ना चहा. "

" बॉय, और एक चॉय ! " मी एकदम ओरडलो. वास्तविक, तिन उच्चारलेल्या ह्या वाक्यान तिच्या विचित्र वर्तणुकीच मला मघापेक्षाहि अधिक आश्चर्य वाटायला पाहिजे होत पण तस आश्चर्य करीत बसायला मला फुरसत होती कुठ ! तिच ते वाक्य ऐकून कोकिळेला कठ फुटल्यावर वसताला व्हावा, तसा आनद झाला होता ना !

नतर आमचा चहा पिऊन झाल्यावर तिन आपल्या चहाचे पैसे

आपणच देण्याचा आग्रह धरला, पण मी तो मानला नाही, वगैरे ठराविक औपचारिक प्रकार वर्णन करण्यात अर्थ नाही. त्या काळात प्रेमाच्या बोरीबदरला दोन स्टेशन आम्ही अधिक जवळ गेलो असलो, तरी वाचकानी मिटक्या मारीत वाचाव, अस विशेष काहीच घडल नाही.

खरा मजा आला खडाळ्याचा घाट सुरू झाला तेव्हा. आधीच पावसाळा म्हटला की माझ्या प्रतिभेचा वारू चौखूर उधळू लागतो. त्यातून दख्खनची राणी हे काव्यपूर्ण नाव धारण करणाऱ्या वैभवशाली बाष्परथातून मी प्रवास करीत होतो. पोटात नुकताच ढोसलेला गरम गरम चहा चालत्या गाडीबरोबर झोके घेत होता डोळ्यासमोरून घाटातील भव्य सुदर देखावे एकामागून एक सरकत होते. तशातहि माझ्यासमोर साक्षात् स्फूर्तिदेवता अशी ती नायिका बसली होती. मग काय विचारता! सध्या आमच्या गाडीला दोन एन्जिन लागली होती, तर माझ्या प्रतिभेला पाच एन्जिन लागली होती. आणि मग जणू काय माझ्या अगात कालिदासान सचार केला, आणि तो माझ्या तोडून वदू लागला.

" .बोगद्यात गाडी शिरताना दिवस सपून रात्र सुरू झाल्यासारख वाटत, बोगद्यात शिरताना जो देखावा दिसत होता त्याहून निराळाच देखावा बोगद्यातून बाहेर पडल्यावर दिसू लागतो. जणू कोणी तरी निरनिराळ्या सुदर निसर्गचित्राच्या मॅजिक लॅटर्नच्या प्लेटीच एकाद्या भव्य पडद्यावर दाखवीत आहे!

पर्वतराजीवरील गर्द झाडीतून, कसली तरी विलक्षण ओढ लागल्यामुळ उड्या घेणारा हा रुपेरी प्रपात एखाद्या वृद्धेच्या सोडलेल्या केसाप्रमाण दिसतो आहे,—की ती वनदेवीच्या केशकलापामधील भागाची रेघ आहे? जागोजाग जमलेल्या जलाशयाच्या आरशात पाहून जणू ती आपली वेशभूषा सजवीत आहे हा आगगाडीचा जुना पूल ढगानी वेढला गेल्यामुळ अंधुकसा दिसतो आहे. आणि जणूं काय इतक्या उचावर असलेला हा पूल म्हणजे स्वर्गाला जाणारा रस्ताच आहे, असा भास होतो आहे! बावटा हातात घेऊन कोसळत्या पावसात कुडकुडत उभा राहिलेला हा देवडीवाला हरिभाऊच्या विशाल प्रतिभेची आठवण करून देत आहे! ."

गाडीन रस्ता कापताना जें जें काही माझ्या दृष्टिपथात येत होत, त्यावर मी आपल्या प्रतिभेने अलकार चढवीत होतो. तीहि एकाग्र चित्तान माझी काव्यप्रचुर वर्णन ऐकीत बाहेरील सृष्टिसौदर्य पाहण्यात निमग्न होऊन गेलेली दिसत होती.

अखेरीस घाट सपले, आणि घाटाच्या व माझ्या प्रतिभाविलासाच्या उच्च वातावरणातून आम्ही जमिनीवर आलो माझ्या काव्यपूर्ण भाषणाचा नायिकेवर काय परिणाम आला आहे, हे मी मोठ्या आतुरतेन पाहिल. ती किंचितशी हसली, आणि म्हणाली, “ शिवलीलामृताचा अकरावा अध्याय म्हटला का ? ”

“ शिवलीलामृताचा अकरावा अध्याय ? ” मी दचकून विचारल. माझ्यासारखा पुरोगाम्याचा शिरोमणी आणि शिवलीलामृत ! ही दोन्ही नाव नुसतीं एका ओळीत लिहिली तरी एकमेकावर तुटून पडतील ! केवढी ही विसंगति !

पण विसगतीतूनच उच्च विनोद निर्माण होतो ना ? मला तिच्या विनोदबुद्धीच मोठ कौतुक वाटल. वा ! ती जितकी सुदर होती तितकीच तिची विनोदबुद्धिहि तीव्र होती ! एक गोड अपवादच !—

काय खटकत होत, कुणास ठाऊक ! पण आमच सभाषण मध्येंच बद पडे. सभाषणाच्या भरात एकाएकी काहीं कारण नसता माझ्या उत्तरावर प्रत्युत्तर देण्याच ती टाळी आणि मग आमच सभाषण बद पडे. तरी पण मला त्याच विशेषस काही वाटल नाही. आम्हीं आता डोळ्याच्या भाषेचा उपयोग करावयास सुरवात केलेली असल्यामुळे जिभेच्या सभाषणाची उणीव मला तेवढीशी भासली नाही. एकदरीत आम्ही फारस सभाषण केलेल नसल—एकमेकाची नाव देखील अजून आम्हाला कळली नव्हतीं—तरी माझ्या अतिम उद्दिष्टाच्या दृष्टीनें आम्ही जवळ येत चाललो होतो, हें निश्चित. हा आपला माझा उगाच समज होता, अस नाहीं. जसजस कल्याण जवळ येऊ लागल, तसतसे तिच्या चेहऱ्यावर जे भाव खेळू लागले, त्यावरूनदेखील माझ्या ह्या म्हणण्याला पुष्टीच मिळाली असती.

नवऱ्याच्या नावाचा उखाणा घेताना एखाद्या नववधूच्या मनाचा गोंधळ उडावा, तसा तिचा गोंधळ उडाला होता, आणि त्याचं स्वच्छ प्रतिबिंब तिच्या मुखावर पडून तिच्या मुळातील सौंदर्यात अधिकच भर पडली होती. बोलण्याचा धीर करावा की करू नये, ह्याविषयी मनात चाललेल्या द्वंद्वाचा रक्तपात तिच्या कपोलावर सांडला होता. एखाद्या सराईत गनिमाप्रमाणे आपल्या भुवयाच्या धनुकल्यामधून तिनं माझ्यावर चोरून शरसंधान चालविलं होतं. पदराचा ओठाशी चाळा काय चालला होता, उजव्या गालावर उषा, तर डाव्या गालावर संध्या गुलाल काय उधळीत होत्या! छे छे! ते पूर्णपणे वर्णन करून सांगण्यास माझी लेखणी असमर्थ आहे!

मनातील द्वंद्व बराच वेळ चालल्यावर अखेरीस बोलण्याकरता आपली चिमुकली जिवणी तिनं किंचितशी विलग केली आणि विचारलं,

" आपण डॉक्टर आहात ना? "

मी मानेनंच 'हो' म्हटलं. एखाद्या प्रेमसूचक वाक्याची मी अपेक्षा केली होती, तरी तिच्या ह्या प्रश्नानं माझी अगदीच निराशा केली नाही. ज्याच्याजवळ आपलं प्रेम व्यक्त करायचं, त्याचा कामधंदा तिनं विचारून घेतला, तर त्यात फारसं निराशाजनक असं काही नव्हतं. उलट, माझ्या खिशातून बाहेर डोकावणाऱ्या स्टेथॉस्कोपच्या नळीवरून तिनं माझा पेशा अचूक ओळखून काढला, ह्यामुळे मला तिच्या निरीक्षणशक्तीचं व चातुर्याचं कौतुकच वाटलं.

" नाव काय आपलं? " तिनं विचारलं

" वर्टी " मी म्हणालो.

" काय डर्टी! " तिनं माझ्या नावावर शाब्दिक कोटी केली. मला ती विशेषशी आवडली नाही, पण त्यावरून तिच्या अभिजात विनोदी वृत्तीचा आणखी एक पडताळा मिळाल्यामुळं मला थोडासा आनंदच झाला.

" नाही. वर्टी. "

त्यावर, जणू आपण 'वरती' असं भासवून तिनं वर पाहिलं. ह्या तिच्या शारीरिक कोटीचंहि मला कौतुक वाटलं. मी मनात म्हटलं, " बस्स!

सहचरी असावी तर अशी—सुदर, चतुर नी विनोदी ? आपल उर्वरित आयुष्य अशा सखीच्या सहवासात घालवण्याच आपल भाग्य आहे का ? "

" मला आपणाला एक विचारायच आहे " बोटानी पदराशी चाळा करीत आणि दृष्टि खाली लावून तिन विचारल. किती अडखळली ती हे शब्द उच्चारताना !

आता तो क्षण येऊन ठेपला होता. अहाहा ! तो क्षण—

गणिताचे सारे नियम धुडकावून देऊन ज्या क्षणी एक आणि एक ह्याची बेरीज एकच येते, जो क्षण हृदयमजूषेत जतन करून ठेवावा, आणि म्हातारपणी ज्याच्या स्मृतीच्या उजळण्या करीत काळ सुखात घालवावा, जो क्षण आयुष्यात एकदाच येतो, आणि ज्याच्याकरता आयुष्य जगाव,—तो स्वर्गीय-दिव्य क्षण येऊन माझ्या कानाचे दरवाजे ठोठावीत होता. आता कोणते अमृततुल्य शब्द माझ्या कर्णचषकात ओतून हा क्षण ती सुदरी साजरा करते, तेवढच पहायच शिल्लक राह्यल होत

पण ती अस जगाविरहित विचारणार तरी काय म्हणा ! आतापर्यत तिन मघा विचारलेल्या प्रश्नान प्रस्तावना करून शेकडो नायिकानी आपल्या प्रियकराला जो प्रश्न विचारला होता, तोच अनादि अमर प्रश्न ती मला आता विचारणार होती, हे, चाणाक्ष वाचकहो, तुम्हाला काय सागायला पाहिजे ?

" विचारा की ! " तिला जरा धीर यावा म्हणून मी म्हणालो. आणि तिन आपला प्रश्न विचारून होताच, त्याच उत्तर आलिगनानच देण्याकरता बाहू सरसावून बसलो.

" आपणाला बहिरेपणावर औषध माहीत आहे का ? " तिन चाचरत चाचरत विचारल. हा प्रश्न विचारताना तिन लाजण्याची कमाल केली. पण त्या लज्जित सौदर्याच डोळ्यानी पान करण्याच्या मनःस्थितीत मी होतो कुठ ?

" बहिरेपणावर औषध ? " मीं गोधळून विचारल.

इतक्यात कल्याण आल, आणि इतका वेळ फारसा आवाज न करता चाललेल्या डेक्कन क्वीनन सतरांशे साध्यावरून भरधाव पळताना एकच

खडखडाट केला. माझ्या मनाचंहि तसंच झालं होतं. थोड्या वेळानं जरासं भानावर येऊन मीं विचारलं, " कोणाकरता पाहिजे औषध ?

क्षणभर तिनं खालीं पाहिलं. आणि शरमलेल्या आवाजात ती म्हणाली, " माझेच कान जरा अधू आहेत ! "

तिचं तें उत्तर ऐकून डेक्कन क्वीन झर्रकन् फिरून परत पुण्याला जात आहे, असं मला वाटलं. तशा स्थितीत बहिरेपणावर मी तिला काय औषध सांगणार ! मलाच एखाद्या शुद्धीवर येण्याच्या औषधाचा कुणी डोस दिला असता, तर हवा होता !

नंतर मग साहजिकच माझ्या प्रेमाच्या डेक्कन क्वीननंहि उलट दिशेनं गिरकी घेतली. हो. जिच्याशी प्रेमाच्या गुलगुल कानगोष्टी करता येणं शक्य नाहीं, अशी नायिका काय कामाची ?

# फर्स्ट एड

हिंदुस्थानात विद्येला किमत नाही आमचच पाहा ना ! आमच्या शहरावर पुढमाग बॉबहल्ला होईल. म्हणून आम्ही फर्स्ट-एडचं ( प्राथमिक उपचाराच ) शिक्षण घेतल होत. आमच्या शहरावर बॉबहल्ला व्हावा नि जनतेला आमच्या ज्ञानाचा फायदा व्हावा अशी आमची फार इच्छा होती. त्याची आम्ही रोज वाट पाहात होतो, पण चार वर्ष होऊन गेली आणि आमच्या ज्ञानावर गज चढण्याची वेळ आली तरी आमच्या शहरावर एकहि बॉब पडला नाही. तेच आम्हीं इग्लडात नाहीतर जर्मनीत असतो तर ? आमच्या ज्ञानाचा किती उपयोग झाला असता ! आम्हाला आमच्या कर्तव्यतत्परतेबद्दल व धाडसाबद्दल पदव्या आणि बिल्ले मिळाले असते. हिंदुस्थानात कुठल्याच कलाना उत्तेजन मिळत नाही अस म्हणतात, तेच खर.

पुढ कलकत्ता, चितगाव वगैरे शहरावर बॉबहल्ले झालेले वाचून आम्हाला हुरूप चढला व रोज आम्ही एखाद जपानी विमान दिसत का, हे पाहाण्याकरता आकाश धुडाळू लागलो, पण आम्हाला उत्तेजन न देण्याचं जपानी युद्धमत्र्यानहि ठरविल होत की काय कोण जाणे ! की त्याच्याजवळ असलेल्या हिंदुस्थानच्या नकाशात आमच शहरच मुळीं नव्हतं कुणास ठाऊक ! तें काहीं असल तरी रोज आमची निराशा होई हें मात्र खर.

कलाना उत्तेजन न देण्याची हिंदुस्थानातील लोकाची प्रथा असली, तरी ज्याना उत्तेजनार्ह कलाना उत्तेजन देण्याची हौस आहे असे काहीं लोक हिंदुस्थानातहि तुरळक सापडतातच. एक दिवस सध्याकाळीं आम्हीं

गावाबाहेर हॉस्पिटलच्या बाजूला फिरायला गेलो असता आमच्या कलेला उत्तेजन देणारा असा एक माणूस आम्हाला भेटला

अखेरीस आमच्या विद्येच चीज करण्याची सधी आम्हाला आणून दिल्याबद्दल आम्ही त्याचे मनातल्या मनात आभार मानले. मोठ्यान आभार मानून काही उपयोग नव्हता. कारण आमच बोलण त्याला ऐकू जाण शक्य नव्हत !

रस्त्याच्या बाजूला तो काहीहि हालचाल न करता पडला होता. त्याचे कपडे अस्ताव्यस्त होते. शरीराच्या एकदोन भागातून रक्तस्राव चालू होता आणि जमिनीवर रक्ताचे डाग पडले होते. तो बेशुद्ध आहे हे आम्ही तात्काळ ओळखल. आमच्या फर्स्ट–एडच्या ज्ञानाचा फायदा आम्हाला त्याला देता येणार म्हणून आम्ही आनदित झालो पण छे ! हे आमच्या त्या वेळच्या भावनाच यथातथ्य वर्णन नव्हे. खर पाहता त्या वेळच्या आमच्या भावना स्पष्ट आणि पूर्णतेन व्यक्त करण्यास माझी लेखणी असमर्थ आहे. पण स्वप्नात प्रेम बसलेल्या अनिरुद्धाच प्रत्यक्ष दर्शन झाल्यावर उषेला जें काही वाटल असेल, तसच काहीस आम्हाला वाटल, अस म्हटल तर ते फारस चुकीच होणार नाही.

पण लवकरच आमच्या विद्येची कसोटी लागण्याचा हा पहिलाच प्रसग असल्यामुळ व अशा वेळी प्रथम काय करायचं हे नक्की माहीत नसल्यामुळ आम्ही थोडा वेळ गागरून गेलो आणि एकमेकाच्या तोडाकडे पाहू लागलो. ह्या निष्क्रियावस्थेतून गपूनानाना प्रथम वाचा फुटली. ते म्हणाले, “ अपघात झालेला दिसतोय् ! ”

“ एखाद्या मोटारीचा धक्का लागून फेकला गेलेला दिसतोय् ! ” सदोबाच्या मेदूतील चक्रहि आता फिरू लागली.

“ ते तर स्पष्टच दिसतय् ! पण आता पुढ काय करायच ? अशी अपघाताची केस दिसताच प्रथम काय केल पाहिजे ? ” मी एकदम वस्तुस्थितीला हात घातला.

“ प्रथम एकाद्या डॉक्टरला बोलावण पाठवाव किवा हॉस्पिटलमध्यें

पोचवण शक्य असल्यास तस कराव ! " सदोबानी आपल्या फर्स्ट-एडच्या ज्ञानाच प्रदर्शन केल

" खरच ! " एक समाधानाचा सुस्कारा टाकून गगूनाना म्हणाले, " हॉस्पिटलहि समोरच आहे ! आपण ह्याला उचलून नेऊ या शाबास सदोबा, अजून फर्स्ट-एडची तत्व चागलीच लक्षात आहेत की तुमच्या !

पण गगूनानाच्या ह्या स्तुतीन सदोबाच्या शरीराचा परीघ वाढण्या-पूर्वीच मी जराशा रागान म्हणालो, " वा ! वा ! ही छान फर्स्ट–एड आहे ! अशा केसेसना जर हॉस्पिटलमध्ये नेऊन पोचवण्याच मुडदेफरासाचच काम करायच होत, तर येवढ फर्स्ट–एडच शिक्षण घेतल तरी कशाला ? "

माझ्या दोघा मित्रावर माझ्या ह्या सूर्याजी मालुसरे छाप आवेशपूर्ण भाषणाचा खूपच परिणाम झाला मीहि कोटटोपी काढून अस्तन्या वर सारल्या व आम्ही सारेजण त्या माणसाची प्राथमिक तपासणी करू लागलो. ही तपासणी सुलभ व पद्धतशीर व्हावी म्हणून आम्ही त्या माणसाचे तळ-मजला, मधला मजला व वरचा मजला असे तीन भाग कल्पून ते आम्ही तिघात वाटून घेतले.

मी त्याच्या माड्या व पाय ह्याचा ताबा घेतला, गगूनाना त्याच्या पोटात ढुसक्या देऊ लागले व त्याची नाडी नि हृदय ह्याचा शोध करू लागले, तर सदोबा तिसऱ्या मजल्यावरील खिडक्या आणि छपरावर उगव-लेल गवत ह्याच सशोधन करू लागले.

" माडीच हाड मोडलेल दिसतय्. " मी म्हणालो.

" डोक्यातून रक्तस्राव चालू आहे. " सदोबा म्हणाले.

" सापडली ! " गगूनाना ओरडले.

" काय ? " आम्ही आश्चर्यान विचारल.

" नाडी. " गगूनाना म्हणाले.

" नाडी ? " मीं आश्चर्यान विचारल " पायजम्याची नाडी सापडली तर त्यात येवढ ओरडायला काय झाल ? "

" पुरे बाळोबा ! ही थट्टा करण्याची वेळ नाही ! " हे बोलताना

गगूनानाच्या डोळयात अग्निक्षेपक ठेवलेले असावेत असा मला भास झाला. माझा थट्टा करण्याचा उद्देश नव्हता. अशा प्रसगी थट्टा करू नये, हें काहीं मी गगूनानाकडून शिकायची जरूरी नव्हती! त्या गडबडीच्या वेळी माणसाच्या शरीरातहि एक नाडी असते हे मी पार विसरून गेलो होतो.

" शॉक झालाय् त्याला! " गगूनाना म्हणाले, " प्रथम शॉकवर उपचार केले पाहिजेत. पाणी आणा पाहू थोड. "

पण आता गावापासून इतक्या दूर पाणी कुठून आणणार? आम्हीं आसपास पाहिल. विहीर खणल्याशिवाय काही आम्हाला पाणी मिळाल नसत! अर्थात् जवळच हॉस्पिटल होत, तिथ पाणी मिळाल असत. पण हॉस्पिटलचीच मदत घ्यायची, तर आम्ही येवढ शिकलो होतो त्याचा उपयोग काय?

" पाणी कुठून आणणार! " सदोबानी विचारल.

" कुठून आणणार! " गगूनाना वेडावून म्हणाले, " आणि हे म्हणे फर्स्ट एड करणार! लाथ मारीन तिथ पाणी काढीन अशी हिंमत पाहिजे माणसात! बर, मग कॉफी तरी आणा. "

आम्हीं पुन्हा आजूबाजूला पाहिल. सार ओसाड होत. आपण नीलगिरीच्या टेकड्यावर आहोत अशी गगूनानाची समजूत होण्यासारख आसमतात् काय होत हे आम्हाला कळेना!

" नाहीतर ब्रँडी द्या थोडी. " गगूनाना सदोबाकडे पाहून म्हणाले. सदोबानी आपल्या कोटाच्या आतल्या खिशात ठेवलेली ब्रँडीची बाटली नाइलाजान बाहेर काढली आणि गगूनानाना दिली. गगूनानानी बाटली त्या जखमी माणसाच्या तोडाला लावली. त्यान एक घुटका घेताच सदोबाच तोड ब्रँडी प्यायल्याप्रमाणं वाकड झाल.

" पुरे झाली! " गगूनानाच्या हातून बाटली काढून घेण्याचा प्रयत्न करीत सदोबा म्हणाले.

" आणखी दिली पाहिजे थोडी. " गगूनाना करड्या स्वरात म्हणाले आणि त्यानीं ती बाटली त्या जखमी माणसाच्या घशात रिकामी करण्यास

सुरवात केली. तो माणूसहि जणू तेवढ्यापुरताच शुद्धीवर येऊन भिटक्या मारीत ब्रँडी पिऊ लागला! ते दृश्य पाहून सदोबाचा जीव मात्र खालीवर होत असावा अस मला दिसून आल. खास अशाच प्रसगी उपयोगी पडावी म्हणून आपण ही बाटली नेहमीं खिशात बाळगतो, अस सदोबा ज्याला त्याला सागत. मग ती अशी सदुपयोगी पडत असताना त्याना अस का वाटाव, ह्याच मला नवल वाटल!

अखेरीस जवळजवळ अर्धी बाटली खलास झाल्यावर सदोबानी ती बाटली गगूनानाच्या हातून हिसकावून घेतलीच. एकवार आमच्याकडे कावऱ्याबावऱ्या नजरेन त्यानी पाहिल आणि बाटली तोडाला लावून त्यानी दोन घोट घटाघट गिळून टाकले! नतर आम्ही काहीहि विचारल नसताना, तोड पुशीत त्यानी स्पष्टीकरण केल, "ह्या माणसाची ही अवस्था पाहून माझ्यावर भलताच मानसिक ताण पडला आहे, म्हणून घेतली थोडीशी!"

मीं आणि गगूनानानी त्याच्याकडे एका विवक्षित दृष्टीन पाहिल. त्या डोळ्याच्या भाषेत उच्चारलेल्या वाक्याच साध्या मराठीत भाषातर करून सागायच झाल तर ते अस सागता आल असत—'मग आमच्याहि मनावर विलक्षण ताण पडला आहेच की!' पण त्या वेळी सदोबाचे मदिराक्ष आमच्या डोळ्याशी बातचीत करण्यास नाखूष दिसले. शातपणान त्यानी ती बाटली आपल्या कोटाच्या आतल्या खिशात बदिस्त करून टाकली.

मघापासून तो माणूस बेशुद्धावस्थेत असल्यामुळ एकहि शब्द बोलला नव्हता. पण आम्ही पाजलेल्या सजीवनीन हा वेळपावेतो तो पुष्कळच बोलू लागला होता. त्याच तें बोलण असबद्ध होत व आम्हाला कळत नव्हत हें खर, परतु तो आता आमच्या उपचारानी शुद्धीवर आला आहे, ह्या विचारान आम्हाला आनद झाला.

"ह! चला. शॉकची ट्रीटमेंट तर झाली. आता पुढ दुसरे उपचार!" गगूनाना म्हणाले.

"ह्याच्या माडीच हाड मोडलय्." मी म्हणालो, "त्याला स्प्लिंट बाधली पाहिजे."

"स्प्लिंट! इथ कुठली आलीय् स्प्लिंटन् ब्लिंट?" गगूनाना उद्गारले.

" आता हॉस्पिटलमधेच करतील ते सार. " सदोबा म्हणाले.

" वा ! वा रे फर्स्ट-एड ! " माझे मित्र फर्स्ट एडच्या विद्येचा उपयोग करण्याची ही सुवर्णसधी अशा रीतीन वाया दवडीत असलेले पाहून मी दुःखपूर्ण स्वरात म्हटल, " स्प्लिट नसेल तर काठी बाधावी. "

" पण आपल्याजवळ काठी तरी कुठ आहे ? " सदोबा म्हणाले.

" मग काठीहि नसेल तर छत्री बाधावी ? " फर्स्टएडच माझहि ज्ञान काही कमी नव्हत.

" छत्री ? " दोघानी आश्चर्यान विचारल

" हो छत्री ! तस पुस्तकात लिहिलेल विसरला वाटत तुम्ही ? " मीं जरा टोचूनच विचारल.

" पण ह्या थडीच्या दिवसात आणि सध्याकाळच छत्री घेऊन कोण बाहेर पडतय् ? " गगूनाना मला मूर्खात काढण्याचा प्रयत्न करू लागले.

" हे पाहा ! " मी निश्चयात्मक स्वरात म्हणालो, " मी ह्याचा पाय असा धरून बसतो. तुम्ही घरी जाऊन एक छत्री घेऊन या पाहू. ह्याला छत्रीचीच कामचलाऊ स्प्लिट करून बाधली पाहिजे ! "

" ह, सदोबा " छत्रीविषयीचा माझा हट्ट पाहून गगूनाना म्हणाले " झटकन् घरीं जाऊन एक छत्री घेऊन या पाहू. "

" माझी छत्री फाटलीय् हो. " सदोबा म्हणाले.

" नाहीतर माझ्या घरून आणा की ! " गगूनाना म्हणाले. " माळ्यावर अडगळींत सापडेल. "

" पण फाटकी छत्रीदेखील चालेल की. " मी म्हटलं, " तिची दाडी आणि काड्या शाबूत असल्या म्हणजे झाल. "

" पण पण अजून मला ह्या डोक्यावर उपचार करायचे आहेत ना ! " सदोबानी खोडून न काढता येण्यासारखा मुद्दा उपस्थित केला. अर्थात् मग गगूनानानाच जाव लागल. त्याच्या ताब्यातील मजला आता दुरुस्त झाला होता तरी त्याची काही जाण्याची इच्छा दिसली नाहीं. " डोक्यांचंच काम करण्याची लायकी आहे तुमची ! " अस सदोबाना म्हणून ते

अखेरीस घरून छत्री आणायला निघाले. त्याचे ते शब्द ऐकून सदोबानी माझ्याकडे विजयी मुद्रेन पाहिल. ' डोक्याच काम ' ह्या शब्दामधून त्यानी आपणाला अनुकूल असा श्लेष काढला असावा.

बराच वेळ झाला. ' भगवान् सहस्ररश्मि ' अस्ताचलावर गेला तरी गगूनाना उगवण्याच काहीच चिन्ह दिसेना. त्या माणसाचा पाय घट्ट धरून माझ्या व डोक धरून सदोबाच्या हाताना आता चागलीच रग आली होती मधूनमधून तो माणूसहि इथ न लिहिण्यासारखे शब्द उच्चारून, उठून जाण्याकरता मस्ती करी. त्याला दाबून ठेवता ठेवता आम्ही घामाघूम होऊन गेलो होतो. अखेरीस गगूनानाची बराच वेळ व्यर्थ वाट पाहून सदोबा म्हणाले,

" हे पाहा बाळोबा, गगूनानानी बहुतेक कारखान्यात छत्री तयार करण्याची ऑर्डर दिलेली दिसतेय्. तर आपण पायाचे उपचार तूर्त तहकूब करून डोक्यावरचे उपचार करून टाकूया तोपर्यंत गगूनाना आले तर ठीकच, नाहीतर मग आपणच ह्याला हॉस्पिटलमधे घेऊन जाऊया. "

सदोबाच बोलण इतक तर्कशुद्ध होत, की आता पायाचे उपचार बेमुदत तहकूब ठेऊन डोक्याच्या उपचाराना प्रामुख्य देण मलाहि भाग होत. आपल्या विद्येचा त्या माणसाच्या पायाला काहीहि फायदा मिळू नये ह्याच जरी मला वाईट वाटल तरी त्याला आता नाइलाज होता

" डोक्यातून रक्तस्राव चालला आहे, त्यावर आता इलाज केला पाहिजे. " सदोबा म्हणाले.

" जखम घट्ट दाबून धरा म्हणजे थाबेल. " मी म्हणालो.

" मघापासून माझा तोच प्रयत्न चालला आहे. पण ह्या केसाच्या जगलात जखमच मुळी सापडत नाही ! अदाजान निरनिराळया ठिकाणी दाबून पाहिल, रक्तस्राव मात्र थाबत नाही. "

" मग आता काय करायच ? "—काळजीच्या स्वरात मी.

" आवळपट्टी ( टूर्निकेट ) बाधली पाहिजे. " सदोबा विचार करून म्हणाले, " रक्तस्राव होणारा शरीराचा अवयव आणि हृदय ह्याच्यामध्यें

रुमाल, पट्टी अस काही तरी चागल आवळून बाधल पाहिजे. म्हणजे त्या स्रवणाऱ्या भागाचा रक्तप्रवाह तोडला जाऊन रक्तस्राव थाबतो."

"पण इथ कुठ बाधणार आवळपट्टी ?"—शकेखोर मी.

"का ? जरा विचार केला की समजेल. डोक आणि हृदय ह्याच्या-मधे शरीराचा कुठला भाग आहे ?"—सदोबा.

"मान !"

"बरोबर ! मग मानेलाच बाधली पाहिजे आवळपट्टी."

येवढ बोलून सदोबानी खिशातून आपला रुमाल काढला व त्या माणसाच्या गळ्याभोवती आवळपट्टी बाधण्यास सुरवात केली देखील ! सदोबा ही आवळपट्टी बाधीत असता त्या माणसाची धडपड सुरू झाली. तेव्हा सदोबा म्हणाले, "भलतीच चढलेली दिसतेय् बेट्याला ! तरी मी गगूनानाना सागत होतो, त्याला फार पाजू नका म्हणून !"

अखेरीस त्या माणसाच्या छातीवर गुडघे टेकून आणि त्याचे धडपडणारे दोन्ही हात घट्ट दाबून धरून आम्ही त्याच्या गळ्याला रुमाल चागला करकच्च आवळून बाधलाच ! पण ती आवळपट्टी तो माणूस फार वेळ ठेवून घेईल अस चिन्ह दिसेना. त्यान ती पट्टी सोडली की रक्त-स्राव पुन्हा सुरू होण्याची भीति होती. गगूनानाहि अजून छत्री घेऊन आले नव्हते. तेव्हा त्याच्या येण्याची आशाहि आम्हीं सोडली होती. आवळपट्टी सोडण्याची त्याची धडपड यशस्वी होण्यापूर्वीच त्याला हॉस्पिटलमध्यें पोच-विण जरूर होत. आम्ही दोघानी त्याला कसबस उचलून घेतल आणि हॉस्पिटलमध्यें घेऊन गेलो. एवढ्यात छत्री घेऊन गगूनानाहि येऊन पोचले. त्या माणसाला खाली ठेवून आम्ही तिघे डॉक्टर येण्याची वाट पाहात बसलों.

त्या माणसाच्या श्वासोच्छ्वासाबरोबर बाहेर पडणाऱ्या ब्रँडीच्या वासानं सारी खोली भरून गेली होती. डॉक्टरानीं खोलीत पाऊल टाकताच आपल्या नाकाला रुमाल लावला आणि त्यानीं आम्हा तिघाकडे काहीं विचित्र नजरेनं पाहिल. थोडा वेळ ते गगूनानाच्या हातातील छत्रीकडे पाहात राहिले

आणि मग त्यानी हसत विचारल, “ का हो, बाहेर बराच पाऊस पडतोय्‌ वाटत ? ”

येवढ बोलून डॉक्टरानी आपल्या सहकाऱ्याकडे डोळे मिचकावून पाहिल व गगूनानाच्या उत्तराची वाट न पाहता ते खाली वाकून आम्हीं आणलेल्या माणसाची पाहणी करू लागले. त्याला पाहून झाल्यावर त्यानी आम्हाला विचारल, “ ह्या तुमच्या मित्राच नाव काय ? ”

“ माहीत नाही आम्हाला ! ” सदोबा म्हणाले.

डॉक्टराचा हा विचित्र प्रश्न ऐकून आम्ही एकमेकाकडे प्रश्नार्थक दृष्टीनी पाहात आहोत तो डॉक्टरानी आमच्याकडे मघाच्या त्या सशयी दृष्टीन परत एकदा पाहिल आणि त्या माणसाच्या गळ्यावरील रुमाल ते सोडवू लागले. ह्या वेळपावेतो त्या माणसाची धडपड बद झाली होती आणि तो स्वस्थ पडून होता रक्तस्राव थाबल्यामुळ त्याला बर वाटल असाव. त्याच्या गळ्याचा रुमाल सोडवून डॉक्टरानी विचारल, “ आत्महत्त्या करण्याचा विचार होता की काय ह्या तुमच्या मित्राचा ? ”

“ नाही. आम्हीच बाधलय्‌ त. ” सदोबा ऐटीत म्हणाले.

“ तुम्ही बाधलय्‌ ? ते का ? ” डॉक्टरानी आश्चर्यान विचारल.

“ फर्स्ट-एड आहे ती ! रक्तस्राव थाबवण्याकरता बाधलेली आवळपट्टी आहे ती. ” फर्स्ट-एडच सार श्रेय सदोबाना मिळू नये म्हणून मी मध्येच म्हणालो.

डॉक्टराना आमची ही कल्पना नावीन्यपूर्ण वाटलेली दिसली. कारण आपल्या सहकाऱ्याकडे वळून हसत हसत ते म्हणाले, “ फर्स्ट एडचा हा नवीन प्रकार पाहिला आज ! ”

नतर त्या माणसाची स्ट्रेचरवरून वॉर्डात रवानगी करून डॉक्टर आम्हाला म्हणाले, “ तुम्ही आता घरी जा आणि पहिल्यान थडगार पाण्यान स्नान करा. आणि उद्या सकाळी आपल्या मित्राच्या चौकशीला या ! ”

डॉक्टरानीं त्या माणसाचा आमचा मित्र म्हणून परत परत का उल्लेख करावा आणि घरी जाऊन गार पाण्यानं स्नान करण्याचा सल्ला आम्हाला

का द्यावा, हें आम्हाला समजेना ! डॉक्टरानी एखादा पेगबिग तर मारलेला नसावा ना, अशी आम्हाला शका आली. पण त्यावर फारसा विचार न करता घरी जाण्याकरता उठता उठता आम्ही त्याना विचारल, " पण बरा होईल ना तो ? "

" होईल तर. त्याच्या आयुष्याची दोरी बळकट दिसते उपचार करायला आणखी पाचच मिनिटाचा उशीर झाला असता, तर मात्र काही सागता आल नसत ! "

त्याच हे उत्तर ऐकून आम्हाला समाधान वाटल. कुणी काही म्हणो, आमच्या फर्स्ट-एडच्या ज्ञानाचा एका जीवाला वेळीच उपयोग झाला व त्यामुळ त्याचा जीव अगदी थोडक्यात बचावला ह्या विचारान आमच्या विद्येच सार्थक झाल्याप्रमाण आम्हाला वाटल !

# काकू फॅशन करूं लागल्या

" कांही काही माणसच अशी असतात, की काहीहि फॅशन केलेली त्याना शोभून दिसते, आणि काही माणस अशी असतात की त्यानी कितीहि फॅशन केली तरी त्याच्या रूपाला उठाव मिळत नाही. उलट, आपणाला न शोभणारी फॅशन करण्याच्या अट्टाहासान अशी माणस स्वत.ला हास्यास्पद मात्र करून घेतात. आमच्या ×× चहि असंच झाल "

प्रभाकरच्या गोष्टीची ही सुरवातीची वाक्ये वाचताच नलूने ओळखले की ही गोष्ट आपणावरच लिहिलेली आहे. तिने मोठ्या उत्सुकतेने ती गोष्ट भराभर वाचून काढली. ती करीत असलेल्या फॅशनची त्यात टर उडवलेली असली, तरी तिला त्याचे वाईट वाटल नाही. उलट, त्यातील विनोदाने तिला हसूंच आले. ती स्वतःशीच म्हणाली, 'खरच, किती वेडेपणा करीत आहोत आपण!' तिने ती गोष्ट फिरून एकदा वाचून काढली. त्या वेळीं ती गोष्ट वाचून तिच्या हृदयाला गुदगुल्या झाल्या. कारण, त्या गोष्टींतील अवखळ विनोदाच्या फेसाखाली, प्रभाकराच्या तिच्याविषयीच्या भावनाचीं मोतीं लपलेली तिला आढळून आली. तिच्या मनाला विलक्षण हुरूप चढला. चटकन् ती बिछान्यावरची उठली आणि आघोळीच्या खोलीत गेली. दोन-तीनदा साबण लावून आपले तोड चागलें धुवून काढल्यावर, टुवालाने ते पुसता पुसता तिनें आरशात पाहिलें. नतर इतक्या दिवसाच्या सरावाप्रमाणे तिचा हात पावडरीच्या फुलावर गेला. पण लगेच ते फूल तिने परत डब्यात ठेवून दिलें, आणि झटकन् त्याच झाकण लावून टाकलें.

आरशात तिचा चेहरा पूर्वीसारखाच काळासावळा दिसत होता. पण त्याचे तिला आज वाईट वाटले नाही. आरशासमोर उभे राहणे हे तिला आज रोजच्याप्रमाणे एक सकट वाटले नाही. आज तिच्या मनाला अगदी मोकळे मोकळे वाटत होते. आरशासमोर उभे राहिले की एखाद्या सौंदर्याचे धडे देणाऱ्या मास्तरसमोर उभ राहिल्याप्रमाण, इतके दिवस तिला वाटे. त्याच्या सूचनाप्रमाणे निरनिराळ्या सौंदर्यप्रसाधनाचा उपयोग करताना, शाळेत एखाद्या मट्ठ मुलाला व्हावेत, तसे तिला कष्ट होत. त्या आरशाची तिला एक प्रकारची भीतिच वाटू लागली होती. पण आता ती त्याच्यासमोर अगदी निर्भयपणाने उभी होती. मोठेपणी, आपले लहानपणचे एखादे कडक मास्तर भेटल्यावर, 'ह्याना आपण इतक का बर भीत होतो' असा विचार मनात येऊन, आपणाला त्याचे आश्चर्य वाटते, तसाच काहीसा प्रकार आरशाच्या बाबतींत तिचा झाला होता ती त्याला म्हणाली, 'किती त्रास दिलास तू माझ्या मनाला इतके दिवस! किती भीत होते मी तुझ्या परीक्षेला!' इतके दिवस त्याच्यासमोर उभे राहिले, की आपला स्वभाव त्रासिक आणि चिरचिरा झाला आहे असे तिला वाटे, पण आज त्याच्यासमोर उभी असताना आपला नेहमीचा आनदी नि विनोदी स्वभाव परत आलेला पाहून तिला आनद झाला.

आरशात पाहता पाहता, ज्या आपल्या रूपाला फॅशनची मदत घेऊन सुदर बनविण्याचा ती इतके दिवस प्रयत्न करीत होती, त्याची तिला थट्टा करावीशी वाटली. जणू काय, पुष्कळ दिवसानी परत आलेल्या तिच्या विनोदी स्वभावाला आपल्या जुन्या मैत्रिणीची भेट होताच तिची थोडीशी थट्टा करावीशी वाटली. तो तिच्या रूपाचें वर्णन करू लागला.

'काळा राम घडविताना मूर्तिकारान ज्या रगाच्या दगडाची निवड केली, तोच रग ब्रह्मदेवान तुला घडविताना वापरला आहे. तुझ्या डोक्यावरील केसाना फारच पाठीमागे सुरवात झाली आहे. त्यामुळे तुझ कपाळ खूपच मोठ दिसत आहे. ठराविक छापाचं वर्णन करायच झाल तर, तुझा भालप्रदेश भव्य आहे नी तो तुझ्या बुद्धिवैभवाचा निदर्शक आहे असहि म्हणता येईल. पण सध्या मी तुझ्या बुद्धिमत्तेपेक्षा तुझ्या रूपाचच वर्णन करीत

असल्यामुळे, पहिल वर्णनच अधिक लागू पडत. तुझ्या नासिकेला ‘ नासिका ’ हा नाजुक आणि काव्यपूर्ण शब्द योग्य नाही. त्याला ‘ नाक ’ हा साधासुधा शब्दच यथार्थ आहे. तुझे डोळे काळेभोर नाहींत की टपोरेहि नाहीत. तुझ्या अतर्मुख स्वभावाचे ते निदर्शक असले तरी ते बारीक, पिगट आणि खोलगट आहेत, हीच वस्तुस्थिति आहे. तुझ्या जिवणीला ‘चिमुकली’ हे विशेषण फारच अपुर पडत. बोलताना किवा हसताना—आणि तू हसतेसहि फार—तू तोंड उघडलस की त्यातून तुझी बत्तिशी, जीभ, पडजीभ, टॉन्सिल्स आणि घशाची मागची बाजू, येवढ विश्वरूपदर्शन घडत. तुझ्या शरीराला रुदी अशी नाहीच. तारुण्याच्या आगमनान स्त्रीच्या शरीरावरचे जे भाग बहरतात आणि पुष्ट होतात, ते तुझ्या शरीरावरचे भाग जवळजवळ सपाटच आहेत. एखादी उपमा द्यायचीच म्हटली—कारण स्त्रीच्या रूपाच वर्णन करताना उपमाची नी उत्प्रेक्षाची उधळपट्टी करावी, असा कविसकेत आहे—तर तुझ्या शरीराला किंचित् पोक आलेल्या एखाद्या माडाचीच उपमा देता येईल. थोडक्यात सागायच म्हणजे तू कॉलेजात शिकणारी मुलगी असलीस तरी एखाद्या ‘ काकू ’ सारखीच दिसतेस !’

‘ काकू ’ हा शब्द डोक्यात येताच नलू खुदकन् हसली आणि त्याच्या पाठोपाठ एका वाक्याची आठवण होऊन तर तिला जास्तच हसू आल. ‘ काकू फॅशन करू लागल्या ’—हेच ते वाक्य होय.

गेल्या तीनचार महिन्यातील काहीं प्रसग तिला आठवले आणि आपल्या वेडगळपणाचे तिला हसू आले. ती पुन्हा स्वगत उद्गारली, ‘ काकू फॅशन करू लागल्या !’

नलू दिसायला सुदर नसली तरी तिनें कुणावर प्रेम करू नये, असे थोडेच होते ! तिच्या कॉलेजातील लेक्चरर, व नुकतेच नाव होऊ लागलेला एक लेखक, प्रभाकर, ह्याच्याकडे तिचे मन आकर्षिलें गेले होते. आणि तेव्हापासूनच आपणाला न शोभणारी फॅशन करण्याचा वेडेपणा ती करू लागली होती.

“ आपणच का नलिनी देशमुख ? ” अगदीं पहिल्या भेटीत प्रभाकरने तिला विचारलें होते. आणि नलूनें होकारार्थी मान हलवून स्मित केले होते.

" कॉलेजच्या त्रैमासिकातली तुमची गोष्ट छान आहे. फार आवडली मला. लेखनाचा अभ्यास तुम्ही असाच चालू ठेवलात, तर लवकरच लेखिका म्हणून नाव कमवाल."

त्याच्या ह्या अनपेक्षित स्तुतीने ती गोंधळून गेली होती. तो उगाच तोंडदेखली स्तुति करीत नाही ना, म्हणून तिने हळूच त्याचा चेहरा निरखून पाहिला. पण तो अगदी मनापासून बोलतो आहे, असे तिला दिसून आले. तिच्याविषयीं वाटणाऱ्या कौतुकाचे प्रतिबिंब त्याच्या उमद्या चेहऱ्यावर पडलेले होतें. तो पुढे म्हणाला. " लेखकाला आवश्यक असणारी अंतर्मुख दृष्टि तुम्हाला आहे. खरंच, असंच चालू ठेवा तुमचं लेखन."

त्यानंतर गोष्टी लिहून झाल्या, की ती त्या प्रभाकराला दाखवी, आणि मग तीं दोघे त्यावर चर्चा करीत. ह्यातूनच त्यांची ओळख वाढत गेली.

तेव्हापासूनच त्याचें मन जिंकण्याची तिची धडपड सुरू झाली होती. केव्हा केव्हा तर प्रभाकरसारख्या सुंदर, आणि हुशार तरुणाच्या प्राप्तीची आपण आशा धरणं म्हणजे निव्वळ वेडेपणा आहे, असे तिला वाटे. त्याच्याभोवती कॉलेजातील सुंदर सुंदर नी फॅशनेबल मुलींचा गराडा पडलेला असे. विनोदी स्वभावाच्या प्रभाकराने केलेल्या कोट्यांनी त्यांच्यात जेव्हा हास्याचे फवारे उडत, तेव्हा ती अगदी निराश होई. पण आशा करायला तिलाहि थोडीशी जागा होती. मुलींची प्रभाकर वाटेल तशी थट्टामस्करी करी,—त्यांच्यासमोर वाटेल तसं अचकटविचकट बोले. पण तिच्या सहवासात मात्र तो एकदम सभ्य होई. ज्याला पोरकटपणाचा वासहि येणार नाही, असा सोज्वळ विनोद तेवढाच तो तिच्यासमोर करी. तो जेव्हा तिच्याकडे पाही, तेव्हा इतर मुलींकडे पाहताना त्याच्या डोळ्यात कधींहि तरळत नसत असे स्निग्ध भाव त्याच्या डोळ्यात तरळताना तिने पुष्कळदा पाहिले होते. आपणाविषयीच्या त्याच्या भावना, काहींतरी निराळ्या, अधिक पवित्र आहेत, असे तिला वाटे, आणि ह्याच भावनांचे पुढेंमागे कधींतरी प्रेमात रूपांतर होईल अशी तिला आशा वाटू लागे.

त्यामुळे त्याचें मन जिंकण्याची तिची धडपड सुरू झाली. ह्यासाठी तिला त्याच्याभोवतीं नाचणाऱ्या मुलींशीं स्पर्धा करावी लागणार होती. त्या

मुली फॅशन करीत. अर्थात् तिने विचार केला, त्याच्याशी टक्कर द्यायची म्हणजे आपणालाहि त्याच्यासारखीच फॅशन केली पाहिजे. ज्या शत्रूशीं लढायचे आहे त्याच्याशी तो वापरीत असलेल्या शस्त्रास्त्रानीच लढले पाहिजे हा युद्धशास्त्रातील दडक तिला ठाऊक होता. शिवाय, कुठल्याशा एका नाटकात, 'शृगार करा, आणि आपल्या नवऱ्याना मुठीत ठेवा' असा सदेश एका नाटककाराने स्त्रियाना देऊन ठेवलेला तिला आठवत होता. सर्व बाजूनीं असा विचार करून, तिने मग फॅशन करण्याचे ठरविले,—आणि मग 'काकू' फॅशन करू लागल्या!

ज्या दिवशी पाच वारी पातळ नेसून ती कॉलेजात प्रथमच गेली, त्या दिवशी कॉलेजात 'न भूतो न भविष्यति' अशी खळबळ उडाली. आपली वेषभूषा सुधारण्याच्या मोहिमेतील पहिला हल्ला तिने आपल्या कासोट्यावरच चढविला होता, नी तो बिचारा त्यापुढ नेस्तनाबूद होऊन गेला होता. विकच्छ पातळ नेसून ती कॉलेजात जायला निघाली, तेव्हा तिला कसेसेच वाटत होते. तिला राहून राहून भास होई, कीं आपण नेहमीप्रमाणे लुगडच नेसलो आहोत, पण अचानक काही तरी गोधळ झाला आहे तिचा हात घडीघडी कबरेच्या पाठीशी जिथे कासोटा खोवतात, त्या जागी जाई. पातळाच्या भोगळाचा घेर तिच्या लाब टागाना अपुरा पडे, आणि चालताना तिला अडखळल्यासारखे होई. एकदोनदा तर पाय वाकडा-तिकडा पडून पडता पडता तिने मोठ्या मुष्किलीने स्वत.ला सावरून घेतले होते. कॉलेजात गेल्यावर आपली टिगल होणार, ह्याविषयीं तर तिची खात्रीच होती. आणि तिने 'लेडीज रूम'मध्ये पाऊल टाकताच, प्रथम क्षणभर सर्वत्र शात होऊन, मग जो एकदम एकच हास्यध्वनि उठला, त्याने तिला त्याविषयीं काहींच शका उरली नाही.

"अग बाई! आज सूर्य पश्चिमेला उगवला वाटत!" भुवया चढवून एक मुलगी म्हणाली.

"मला वाटल, कुणी सिनेमानटीच चुकून कॉलेजात आली आहे!" हसू आवरता आवरता दुसरी एक म्हणाली.

"काय ग पण नलू, तुझ्या मापाच पातळ नाही का मिळाल तुला? पायाना पाहिलस किती आखूड होतय् ते?" तिच्या पायाकडे पाहून तिसरी म्हणाली.

"नलू, खरच, तुझ्या पोटऱ्या इतक्या सुदर असतील अशी कल्पना नव्हती हो आम्हाला!" चौथी म्हणाली

"आणि पदरहि पहा ना, कबरेपर्यंतदिखील पोचत नाही!" पाचवी म्हणाली.

"गजानन मिल्सला ऑर्डर दे एक स्पेशल लाबरुद पातळाची!" सहावीनें सूचना केली

इतक्यात आणखी एक मुलगी तिच्याजवळ येऊन अगदी गभीर चेहरा करून म्हणाली, "नलू, तुझ्यावर कुणाच प्रेम नाही हे माहीत आहे म्हणून, नाही तर काहीतरी विचारणार होते तुला!"

सर्वांचे लक्ष आपोआपच तिच्या पोटावर आलेल्या पातळाच्या फुगीर भागाकडे गेले, आणि मग हास्याने हॉल भरून गेला!

नलू मात्र काहींच बोलली नाही. हा सारा प्रकार तिच्या अपेक्षेप्रमाणेच चालला होता. 'बोलतील बोलतील नी बसतील गप्प!' ती मनाशीच म्हणाली, 'मीं फॅशन केली आणि सुदर दिसल्ये तर कस खपेल ह्याना!' ह्या विचाराने तिला जरासे समाधान वाटले

तिने वर्गात प्रवेश केला, तेव्हा बाकावर हात आपटण्याचा आणि जमिनीवर पाय आपटण्याचा एकच कल्लोळ होऊन तिचे जगी स्वागत झालें. थोड्या वेळात काहीं लिहायला म्हणून प्रोफेसर फळ्याकडे वळले, पण फळ्याकडे त्याची दृष्टि जाताच ते थबकून उभे राहिले. मुलानी 'स्टॅपिग' करून सारे कॉलेज डोक्यावर घेतले, आणि ओठाना पदर लावून मुली खुद-खुदून हसू लागल्या. नलूनें फळ्याकडे पाहिले. त्यावर मोठ्या अक्षरात लिहिलेलें तिच्या नजरेस पडलें,—"काकू फॅशन करू लागल्या!"

नलू मनाची खबीर होती. ह्या असल्या पोरकट थट्टामस्करीकडे दुर्लक्ष करण्याचें तिनें ठरविलें. ह्याच्या मुळाशी सर्वांना आपणाविषयीं वाटणारा

मत्सरच आहे, असे तिने निदान केले. शिवाय, साऱ्या जगाने तिची टिंगल केली तरी त्याची तिला पर्वा कुठे होती? एक प्रभाकरला ती सुंदर दिसली म्हणजे झाल. काहीतरी निमित्त काढून ती त्याच्याकडे गेली, आणि त्याचा अभिप्राय काय पडतो ते मोठ्या उत्सुकतेने पाहू लागली.

पण प्रभाकर तिच्या फॅशनविषयी काहीच बोलला नाही. त्याने तिला पाहताक्षणीच एकदा स्तिमित दृष्टीने तिच्याकडे पाहिले क्षणभर त्याच्या डोळ्यात मिस्किलपणा खेळून गेल्याचा तिला भास झाला पण तो क्षणभरच. नंतर तो तिच्याशी नेहमीप्रमाणे मोकळेपणाने बोलू लागला. पण त्याच्या त्या दृष्टिक्षेपानेच नलू अस्वस्थ झाली. राहून राहून तिला वाटे, ' आज हे काय गुडाळून आलात? ' असेच त्याची ती दृष्टि विचारीत आहे.

घरी आल्यावर झाल्या गोष्टीचा तिने शांतपणाने विचार केला. प्रभाकराचा आपल्या फॅशनवरचा अभिप्राय न कळल्यामुळे ती जराशी खट्टू झाली होती. मुलींची बोलणी विसरून जाण्याचा ती प्रयत्न करीत होती. पण मधूनच त्यातले एखादे वाक्य तिच्या कानात घुमे, आणि ती मनातल्या मनात चिडे. पण नंतर विचार करता करता तिला वाटे, ' मुलींच्या थट्टेत अगदीच अर्थ नाही असं नाही खरच, आपलं पातळ आपल्याला जरासं आखूडच होतयू. शिवाय आपणाला ते चांगलं चापचोपून नेसताहि आलं नाही. आणि नुसतं विकच्छ नेसून, पण आपला बाकीचा अवतार तसाच कायम ठेवून, काय उपयोग? करायचीच तर फॅशन पूर्ण केली पाहिजे.

ह्याची सुरवात म्हणून मग तिने आपल्या खोलीचे स्वरूप पार बदलून टाकले. मध्यभागी असलेल्या टेबलावरून पुस्तकांचे आणि लेखन-साहित्याचे उच्चाटन होऊन, तिथे तिने आरशाची स्थापना केली. टेबलाचा बाकीचा भाग पावडरीचे डबे, कंगवे, सुवासिक तेलाच्या बाटल्या, नखांचे रंग, नेलकटर, गंगावने, आकडे, लिप्स्टिक इत्यादि सौंदर्यप्रसाधनाचें साहित्य भरून ठेवलेल्या निरनिराळ्या डब्यांनी आणि ' ट्रे 'नी भरून गेला. बाजारातून तिने एकदोन सिनेमाविषयक मासिके आणली, आणि त्यातील नटींच्या फोटोतील वेषभूषेचा ती पद्धतशीर अभ्यास करू लागली. जसजसा

ह्या विषयाचा तिचा व्यासग वाढू लागला, तसतसे तिला वाटू लागलें, छट्! इतके दिवस आपण करीत होतो ती वेषभूषा शुद्ध रानटी होती! वेषभूषाच नव्हती ती मुळीं! इतके दिवस नऊ वारी सकच्छ लुगडे नेसून फिरल्याची तिला लाज वाटू लागली. आपला पोषाख असा रानटी असताना प्रभाकर आपणाशीं बोलत तरी कसे होते, ह्याचेच तिला आश्चर्य वाटू लागले. आरशासमोर ती तासचे तास बसू लागली, आणि आपले सौंदर्य वाढविण्याचे निरनिराळे प्रयोग त्याच्या सूचनाप्रमाणे करू लागली. तिच्या ह्या प्रयोगाचे आणि सौंदर्यशास्त्राच्या गाढ अभ्यासाचे दृश्य परिणाम लवकरच तिच्या शरीरावर दिसू लागले. साधारण महिन्याभरात, सुरवटाचा टोळ व्हावा, तसे तिचे रूप पार बदलून गेले.

बिनबाह्याचे आणि रगीबेरगी पट्ट्यापट्ट्याच्या कापडाचे अगदी अद्यावत् फॅशनचे पोलके ती वापरू लागली. तोंडावर पावडरीचे थरचे थर ती थापू लागली. ओठावर लिप्स्टिक लावून नुकतेच एखादे भयकर रणकदन झालेल्या रणागणाप्रमाणे, तिने ते लाल लाल करून टाकले. कानातल्या मोत्याच्या कुड्या काढून टाकून, बाजारातून आठबारा आण्याना आणलेले निरनिराळ्या रगाचे डूल ती निरनिराळ्या रगाच्या पातळाबरोबर वापरू लागली. पातळ, पोलका, चपला आणि डूल ह्यात रगसगति साधेल, ह्याची ती कटाक्षाने काळजी घेई. नवीन फॅशनच्या बायकी सॅडल्स वापरण्याचे तिच्या मनातून फार होते. परतु, दुर्दैवाने तिच्या पायाच्या मापाची सॅडल पुष्कळशी दुकाने हिंडूनहि न मिळाल्यामुळे अखेरीस तिला त्यातल्या त्यात जरा जुन्या फॅशनच्या जरीच्या चपलावरच भागवावे लागले. आपल्या केसाच्या तिने प्रथम मीनाक्षीप्रमाणे दोन वेण्या सोडून पाहिल्या, पण ही सुधारणा तिची तिलाच भयकर क्रातिकारक वाटली. इतक्या मोठ्या क्रातीचे स्वागत करण्याइतकी ह्या जगाची अजून मानसिक तयारी झालेली नाही असे ठरवून, मग तिने तो विचार रद्द केला, आणि आपल्या केसाचा एकच जाडसा आणि आखूड शेपटा आपल्या पाठीवर सोडून दिला.

पण एवढी सगळी फॅशन करूनहि तिच्या मनाला समाधान असे मिळत नव्हतें. एक तर फॅशन करण्याला तिचे शरीर आणि स्वभावहि अनु-

रूप नव्हता. ती जसजशी नवी नवी फॅशन करी, तसतसा तिच्या मैत्रिणींना तिची थट्टा करायला एक नवा विषय सापडल्यासारखे होई, आणि तिनें वरून जरी दाखवले नाही, तरी मनातून ती त्यामुळे बरीच बेचैन होई. प्रभाकर-साठी तिने ही सारी धडपड चालवली होती, पण जणू काय तिची फॅशन आपणाला दिसतच नाही, अशा रीतीने तो वागे. त्याविषयी तो तिच्याशीं कधी एक शब्दहि बोलला नाही. त्यामुळे तिला केव्हा केव्हा वाटे, आपण उगाचच ह्या फंदात पडलो, आणि स्वतःच हस मात्र करून घेतल ! असे वाटू लागले, की ती आपल्या सौंदर्याच्या मास्तरसमोर—आरशासमोर—उभी राही, आणि त्याचा निर्णय मागे. पण तिची निराशाच होई.

कारण, हा सौंदर्याचा मास्तरहि तोंडपुजेगिरी करण्यात फारच वस्ताद आहे. त्याची सौंदर्यदृष्टि तर इतकी तीक्ष्ण आहे, की सौंदर्याचा मागमूसहि नसलेल्या व्यक्तींत तो सौंदर्य हुडकून काढतो. आणि त्या शोधून काढलेल्या येवढ्याशा सौंदर्याची स्तुति करून त्या व्यक्तीत आपल्या सौंदर्याचा अभिमान उत्पन्न करतो. नलू त्याच्यासमोर उभी राहिली की तिची मनःस्थिति ओळखून तो कधी असा तर कधी तसा, आपला निर्णय देई. केव्हा तो म्हणे, 'वा, छान ! खरच, पूर्वीपेक्षा कितीतरी सुदर दिसतेस तू ! पावडर लावल्यामुळे तू गोरी दिसतेस. बिनबाह्याच्या पोलक्यामुळ तुझा 'स्मार्टनेस्' किती तरी वाढला आहे. मान हलवताना तुझ्या कानातले डूल नाचू लागले, की किती सुदर दिसत ते ! कॉलेजातल्या मुली ना ? अग त्या करणारच तुझी थट्टा ! तुझ्यासारखी हुशार मुलगी फॅशन करून सुदर दिसू लागली आणि प्रभाकरला पटकावून बसली, तर कस खपेल त्याना ?' त्याचें हे बोलणे ऐकून तिला हुरूप चढे, पण मग तिची तिलाच काही शका वाटे, आणि ती मास्तरसमोर पुन्हा उभी राही. तिची मनःस्थिति बरोबर ओळखून मग तो तोंडपुजा मास्तर मोठी नाखुषी दाखवून म्हणे, 'हो बुवा, तुझी फॅशन अगदी परिपूर्ण नाही हे खर आहे. आणि ते होणार तरी कस ? कारण फॅशन करणाऱ्याला जी सौंदर्यदृष्टि आणि अनुकरणप्रियता लागते, ती तुझ्या स्वभावात नाहींच मुळीं. तुझ्या शरीराची रचनाहि फॅशनला योग्य नाहीं. हेच पहा ना, तू पातळ नेसली आहेस, ते नुसत एखाद्या खांबाला गुंडाळल्या-

सारख दिसत आहे. बिनबाह्याचा पोलका वापरून तुझ्या काळ्या आणि मासल नसलेल्या दडाच प्रदर्शन मात्र तू करतेस, जरीच्या चपला घेण्याच्या भरीस पडून, तुझ्या पायाला बरोबर येत नाहीत अशा चपला तू आणल्या आहेस, त्यातून तुझी अर्धी टाच बाहेर पडली आहे. तुझ्या धसमुसळया चालण्यामुळे दोन दिवसात त्याचे पट्टे तुटले, आणि मग ते कोपऱ्यावरच्या चाभाराकडून शिवून घेतल्यामुळे, तुझ्या चपला धेडगुजरी दिसत आहेत. तुझा शेपटा उटाच्या शेपटीसारखा आखूड आणि जाड दिसतो आहे. लिप्स्टिक लावल्यामुळे तुझे ओठ अधिकच जाड आणि मोठे दिसतात. शिवाय तिचा ताबडा रग तुझ्या चेहऱ्याच्या काळया पार्श्वभूमीवर मुळींच खुलून दिसत नाही. तुझ्या कानातील डूल, तुझ्या लाबट आणि विचारी चेहऱ्याला मुळींच शोभत नाहीत. डूल वापरले की चेहऱ्याला एक प्रकारच बालिश स्वरूप येत. तुझ्या चेहऱ्यावरील मूळचा विचारीपणा, आणि लोलकामुळ आलेला बालिशपणा, ह्याच काहीतरी विचित्र मिश्रण होऊन तुझा चेहरा बावळट मात्र दिसतो ' आरशाचे हे बोलणे ऐकून नल्र थोडीशी खट्टू होई. त्याबरोबर तो म्हणे, तरी पण फॅशन तुला अगदीच शोभत नाही अस नाही. पहिल्यापेक्षा तू पुष्कळच चागली दिसतेस ! '

फॅशन करून सुदर दिसण्याची ही तिची धडपड दोनतीन महिने चालली होती. ह्या दिवसात तिने अभ्यासाकडे दुर्लक्ष केले होते, लेखनासाठी लेखणीहि उचलली नव्हती, की प्रभाकराने वाचावयास दिलेल्या पुस्तकावरची धूळ झटकलीहि नव्हती. तिचा सारखा एकच ध्यास होता–फॅशन ! फॅशन ! आपण करतो आहोत ते बरोबर आहे की नाही, प्रभाकराला आपली फॅशन पसत आहे कीं नाही, हें तिला कळत नव्हत. पण ती फॅशन करीतच राहिली.

आणि आज कितीतरी दिवसानीं प्रभाकर तिच्या खोलीवर आला होता. नल त्या वेळीं आरशासमोर बसून, लाब वाढवून त्रिकोणी कापलेल्या आपल्या नखाना लाल रग लावीत होती. आत येताच प्रभाकरनें विचारलें, " आणि हें हो काय ? पानपट्टीच दुकान कधींपासून काढलत ? "

" पानपट्टीचं दुकान ? " गोंधळून नलनें विचारलें, " कुठ आहे पानपट्टीच दुकान ! "

" हे ! " तिच्या ड्रेसिग टेबलाकडे बोट करून हसत हसत प्रभाकर म्हणाला, " हा अरसा, निरनिराळ्या डब्यातून नी ट्रेमधून माडून ठेवलेल्या ह्या जिनसा—ह्याच्याकडे पाहिल की मला पानपट्टीच्या दुकानाची आठवण येते "

" खरच ! दिसतय् खर हे पानपट्टीच्या दुकानासारख ! " त्याची कल्पना आवडून हसत हसत नलू म्हणाली, " आणि पानपट्टी खाऊन ओठ लाल होतात, तसेच ते ह्यहि होतात. "

तिच्या कोटीवर प्रभाकर मनमोकळेपणाने हसला. पण त्याचे हास्य फार वेळ टिकले नाही. तो नेहमींपेक्षा पुष्कळच लवकर गभीर झाला. त्याच्या मनात काहीतरी खटकते आहे, असा नलूला भास झाला ती हसायची पुरती थाबण्यापूर्वीच त्याने प्रश्न केला, " मीं दिलेल पुस्तक झाल का वाचून ? "

" नाही बाई ! " जरासे ओशाळून नलू म्हणाली, " वेळ नाही झाला वाचायला. "

" कसा होईल वेळ ? " प्रभाकर हसून म्हणाला, " अलीकडे स्त्रियाच सर्वात आवडत पुस्तक वाचण्यातच तुमचा सारा वेळ जातो ना ! "

" स्त्रियाच आवडत पुस्तक ! ते कुठल ? "

" हे ! " आरशाकडे बोट दाखवून तो म्हणाला, आणि दोघेहि परत हसली.

ह्या वेळींहि प्रभाकर हसता हसता एकदम गभीर झाला, आणि खिशातून एक पुडके काढून म्हणाला, " मीं एक नवी गोष्ट लिहिली आहे. ती वाचून पहा, आणि तुमचा अभिप्राय कळवा. नीट काळजीपूर्वक वाचा बर का ! केव्हा भेटाल ? "

" आज सध्याकाळीं येऊ ? "

" तोंपर्यंत वाचून होईल का तुमची गोष्ट ? " ड्रेसिंग टेबलाकडे पाहून प्रभाकराने विचारलें.

" होऽऽ ! " जराशी हसून नलू म्हणाली.

संध्याकाळीं ती प्रभाकराकडे गेली, ती पूर्वीसारखी 'काकू' होऊनच.

आपणाला पाहताच, त्याच्या डोळ्यात पूर्वी तरळणारे ते भाव आजहि खेळत असलेले तिला दिसले. राजापुरी गंगेप्रमाणे मध्येंच लुप्त झालेला त्याचा मनमोकळेपणाहि एकदम परत आल्यासारखा तिला वाटला. "या काकू!" असे म्हणून त्याने हसत हसत तिचे स्वागत केले.

ती थोडीशी लाजली, आणि एका खुर्चीवर बसली. त्याने तिला 'काकू' म्हटले होते, पण ती रागावली नाही.

"आवडली का गोष्ट माझी? त्यातले विचार पटले का तुम्हाला?" त्याने थोड्या वेळाने विचारले.

"हो!"

"बाकी ते विचारायलाच नको म्हणा. हा तुमचा पोषाखच सांगतोय् ते." नंतर तो एकदम हसत सुटला. जणू त्यानें इतके दिवस दाबून धरलेलें हसूच उफाळून बाहेर पडत होतें. हसण्याचा भर ओसरल्यावर तो उद्गारला,

"काकू फॅशन करू लागल्या! खरंच, हे कुठलं हो वेड मध्येंच शिरलं होतं तुमच्या डोक्यात!"

"तुमच्यासाठीच करत होते मी फॅशन." छाती धडधडत असताना, खाली दृष्टि लावून ती म्हणाली.

"माझ्यासाठीं? वा वा! पण त्याचा परिणाम मात्र उलट होत होता. तुमची लेखनशक्ति विचारीपणा, मनमोकळा विनोदी स्वभाव—म्हणजे तुमचं अंतरंग मला आवडत होतं. तुम्ही फॅशन करीत नव्हता, तोंवर माझं सारं लक्ष तुमच्या अंतरंगाकडेच खेचलं जात होतं. पण तुम्ही फॅशन करू लागलात मात्र माझं लक्ष तुमच्या बाह्यांगावरच खिळून राहू लागलं. आणि तुमचं बहिरंग काहीं तितकंसं आकर्षक नाहीं. होय ना?"

"हं."

"जसं काहीं आपल्या चेहऱ्यावर तुम्ही जीं पावडरीचीं पुटं चढवीत होता, त्याखालीं तुमचें अंतरंगहि लपून जात होतं. हा साधा पोषाखच

तुम्हाला खुलून दिसतो. ”

“ मूर्खपणाच केला मी ! आता माझं मलाच हसू येतय् त्याच ! खरच फॅशन केल्यावर कशी दिसत होते हो मी ? ”

“ अगदीच बावळट ! ”

ह्यावर नलू मनमोकळेपणाने हसली. पण तिने तोंड उघडल्यावर त्यातून होणाऱ्या विश्वरूपदर्शनाकडे प्रभाकरचे लक्ष गेले नाही.

“ तुम्ही गोष्टींत मला एकवचनानं संबोधलं आहे ना ? ” थोड्या वेळाने तिने विचारले.

“ हं. ”

“ मग आताच का मला ‘ अहो जाहो ’ करता ? ”

“ पण काकूंना कसं ‘ अग–तू ग ’ म्हणणार ? ”

“ काकांनी म्हणायला काय हरकत आहे ? तुमच्या मोठ्या भावाच्या मुलाचे तुम्ही ‘ काका ’ आहात ना ! ”

तिचे हे चतुर भाषण ऐकून, प्रभाकरने तिच्याकडे मोठ्या कौतुकाने पाहिलं. तिचा काळासावळा रंग किंवा साधी वेषभूषा त्याला दिसली नाही. त्याखाली असलेलं कुठलं तरी सौंदर्य तो निरखीत होता.

आणि मग थोड्याच दिवसांत, नलू खरोखरची ‘ काकू ’ झाली, हे काय सांगायलाच पाहिजे ?

# आमचा लढा!

सिगरेट ओढणाऱ्या माणसाच्या मनोवृत्तीत काय गोम असते, कुणास ठाऊक! तो कितीहि श्रीमंत असो, कितीहि उदार असो, आपल्या सिगरेटी दुसऱ्याला नेहमी पुरवणं, त्याला आवडत नाही. आपल्या एकदोन सिगरेटी तो एकदोन दिवस तुम्हाला मोठ्या आनंदानं देईल, पण तिसऱ्या दिवसापासून तुम्हाला सिगरेट देताना तो कुरकुरू लागेल. मला वाटतं, मी जर कर्ण असतो आणि सिगरेट ओढण्याची मला सवय असती, तर एक वेळ मी माझी किरीटकुंडलं श्री. इंद्रांना हसतमुखानं दिली असती, पण त्यांना रोज रोज सिगरेटी पुरवणं, माझ्या औदार्याचं दिवाळं वाजण्याची भीति असूनदेखील, मीं बंद केलं असतं.

मी, बरडे, कुकडे आणि जोशी अशी आम्हा चौघांची एक चौकडी होती. अंधार पडण्याच्या सुमारास क्लबांत जाऊन पत्ते खेळण्यांत आम्ही दोनएक तास मोठ्या मजेंत घालवीत असूं, आणि त्याबरोबरच मधून मधून धूम्रपानाचा उपभोग घेत असूं. 'उपभोग घेत असूं' हा शब्दप्रयोग मी मुद्दामच करीत आहें. कारण, सिगरेटचा पोटभर झुरका मारल्यावर मनाला जें समाधान वाटतं, वरवर जाणाऱ्या धुराच्या वेटोळ्याकडे पाहाताना सारं जग आनंदानं नी सत्प्रवृत्तींनी भरून गेल्याचा जो सात्विक आभास उत्पन्न होतो, त्या वेळच्या मनाच्या शांतिस्तुष्टिपुष्टीला कशाची उपमा नाही, अशी आमची प्रांजल समजूत होती. कधी कोणी सिगरेटविद्वेषी आमच्याशीं ह्या बाबतींत वाद घालायला बसलाच, तर एखादा आधुनिक लघुनिबंधकार आमच्यांत संचरे, आणि मग सिगरेटचंच गुणवर्णन करण्यांत आमच्यांत अहमहमिका लागे.

" माणसाला काहीतरी व्यसन पाहिजेच. "

" ज्याला व्यसन नाही, तो माणूसच नव्हे "

" माणसाची व्याख्या जर मला कोणी करायला सांगितली, तर मी ती, ' सिगरेट ओढणारा प्राणी ' अशीच करीन ! "

" सिगरेटन थकवा नाहीसा हातो. "

" सिगारेटन विचाराना चालना मिळते.—नव्या नव्या कल्पना सुचतात. "

ह्याप्रमाण आम्ही आमची ठराविक उत्तर आमच्या विरोधकावर फेकून देत असू, आणि मग एक नवी सिगरेट शिलगावून, ' चहा घ्याल्यान उन्हाळयात थड वाटते, ' ' चहामुळे थडींत ऊब येते ' ' चहामुळे कॉलरा होत नाही, ' ' चहामुळे मलेरिया पळून जातो, ' अशा चहा-विषयीच्या स्टेशनावर ज्या उलटसुलट जाहिराती असतात, त्या धर्तीवर आम्ही सिगरेटचे गुणगान करू लागाव.

कधी कोणी म्हणे, ' पण सिगरेट ओढल्यान घाण येते ना ? ' बिचारा ! आम्ही सारे ह्या प्रश्नाची वाटच पहात असू. कारण त्यावर आमच्र एक बिनतोड उत्तर ठरलेल असे. त्याच्या तोडून हा प्रश्न पुरता बाहेर पडतो न पडतो तो आम्ही सारे एकमुखान गिल्ला करू, ' पण त्याचा तुम्हाला त्रास होण्याचा काहीं सभव नाही ना ! ' आणि मग तो खजील झालेला पाहून आम्ही हास्याचे मजल्यावर मजले चढवीत असू.

असे आम्ही चौघेजण ह्या धवलवसना, ओष्ठासना, एकनयना, अग्नि-देवतेचे एकनिष्ठ उपासक होतो. दिवसातून कित्येक वेळा अग्निहोत्र पेटवून, आम्ही आमच्या अतःकरणात तिला साठवीत होतो. ज्यान त्यान आपआपल्याच सिगरेटी ओढायच्या हा आमच्यातील एक अलिखित नियम होता. ह्या नियमाच पालन करून आमचा रोजचा कार्यक्रम कितीतरी दिवस सुरळीत चालला होता. पण मग, त्रेतायुगात होमहवन करणाऱ्या ऋषींच्या मार्गात राक्षस व्यत्यय आणीत, तसा श्री. डासानी आमच्या ह्या अग्निपूजेंत व्यत्यय आणला, आणि आमची अग्निहोत्र काही दिवस बदंदेखील पडली. आमच्या हितचिंतकाच्या

सदुपदेशाला किंवा विरोधकाच्या कोटिक्रमाना जें साध्य झाल नव्हत ते जवळ जवळ अशक्य कार्य श्री. डासानी अभावितपणे करून दाखवल.

असेच एक दिवस श्री. डास आमच्या क्लबात दाखल झाले. वर जरी त्याना राक्षसाची उपमा दिलेली असली तरी ते दिसायला लुकडे होते. गृहस्थाच्या शरीरातील हाड जितक्या प्रामुख्यान दिसत, तितक्याच प्रामुख्यान त्याचा गमती गोडबोल्या स्वभावहि उठून दिसे त्यानी आम्हा चौघावर एकदम छाप पाडली त्या दिवशी घरी परतताना आम्ही चौघे त्याची स्तुतिच करीत आलो.

थोडस चालून आल्यावर कुकडे मला म्हणाला, " अरे, मला एक सिगरेट दे पाहू. "

दुसऱ्याकडून सिगरेट मागायची नाही, हा आमचा अलिखित नियम त्यानं मोडलेला पाहून, जरा चमकलेल्या नजरेनच मी त्याच्याकडे पाहिल. त्यालाहि त्याची जाणीव असावी, अस त्याच्या दिलगिरीनिदर्शक चेहऱ्यावरून दिसून येत होत. मी त्याला विचारल,

" का ? सपल्या का तुझ्या सिगरेटी ? "

" हो, दोन सिगरेट्स् डासाना दिल्या "

" घे. " त्याच्या स्पष्टीकरणान पूर्ण समाधान पावून आणि सिगरेटची तल्लफ म्हणजे काय चीज असते ह्याचा विचार करून, माझ पाकीट मी त्याच्यासमोर धरल. त्यान एक सिगरेट काढून घेतल्यावर मी आता पाकीट बद करून खिशात ठेवणार, इतक्यात बरडे मला म्हणाला, " मलाहि एक दे रे. माझ्याहि दोन सिगरेटस् डासानी ओढल्या ! "

एवढ बोलून माझ्या परवानगीची वाटहि न पाहता त्यानं पाकिटातून एक सिगरेट काढून घेतली देखील. मी जोशीकडे पाहिल. माझ्या पाकिटात राहिलेल्या एकाच सिगरेटकडे तो आशाळभूतपणान पाहात होता. त्याला काहीं न विचारताच मीं पाकीट त्याच्यासमोर धरल. त्याचा चेहरा एकदम खुलला. त्यान त्या सिगरेटवर जवळ जवळ झडपच घातली. आणि ती आपल्या कोटाच्या खिशात ठेवून दिली.

" का रे ? पेटव की ! " त्याच्यासमोर जळती काडी धरून मीं म्हटल.

" नको, थॅंक्स ! जेवण झाल्यावर ओढीन मी माझ्याही सिगरेट्स खलास झाल्या आहेत "

थोड्या वेळान कुणीस म्हटल, " डासाची चागली ' ॲडिशन ' झाली, नाही आपल्या कपूला ? "

आम्ही सर्वांनी एकमुखान होकार दिला नि नतर आपआपल्या घरी गेलो.

खर पाहता, आमच्या कपूवर कोसळ् पाहणाऱ्या सकटाची आज आम्हाला स्पष्ट सूचना मिळाली होती पण डोळे उघडून पाहिल, तर तो माणूस कसला !

रात्री जेवण झाल्यावर नेहमीच्या सवयीप्रमाणे मला सिगरेटची तलफ आली. मी खिशातून पाकीट काढून पाहिल पण ते मला एखाद्या निर्जन घराप्रमाण वाटल. त्या वेळी मी माझ्या " सौ. " ची दागिन्याची पेटी उघडून पाहिली असती, आणि ती मला रिकामी दिसली असती तरी मला इतक वाईट वाटल नसत ! ते रिकाम पाकीट पाहून माझी सिगरेटची तलफ उलट जास्तच वाढली. माझी शेवटची सिगरेट मी त्या जोश्याला उगाच दिली अस मला वाटल. तो ह्या वेळीं भरलेल्या पोटावरून हात फिरवीत मोठ्या मजेत माझ्या सिगरेटचे झुरके सोडीत बसला असेल लेकाचा ! आणि मी मात्र—

दुसर पाकीट आणाव तर सारी दुकान बद झालेली. आता काय करावं ? सिगरेट ओढल्याशिवाय मला झोप तरी कसची लागते ! अखेरीस बिछान्यावर तळमळत पडलो असता माझी शेवटची सिगरेट लुबाडणाऱ्या जोशीला शिव्या देऊन मनाला विरगुळा देऊ लागलो, व अखेरीस त्याचा परिणाम होऊन पहाटेपहाटेस माझा डोळा लागला.

" काय रे, आपल सहज म्हणून सागतो, पण हा डास रोज आपल्या सिगरेट्स ओढतो, पण तो मात्र कधीं सिगरेट्स आणत नाही."
पधराएक दिवसानी एक दिवस कुकडे म्हणाला.

खर पाहता, श्री. डास आमच्या सिगरेटी फुकटात ओढतात, हा प्रकार आतापावेतो आम्हा सर्वांच्या लक्षात येऊन चुकला होता. पण तस स्पष्ट बोलून दाखविण म्हणजे स्वतःची कोती वृत्ति, दिलदारपणाचा अभाव, वगैरे वगैरे क्षुद्र मनोवृत्तींच प्रदर्शन करण्यासारखच असल्यामुळ तस बोलून दाखविण्यास आम्ही कोणी धजावत नव्हतो. आज अखेरीस कुकडेन त्या विचाराला वाचा फोडलेली पाहून आम्हाला बर वाटल. मात्र मी वरवर म्हणालो, " ओढीना का बिचारा ! दोनतीन सिगरेट्सची काय मोठी बाब आहे ! "

कुकडेखेरीज इतरानीहि प्रथम ह्याच अर्थाची वाक्य उच्चारून दाखवली, पण अखेर आम्हाला नकळत आम्ही सर्वजण कुकडेच्याच बाजूने बोलू लागलो.

" तें काही नाही ! आज डासालाच सिगरेट्स घ्यायला लावायच्या ?" कुकडेन भीष्मप्रतिज्ञा केली, व आम्ही त्याला अनुमोदन दिल.

रोजच्याप्रमाण क्लबात जाऊन आम्ही ब्रिज खेळावयास बसलो. थोड्याच वेळात डासहि आले. आमच्यापैकी कुणी सिगरेट काढतो का ह्याची बराच वेळ व्यर्थ वाट पाहून झाल्यावर अखेरीस ते म्हणाले, " छे, तुमच्या सहवासात राहून मलाहि सिगरेट ओढण्याच व्यसन लागेलस दिसतय् ! तरी बर, अजून मला तलफ येत नाही म्हणून ! अच्छा डॉक्टर, एक सिगरेट तो निकालो. "

त्याच्या ह्या मागणीची आम्ही वाटच पहात होतो, व त्यावरच उत्तरहि आम्हीं आधींच ठरवून ठेवल होत. मी दिलगिरी दाखवीत म्हणालो, " सॉरी, आज विसरलों मी सिगरेट आणायला ! "

" शाब्बास ! " कुकडे आश्चर्यान काठोकाठ भरलेल्या आवाजात म्हणाला, " मग आज कस व्हायच ? मीहि येताना घाईघाईत दुसरा कोट घालून आलों, नी पाकीट राहिल पहिल्या कोटात ! "

" वा ! " बरडे म्हणाला, " आज तर मला पाकीटच मिळाल नाहीं.

रमणलालकडचा सिगरेटचा स्टॉकच सपला !.. अरे जोशी, तुझी काढ बाबा एक सिगरेट !"

"अरेच्या ! मग काय आज सिगरेटवाचून राहायच की काय !" आश्चर्य आणि खिन्नपणा ह्याच्या मिश्र स्वरात जोशी म्हणाला, "मी सिगरेट घ्यायला गेलो, तेव्हा माझ्याजवळ बदा रुपया होता, नि दुकानदाराजवळ मोड नव्हती !"

"मग ! आता काय कराव बुवा !" मी म्हणालो.

"डास, अस करा. आज तुम्हीच मागवा ना सिगरेट्स !" बरडे म्हणाला आणि मोठ्या हुशारीने लगेच क्लबच्या बॉयला हाक मारली, "अरे बाळा !"

"ओ, यस् ! असच करूया !" खिशातून एक पावली काढून व ती टेबलावर सहज फेकून देऊन डास म्हणाले, "रोज माझ्या मनात येई, आज आपण पाकीट घेऊन याव म्हणून. पण वाटायच, नको ! एकदा पाकीट विकत घेतल, की व्यसनच जडायच !"

डास सिगरेट आणायला इतक्या सहज तयार होतील अशी आमची कल्पना नव्हती. आपल्या दिलदारपणान त्यानी आम्हाला लाजवल हे खर ! त्यानतर दोनतीन दिवस त्यानी रोज आपण होऊन एकएक पाकीट आणल व आम्ही न मागता आम्हाला सिगरेटी पाजल्या. त्याच्यासारख्या सज्जनाविषयीं आम्ही उगाच भलत्यासलत्या शका काढल्या म्हणून आमची आम्हालाच लाज वाटू लागली. त्याच्या ह्या दोनतीन दिवसातल्या दिलदारपणाचा आमच्या मनावर इतका ठसा उमटला की, चौथ्याच दिवसापासून त्यानी स्वतःच्या सिगरेटी आणण्याच बद करून, आमच्या सिगरेटी पूर्ववत् ओढण्याचा कार्यक्रम सुरू केला, हे जवळजवळ पधराएक दिवस आमच्या लक्षात देखील आल नाहीं !

पण नतर ह्या गोष्टीची जाणीव आम्हाला झाली आणि आमचा मानसिक त्रास पुन्हा सुरू झाला. डास हा दिलदार माणूस नसून, आमच्या सिगरेटी बुद्धयाच फुकटात ओढणारा तो एक फुकट्या आहे, ही आमची

पहिलीच कल्पना दिवसेदिवस दृढतर होऊ लागली. शेवटी आम्ही सर्वांनी मिळून ठरवल की, आज डासानी सिगरेट मागितली की त्याना चक्क 'नाही' म्हणून सागायचे. हो, ह्या प्रकाराला आता पायबद घालण आवश्यक झाल होत.

क्लबात डास आल्यावर आम्ही आधी ठरवून ठेवल्याप्रमाण नाटक सुरू केल.

"अरे जोशी, एक सिगरेट दे ना!" त्याच्यापुढ हात करून बरडे म्हणाला.

"वा महाशय! आपला आजचा ठराव इतक्यात विसरला की काय?" जोशी उलट म्हणाला.

"बरडे, आजपासून दुसऱ्या कुणाला आपल्या सिगरेटस् द्यायच्या नाहीत, हा ठराव आपण पास केला आहे ना?" मी विचारल.

"दुसरेकु सिग्रेट देना आजसे बिलकुल बद!" टेबलावर हात आपटून कुकडे म्हणाला.

"अरे हो!" आठवण झाल्यासारख करून बरडे म्हणाला, "विसरलोच होतो ह मी आपला ठराव! पण आजचा दिवस "

"आजचा दिवस बिवस कुछ नही!" जोशी बरडेकडे रागान पाहात म्हणाला.

आमचा हा सवाद चालू असताना आमचा प्रत्येकाचा एकएक डोळा डासाच्या चर्येच निरीक्षण करण्यात गुतला होता. त्याच्या चर्येवरून आम्हाला कळल की आमच्या सभाषणाकडे त्याच मुळीच लक्ष नाही! आपल्या हातातील पत्ते रगावारी लावण्यात ते गर्क झाले होते. तरी पण आमची खात्री होती, की मोठमोठ्यान ओरडून आम्ही जे नाटक केल, यातली काही वाक्य तरी त्याच्या कर्णरध्रातून आत शिरली असावीत.

बराच वेळ झाला तरी डासांनीं कुणाजवळ सिगरेट मागितली नाही. तेव्हा त्यानी ओळखायच तें ओळखल असाव, अस अनुमान करून निर्धास्तपणानेंच मी माझ सिगरेटच पाकिट बाहेर काढल. इतका वेळ सिगरेट-

वाचून माझा जीव तळमळत होता, आणि आता तर मला भयकरच तलफ आली होती मी पाकीट काढताच इतरानीहि माझ भराभर अनुकरण केल. एकाच काडीवर आम्ही चार सिगरेटी पेटवल्या, आणि आमच्याकडे लक्ष नाही अस दाखवीत आपल्या हातातील पत्त्याकडे पहात बसलेल्या डासाकडे पाहून एकमेकात डोळे मिचकावले.

माझी सिगरेट साधारण अर्धी ओढून झाली असेल, डास एकाएकी गमतीच्या गोष्टी मोठ्या रगवून सागू लागले होते. मध्येंच ते मला म्हणाले, " बर का डॉक्टर, एकदा काय गमत झाली, आपले ते हे आहेत ना,– अच्छा ! एक सिगरेट तो निकालो जी ! "

त्याची ' गमत ' ऐकण्याकरता मी त्याच्याकडे पाहू लागलो होतो, पण त्याचे हे शब्द ऐकताच मी एकदम मान फिरवून हातातील पत्त्याकडे पाहू लागलो. सिगरेटच्या मागणीकरता माझ्यापुढ केलेला हात तसाच माझ्या पुढ्यात ठेवून डास आपली गोष्ट अशा आवाजात सागत होते, की जस काही त्याना सिगरेट देण्याइतका मी दिलदार आहे, ह्याविषयी त्याना काहींच शका नव्हती. पण मीहि काही कमी नव्हतो. हतातील राजेराण्याची आपसातील कुजबुज ऐकण्यात मी गर्क झालो आहे व डासानी केलेली सिगरेटची मागणी माझ्या लक्षातच आलेली नाही अस मी भासवीत होतो. थोड्या वेळानें मी डोळ्याच्या कोपऱ्यातून डासाकडे पाहिल. तोडान ती गमतीची गोष्ट इतराना सागता सागता त्याचा हात मात्र माझ्या दिलदारपणावर विश्वासून अजूनहि माझ्यासमोर तसाच होता. त्याच्या लोचटपणाचा मला राग आला—

—आणि कीवहि आली. त्यानी आता माझ्याकडे परत सिगरेट मागितली की आमच्या ठरावाला अनुसरून मी त्याना ताडकन् ' नाही ' म्हणणार, आणि बिचाऱ्याची सर्वादेखत नाचक्की करणार, ह्याविषयीं मला थोडस वाईटहि वाटत होत. त्याना कटवण्याचा तो क्षण आता केव्हा येतो, ह्याची मी वाटच पाहात होतो. इतक्यात डासानी माझ्या हाताला एक धक्का दिला, आणि त्याचे ते चिरपरिचित शब्द माझ्या कानावर येऊन पडले, " बर का डॉक्टर, अशी झाली गमत ! आमचे मुबईचे डॉक्टर मुळे–म्हणजे अगदी तुमच्यासारखेच– विनोदी आणि दिलदार–अच्छा, डॉक्टर, एक सिगरेट तो निकालो !–"

त्याचे हे शब्द कानावर पडताच, माझा संताप अनावर झाला पत्ते तोंडासमोरून बाजूला करून मीं एकदा माझ्या मित्राकडे पाहिल सर्वजण माझ्या ह्या अवघड कार्यात मला यश याव म्हणून, व डासाना पहिला ‘नकार’ देण्याच काम परस्पर माझ्याकडून यशस्वीपणाने पार पडाव म्हणून माझ्याकडे उत्तेजनपर दृष्टीन पाहात होते त्यामुळ हुरूप चढून क्रुद्ध मुद्रेन मी डासाकडे वळलो,–पण वळता वळता एक विचार मनाला चाटून गेला–डासाचा अपमान करण्याच हे दु खदायक कार्य माझ्याऐवजी दुसऱ्या कुणावर पडल असत तर बर झाल असत !—

ह्यानतर जें काय घडल ते कस घडल, ह्याची मला नक्की मीमासा करता येत नाही. माझा हात माझ्या खिशाकडे गेला, अन् एखाद्या मत्रमुग्धाप्रमाण वरून हसत ( पण मनातून स्वत.च्या कमकुवतपणावर चरफडत ) डासासमोर मीं माझ सिगरेटच पाकीट धरल ! डासाच्या त्या कावेबाज चेहऱ्यात काय जादू होती कुणास ठाऊक !

माझ्या मित्राकडे मी चोरून पाहिल प्रत्येकाचे डोळे मला खाऊ की गिळू असच विचारीत होते. हातातील पत्त्यानी मी माझं तोड लपवून घेतल, आणि डासाना नकार देण्याचा पहिल्याच प्रमग माझ्यासारख्या उदार नि दिलदार माणसावर आला नसता तर बर झाल असत, असा विचार करीत बसून राहिलो

डासाविरुद्धच्या आमच्या लढ्यात पहिल्याच धडाक्याला माझ्यासारखा एक अतिरथी अगदीच अनपेक्षितपणान धारातीर्थी पतन पावला होता. मग डासाचा जोर काय विचारता ! थोड्याच वेळात जोशीकडून त्यानी गमतीची गोष्टहि न सागता किवा काही प्रस्तावनाहि न करता एका सिगरेटची मागणी केली. जोशीन माझ्याकडे रागान एक दृष्टिक्षेप केला आणि डासाना काहींहि विरोध न दर्शविता एकाद्या गोगलगायीप्रमाण एक सिगरेट काढून दिली.

ह्याप्रमाण आमचे दोन खंदे वीर नेस्तनाबूद केल्यावर थोड्या वेळानं डासानीं बरडेच्या हातातून, एकाद्या मध्ययुगीन विजेत्यान जित राजाच्या नाटकशाळेचं अपहरण करावं त्याप्रमाणं सरळ पाकीटच काढून घेतलं

आणि डासाच्या ह्या विजयाच्या त्रिदाडीचा कुकडेच्या मनोधैर्यावर इतका परिणाम झाला, की आपणाकडून सिगरेटची खडणी वसूल करण्याचा डासाचा विचार आहे, असा नुसता रग दिसताच, हिटलरला शरण जाणाऱ्या एकाद्या छोट्या राष्ट्राप्रमाण, त्यान आपण होऊन आपल पाकीट डासाच्यापुढ धरल !

आपल्या बाजूचा पराभव झाला की एकमेकाना नाव ठेवण्याचा मनुष्यस्वभावच आहे डास गेल्यावर बरडे मला म्हणाला, " खूप आहेस बुवा ! आपल येवढ ठरल्यानतर तूं डासाना सिगरेट का दिलीस ? "

खर पाहता मी माझी चूक गुपचूप कबूल करायला पाहिजे होती. पण मी म्हटलं, " बर बर ! आलेत मोठा शहाणपणा शिकवायला ! मी एक दिली असेल सिगरेट, पण मग डासानी तुझ्याकडे सिगरेट मागितल्यावर तू का ' नाही ' म्हटल नाहीस ? "

" वा वा ! " बरडे रागानं म्हणाला, " हा शहाजोगपणा समजतो म्हटल आम्हाला ! त्याला सिगरेट देऊन तू आपला चागलेपणा घ्यायचा आणि ' नाही ' म्हणून आम्ही मात्र वाईट ठरायच ! वा, छान ! "

थोड्याच वेळात जोशी आणि कुकडेहि आमच्या भाडणात सामील झाले. आम्ही एकमेकाच्या बऱ्याच उखाळ्यापाखाळ्या काढल्या, आणि अखेरीस स्वत:खेरीज बाकीचे तिघे मित्र आहेत, अशी खूणगाठ मनाशीं बाधून घरोघर गेलो.

त्यानतर आमची मन एकमेकाविषयी साफ व्हायला चागले पधरा दिवस लागले. डासाना आम्ही मागताक्षणींच सिगरेट पुरवू लागलो. अस केल्यान, आम्ही एकमेकावरचा सूड उगवीत आहोत अस विचित्र समाधान आम्हाला मिळे.

इसापनीतींतील दोन माजरे व एक माकड ह्या गोष्टींतल्याप्रमाण आमच्या भाडणात डासाचाच फायदा होतो आहे, ह्याची आम्हाला लवकरच जाणीव होऊ लागली. आणि ह्यावर काय उपाययोजना

करावी, ह्याविषयी आमची हळूहळू बोलणी निघू लागली. जोपर्यंत डास आमच्या सिगरेटवर डल्ला मारीत होते, तोपर्यंत आम्हाला मानसिक स्वास्थ्य मिळण शक्य नव्हत.–आता ह्यावर काही तरी जालीम उपाययोजना करून ह्या लाच्छनास्पद प्रकाराला पायबद घालण आवश्यक होत. ह्याविषयी आम्हा सर्वाच एकमत होऊन, आम्ही एक निर्वाणीची सभा बोलावली. निरनिराळ्या उपायाची बरीच भवति न भवति झाल्यावर गभीरपणान मी म्हणालो, " सद्गृहस्थ हो, डासाविरुद्ध आतापर्यंत आपण योजलेले सारे उपाय आपल्या कमनशिबान किवा कमकुवतपणामुळ फसले आहेत ज्या शत्रूविरुद्ध आपण लढा चालविला आहे, तो शत्रु जपान्याप्रमाण लुकडा, कावेबाज, धूर्त आणि चिवट आहे. अशा शत्रूचा पराभव करायचा म्हणजे सर्वकष युद्धच आरभल पाहिजे. आपल्या साऱ्या शक्ती एकवटल्या पाहिजेत ह्या शत्रूचा पराभव करण्याकरता आता एकच निर्वाणीचा उपाय शिल्लक राह्यला आहे ! "

" कोणता ? " " कोणता ? " सर्वांनी उत्सुकतेन एकच प्रश्न केला.

" तो उपाय फारच भयकर आहे. तो उपाय अमलात आणला तर आपल्या मानसिक शक्तीची कसोटी लागणार आहे. तो उपाय म्हणजे—" एकदा भीषण गंभीरपणानं सभागृहावरून दृष्टि फिरवून, दाटलेल्या कंठान मी म्हणालो, " तो उपाय म्हणजे आपणच सिगरेट सोडून देण हा होय ! "

माझ्या ह्या वाक्यान सारेजण क्षणभर दचकलेच. आपल्या घरी चोर–लुटारूनी येऊं नये म्हणून आपली सपत्ति नाहीशी करण्यापैकीच हा उपाय आहे, अशी जरी त्यावर टीका झाली, तरी सद्यःपरिस्थितीत ह्याखेरीज आता दुसरा उपाय शिल्लक राहिलेला नाही, हे अखेरीस सर्वांना पटलं. सर्वांनी आपल्या प्रियतमेला शेवटचा निरोप द्यावा इतक्या जड अंतःकरणानं तो ठराव पास केला. उद्याचा एक दिवस मनसोक्त सिगरेट ओढून घ्यायच्या आणि परवापासून सिगरेट सोडून द्यायची ही कुकड्याची उपसूचनाहि एकमतान मंजूर झाली.

दुसऱ्या दिवशी आम्ही प्रत्येकान चार चार पाच पाच पाकिटे खलास केली. ' घे बेट्या, किती पिशील त्या घे पिऊन आजच्या दिवस '

अस मनात म्हणत डासानाहि आम्ही भरपूर सिगरेटी दिल्या. उद्यापासून त्याना सिगरेट देण्याचा नामुष्कीचा प्रसग आमच्यावर येणार नाहीं, हेच सिगरेट सोडण्याच्या दुःखदायक विचारातहि आम्हाला सुख होत. तसच, वाइटातून चागल निघत म्हणतात, त्याप्रमाण डासाच्या ह्या ससेमिऱ्यातून आमच्च सिगरेटच व्यसनहि आयतच सुटणार, ह्याचाहि आम्हाला त्यातल्या त्यात आनद होत होता.

दुसऱ्या दिवशी ब्रिज खेळायला बसल्यावर, बराच वेळ झाला तरी आमच्यापैकी कुणी सिगरेट काढीत नाही अस पाहून डासानी आमच्याकडे सिगरेटची मागणी केली ‘ आजपासून आम्ही सिगरेट अजिबात सोडली ’ असा आम्ही सर्वांनी मोठ्या आनदान पुकारा केला. डासाचा प्रथम त्यावर विश्वास बसेना नाना तऱ्हानी आम्हाला खोदून खोदून विचारून आमची उलटतपासणी करताना त्याची उडालेली गड-बड पाहून आम्ही मनातल्या मनात हसत होतो. आता आम्हालाहि थोडस चुकल्यासारख वाटत होत हे खर. राहून राहून आमचा हात आमच्या खिशा-कडे जाई, आणि पाहिजे असलेली वस्तु तिथ लागली नाही म्हणजे निराशेचा चटका आम्हाला थोडासा जाणवे, हेहि नाकारण्यात अर्थ नाहीं. पण आम्ही तिकडे दुर्लक्षच केल. एकदरीन पाहता, आमच्या नव्या निश्चयाचा तो पहिला दिवस, आमचा निश्चय यशस्वी झाला ह्या सात्त्विक आनदातच पार पडला. आणि आज अखेरीस डासाची जिरवली, ह्या विचारान थोड्याशा तामसी आनदाचीहि त्यात भर पडली.

दुसऱ्या दिवशी आमचा उत्साह कायम होता, पण मधूनमधून येणारी सिगरेटची तलफ बुझवण्याकरता काहींतरी उपाययोजना केली पाहिजे, ह्याची आम्हाला जाणीव झाली होती. तिसऱ्या दिवशी खेळायला बसल्याबसल्या जोशी आपल्या खिशातून कुठलातरी एक पदार्थ काढून त्याला वरचेवर आपल्या तोंडाची वाट दाखवीत असलेला पाहून माझ कुतूहल जागृत झाल. मी त्याला विचारल, “ काय रे जोशी, हे काय नवीनच सुरू केलय् आज ? ”

“ काहीं नाहीं. लिमलेटच्या गोळया खातोय् मी ! ” जरासा खजील होऊन तो उत्तरला.

“ लिमलेटच्या गोळया ! ” मी आश्चर्यान विचारल, “ आता लहानच्र आहेस कीं नाहीं तू लिमलेटच्या गोळया खायला ! ”

“ तस नाही रे. ” तो म्हणाला, “ मनाला काहीं चाळा असला तर सिगरेटची आठवण होत नाही. सिगरेटची आठवण झाली, की मी एक गोळी तोडात टाकतो. लिमलेटच्या गोळया चघळत बसल की सिगरेटची आठवण मुळींच येत नाही ! ”

ह्या आपल्या परस्परविरोधी विधानानी भरलेल्या भाषणान, आपणाला सिगरेटची मुळींच आठवण होत नाहीं, अशी जरी त्यान ग्वाही दिलेली असली तरी ज्या वेगाने लिमलेटच्या गोळया तो आपल्या तोडाला ‘ स्वाहा ’ करीत होता, त्यावरून बरोबर त्याच्या उलटच निष्कर्ष निघत होता.

“ छट ! ” त्याच भाषण ऐकून बरडे म्हणाला, “ माझी थिअरी जरा निराळी आहे. काट्यान काटा काढावा, तस व्यसनान व्यसन मारल पाहिजे”

“ म्हणजे काय दारूबिरू प्यायला सुरुवात करणार आहेस की काय तू ? ”—मी.

“ अह ! तपकीर ओढायला सुरवात केली आहे मी तपकिरीच व्यसन फार बर, सिगरेटपेक्षा ! ” अस म्हणून त्यान खिशातून एक बाटली काढून, तपकिरीचा एक बार नाकात कोंबला. त्यानतर दोनएक मिनिट, येऊ पाहणाऱ्या शिका वेडेवाकडे चेहरे करून दाबण्याचा तो प्रयत्न करीत असता त्याच्याकडे पाहून आमची चागलीच करमणूक झाली. अखेरीस शिका दाबून ठेवण त्याला अशक्य होऊन, मोठमोठ्या शिका देत, तो बाहेर पळाला.

“ तपकिरीचं व्यसन घाणेरड आहे ! ” नवीनच बाळगलेली गोड्याची चची सोडून कुकडे म्हणाला, “ त्यापेक्षा पान पुष्कळ बर. थोडीशी तबाखूहि जर त्याच्याबरोबर तोंडात टाकली तर सिगरेट पहावीशीसुद्धा वाटत नाहीं. ” अस म्हणून विड्याच्या मागोमाग तबाखूची एक चिमूट त्यानें आपल्या तोंडात सोडली.

थोड्याच वेळात पत्ते टेबलावर टाकून 'ओय् ओय्' करीत तो बाहेर पळाला, आणि पान थुकून देऊन व गुळण्या करून घाबऱ्या चेहऱ्याने तो आत आला.

"माझा भर सारा आत्मसंयमनावरच आहे. कोठलेही व्यसन सोडण्याचा तोच खरा मार्ग आहे. आत्मसंयमन नसेल तर गोळ्या नि पानतंबाखूने काय होणार आहे?" थोड्या वेळाने सारं स्थिरस्थावर झाल्यावर मी किंचितशा आढ्यतेनें म्हणालो मग पत्ते खेळता खेळता एकदा माझा हात माझ्या खिशाकडे गेला व जोशीकडून मी एक लिमलेटची गोळी मागून घेतली नन्तर थोड्या वेळाने मला पान खाण्याची तल्लफ आली, व कुकड्याची चंची घेऊन मी एक पान खाल्ले. थोड्या वेळाने 'पाहू रे कशी आहे तुझी तपकीर?' असं म्हणून बरड्याच्या तपकिरीची चिमूटहि नाकात भरली.

आणखी एकदोन दिवस असेच गेले. आम्हा सर्वांचा उत्साह अजून कायम होता आणि आमचा निश्चय अढळ होता. डासाशीं झालेल्या झटापटीत जरी आम्ही हरलेले असलो, तरी आमच्या आत्म्याशी चाललेल्या ह्या लढ्यात आम्ही विजयी होऊं असा आता आम्हाला बराच भरवसा वाटू लागला होता.

पण सहाव्या दिवशी आम्ही जमलो, तेव्हा आमचे चेहरे पूर्वीइतके आनंदी दिसत नव्हते. ह्याचं खरं कारण असं होतं, की आम्हाला सिगरेटची मुळीसुद्धा आठवण येत नाहीं असं आम्ही जरी वरवर दाखवीत होतो तरी दिवसातून काहीं ठराविक वेळाना ती तशी आम्हाला येत होती. विशेषतः जेवणानंतर तर अशी विलक्षण तल्लफ येई, की 'सारे निश्चयबिश्चय गेले जहान्नममध्यें' असं म्हणून एकदम एक पाकीटच्या पाकीट खलास करावं अशी जबरदस्त इच्छा होई. आत्मसंयमनाच्या कसोटीची खरी वेळ हीच असे, आणि त्या वेळीं आम्ही खरोखरीच इतकं आत्मसंयमन करीत असूं कीं त्यापासून मोठमोठ्या तपस्व्यानीदेखील धडे घ्यावेत. एवढं सगळं केलं तरी केव्हा केव्हा निराशाजनक विचार मनात येत. 'सिगरेटविरुद्ध चाललेला आमचा हा लढा एकतर्फी आहे. ह्या महाश्वेतेची शक्ति जबरदस्त आहे.

तिच्यापुढे आमच्यासारख्या मर्त्य मानवाचा काय पाड ! मन हे चचल आहे. विश्वामित्रासारखे मोठमोठे तपोधनहि मोहाला बळी पडले, तिथ आपण सिगारेटच्या मोहाला बळी पडलो, तर बिघडल कुठ ? दोन दिवस जगात राह्यच तर मजा करून घ्यावी ' असे दुबळे विचार मनात येत. तरी पण अशा वेळी साऱ्या मानसिक शक्ती एकवटून ह्या पंचमस्तभी विचाराना आम्ही तोड देत असू. तरी पण आमच्या मनात चाललेला हा भयकर लढा आता अधिक काळ जगापासून लपवून ठेवण आम्हाला अशक्य होऊ लागल होत, व आमचे चेहरे खिन्न दिसण्याचे कारण हेच होत.

मनाला विरगुळा म्हणून ह्या अवधीत काही नावाजलेले चित्रपट आम्ही पाहायला गेलो, पण त्या चित्रपटाविषयी कलुषित मत होऊन आम्ही लवकरच थिएटरच्या बाहेर पडलो. आमच्या आवडत्या लेखकाची पुस्तक आम्ही वाचली, परतु त्याच्या लेखनातील पूर्वीचा गोडवा नाहीसा झालेला आम्हाला आढळून आला.

केव्हाहि आम्ही एकमेकाना भेटल्यावर पहिला प्रश्न विचारीत असू, "काय ? आज ओढलीस ना तू सिगरेट ?"

हा प्रश्न विचारताना, त्यान मनाच्या कमकुवतपणामुळे आमचा निश्चय मोडला असेल म्हणून राग, त्याने खरोखरीच सिगरेट ओढण्याच सुख उपभोगल असल्यास त्याच्याबद्दल वाटणारी असूया, पण तस असल्यास आता आपणासहि सिगरेट ओढायला हरकत नाहीं, ह्या विचारान वाटणारी गोड उत्सुकता ह्या परस्पविरोधी भावनाच काहीं विचित्रच मिश्रण आमच्या आवाजात होत असे.

"नाहीं !" ज्याला प्रश्न विचारला जाई तो जरासा आढ्यतेनें म्हणे. पण नतर लगेच ज्या आवाजात आम्ही वरील प्रश्न विचारलेला असे, त्याच आवाजात तो प्रश्न करी, "तुम्हीं केली ना सुरवात ?"

ह्याप्रमाण आमच्या चचल मनाशी आमचा भयकर लढा चालला असता, जणु काय, आमचे ह्या लढ्यात होत होते तेवढे हाल पुरे नव्हते, म्हणून डासहि रोज एक पाकीट आणून त्यातल्या सिगरेटी आमच्यासमोर

ओढीत बसत. पहिले एकदोन दिवस आमचा निश्चय खरोखरीच टिकला आहे की काय, ह्याची त्यानी खात्री करून घेतली व तिसऱ्या दिवशी ते एक सिगरेट काढता काढता म्हणाले, "तुमच सिगरेटच व्यसन सुटल, हेवा वाटतो बुवा तुमच्या निश्चयी स्वभावाचा! पण मला मात्र ते आता लागतय की काय अशी भीति वाटते!"

एवढ बोलून त्यानी एक सिगारेट शिलगावली, आणि मग जणू काय एकदम आठवण झाल्यासारख करून, त्यानी ते पाकीट माझ्यासमोर धरल, आणि ते म्हणाले, "घ्या हो डॉक्टर"

त्यातली एक सिगरेट घ्यावी अशी मला अनावर इच्छा झाली. पण ती दाबून मी म्हटल, "नको, सिगरेट सोडलीय् मी!"

"चला! काही तरीच! घ्या एक सिगरेट!" अतिशय आग्रह करीत ते म्हणाले.

"नको. प्रकृति खराब होते सिगरेटमुळं!" इच्छेविरुद्ध मी आरोग्यविषयक सबब पुढे केली.

आता आपला नाइलाज आहे अस दर्शवून डासानी आपल पाकीट बरडेसमोर धरल, व त्याला सिगरेट घेण्याचा ते आग्रह करू लागले. पहिली ठराविक प्रश्नोत्तर झाल्यावर बरडे शक्य तेवढ्या निर्विकार चेहऱ्यान म्हणाला, "सिगरेटपायी किती पैशाचा धूर होतो माहीत आहे? मी परवा हिशोब केला, तर साधारण पचवीस वर्षांत दोन हजार चारशे पंचाहत्तर रुपये बारा आणे सात पै एवढा खर्च होतो. शिवाय ह्या रकमेवरचं व्याज बुडत ते निराळच!"

बरड्याच हे आर्थिक स्पष्टीकरण सपण्यापूर्वीच हिरमुसल्या चेहऱ्याने डासानी आपल पाकिट कुकडेसमोर धरलं. त्याबरोबर पाकिटातील सिगरेटीकडे आशाळभूतपणान पाहात कुकडे म्हणाला, "छे! मीहि सोडली आहे सिगरेट. अलीकडे मला भूक कमी लागू लागली होती. पण आता सिगरेट सोडल्यापासून कशी अगदी शहामृगासारखी भूक लागते!"

त्याच बोलण संपण्यापूर्वीच डासानी जोशीच्यासमोर पाकीट धरून

त्याला आग्रह करण्याचं नाटक सुरू केलं होतं. जोशीनं त्याच्या पाकिटावर एकदम झडप घातली. आता हा आपला निश्चय मोडतो की काय, ह्या विचारानं आम्हा तिघांच्या तोंडून एकच भीति आणि उत्सुकता दर्शविणारा उद्गार बाहेर पडला. त्याबरोबर एकदम खजील होऊन जोशी म्हणाला, "नाहीं! आपलं पाहलं कुठली सिगरेट आहे ते! हो. मीहि सिगरेट सोडली आहे. सिगरेट ओढल्यानं तोंडाला घाण येते."

त्याच्या तोंडून हे वाक्य पुरतं बाहेर पडतं न पडतं तोंच नेहमींच्या सवयीप्रमाणं आम्ही तिघे एकदम ओरडलो, "पण त्याचा तुला त्रास होण्याचा कांहींच संभव नाही!"

हें वाक्य उच्चारून नेहमीप्रमाणं हसून झाल्यावर त्यातील फोलपणा आमच्या लक्षात आला, आणि आम्ही खजील होऊन मुकाट्यानं पत्ते खेळू लागलो. डासानी आपल्या मुठीत सिगरेट धरून एक फर्मास झुरका मारला, तेव्हा माझ्या हृदयात कुणीतरी गिरमिट फिरवीत असल्यासारखं मला वाटलं. इतर तिघानाही त्यांच्या हृदयात तसंच कांहींतरी चाकू-कट्यारी खुपसल्यासारखं वाटत असावं, असं त्यांच्या चर्येवरून दिसून येत होतं.

डासानीं हे जें आमच्यासमोरच धूम्रपान सुरू केलं होतं, ते आम्हाला मुळीच आवडत नव्हतं. त्यातून ते आम्हाला वरचेवर जो खोटाच आग्रह करायचे, तो तर आम्हाला दुःखावर डागण्या दिल्याप्रमाणंच असह्य व्हायचा, त्या वेळीं मोहाचा प्रतिकार करताना आमच्या मनावर इतका ताण पडायचा कीं तें आता एखाद्या रबराप्रमाणं तुटतं कीं काय, अशी आम्हाला भीति वाटे. ह्याचा परिणाम जो व्हायचा तोच झाला. आम्ही चिडखोर आणि घुमे बनू लागलो. कुणी कुणाची थट्टामस्करी करीना. कधीं कुणीं केलीच तर एकदम हमरीतुमरीवर यायचे. पत्त्यावरून तर मिनिटामिनिटाला आम्ही भाडूं लागलों. तोंड दाबून बुक्क्याचा मार द्यावा, तसं आम्हाला झालं होतं.

अखेरीस, एक दिवस बाहेर पाऊस पडत होता, हवेत मजेदार गारवा होता, आमचा नुकताच गरमागरम चहा पिऊन झाला होता, डासानी आपल्या पाकिटातून एक सिगरेट काढून तिचे नुकतेच दोन-तीन

झुरके मारले होते, त्याचा जाड धूर विजेच्या दिव्यावरून हलकेच तक्तपोशीकडे तरगत जात होता, सिगरेटचा मादक दर्प क्लबाच्या हॉलमध्ये दरवळला होता, आम्हा चौघाचीहि दृष्टि टेबलावर पडलेल्या एका वस्तूवर लागलेली होती. त्या वेळी जर आमच्या दृष्टीकडे कुणी पाहिल असत, तर तिच्यातील भाव पाहून तो खात्रीन घाबरला असता. खून करायच्या इराद्यान आलेल्या माणसाच्या मनातील भयकर झगडा दाखविणारी ती दृष्टि होती, आणि आम्हा चौघाचीहि ही खुनी दृष्टि टेबलावर पडलेल्या डासाच्या सिगरेटच्या पाकिटावर खिळलेली होती. आम्ही कोणीच सिगरेटच्या वाटेस जात नाही, अशी खात्री झाल्यामुळ डास अलीकडे आपल पाकीट निर्धास्तपणान टेबलावर आमच्या पुढ्यात टाकून देत असत.

थोडाच वेळ त्या भयकर नजरेन आम्ही त्या पाकिटाकडे पाहिलं असेल. आम्हा चौघाचेहि हात त्या पाकिटावर एकाच क्षणी पडले. एखाद्या मौल्यवान् रत्नाकरता चार दरोडेखोरानी करावी तशी आम्हा चौघाची त्या पाकिटाकरता थोडा वेळ झटापट झाली, आणि जेव्हा सर्व सिगरेटीचा पूर्ण चेदामेदा झाला आहे अशी आमची खात्री पटली, तेव्हाच आम्ही एकमेकाना सोडल. जरासा दम घेऊन झाल्यावर मी ओरडलो, “ बाळा, सिगरेटच एक पाकीट आण ! ”

“ माझ्यासाठीहि एक आण !” बरडे ओरडला.

“ माझ्याकरता दोन आण !”—जोशी.

“ असतील नसतील तेवढी मला आण ! ”—कुकडे.

सिगरेटची पाकिट येईपर्यंत आम्ही, एकमेकाचे पिढीजाद वैरी असावेत अशा दृष्टीन एकमेकाकडे पहात राहिलो. पाकिट आल्यावर प्रत्येकान एकेक सिगरेट काढून घेतली, क्षण दोन क्षण तिला कुरवाळल्यासारख केल आणि मग एकदम तोडात धरून तिला प्रत्येकान पटापट पेटवल.

इतक्या दिवसाच्या विरहानतर त्या गौरागीचा ओठाना होणारा स्पर्श मला अमृतासारखा मधुर वाटला. फार कशाला ? त्या वेळीं एखादी मेनका हातात अमृतान भरलेला चषक घेऊन माझ्यासमोर उभी राहिली

असती, तरी मी तिला झिडकारून टाकली असती. प्रत्येकाने दोनदोन चारचार झुरके अधाशीपणाने मारून झाल्यावर, चमत्कार झाल्याप्रमाणे आमचे चेहरे पूर्ववत् आनदी दिसू लागले. पहिल्या सिगरेटवर आम्ही दुसरी सिगरेट शिलगावली, तेव्हा आमच्या थट्टामस्करीला आणि हसण्या-खिदळण्याला चागलाच ऊत आला. तिसरी सिगरेट पेटवली तेव्हा आम्हाला एकमेकाबद्दल आपलेपणा वाटू लागला, चौथी सिगरेट सपली तेव्हा तर आम्ही विश्वबधुत्वाचे गुलाम झालो, आणि मग त्या भरात आम्ही डासाना किती सिगरेटी पाजल्या, व त्याना ह्यापुढे न कुरकुरता पाहिजे तेवढ्या सिगरेटी फुकटात पाजण्याचा अनुच्चारित ठराव केव्हा पास केला, हेदेखील आम्हाला कळून आले नाही !

# रागावरचा मंत्र

मानवाच्या षड्रिपूमधला रिपु नं. २ जो क्रोध, त्याच्या तडाख्यातून कुठला संसारी मनुष्य सुटला आहे ? संसारी माणसाचीच गोष्ट कशाला ? दुर्वास–विश्वामित्रासारखे मोठमोठे तपोधनहि ह्या रिपूला बळी पडल्याचे दाखले पुराणांतरी नमूद आहेत. मग अशा ह्या प्रबळ शत्रूवर विजय मिळविण्याचा, निदान त्याचा प्रभाव कमी करण्याचा, एखादा मंत्र सापडला, तर तो कुणाला नकोसा होईल ?

मुंबईचे प्रोफेसर भिंगरे ह्यांना असा एक गुणकारी मंत्र सापडला आहे. खरं पाहिलं तर वाफेच्या इंजनाप्रमाणं किंवा गाणाऱ्या यंत्राप्रमाणं प्रो. भिंगऱ्यांनी काही अजिबात नवीन शोधून काढलं आहे, अशातला नाही. ह्या बाबतीत त्यांची कुणा मोठ्या माणसाशी तुलना करायचीच झाली, तर ती कोलंबसशी किंवा सर आयझॅक न्यूटनशी अधिक यथार्थतेने करता येईल. कोलंबसने अमेरिका खंड शोधून काढण्यापूर्वीहि ते अस्तित्वात होतं, आणि न्यूटनने गुरुत्वाकर्षणाचा नियम शोधून काढण्यापूर्वीहि वरून खाली पडणाऱ्या वस्तू त्याच नियमानुसार खाली पडत होत्या. त्याचप्रमाणं प्रो. भिंगऱ्यांनी हा रागावरचा मंत्र शोधून काढला आहे, असं जरी वर म्हटलेलं असलं, तरी तो मंत्र, प्रो. भिंगऱ्यांना त्याचा शोध लागण्यापूर्वीहि अस्तित्वात होता, त्यांनी तो मला सांगण्यापूर्वी मीं तो हजारदा ऐकला होता. तुम्हीहि कदाचित् रस्त्यानं जाता जाता तो मंत्र सहज दहापांच वेळा ऐकत असाल. परंतु तो मंत्र रागाचं शमन करतो, क्रोधवन्हीवर जलसिंचन करतो, हें आपणाला ठाऊक नव्हतं.

त्या मत्राचा हा असा उपयोग आहे, हे शोधून काढण्याचं सारं श्रेय प्रो. भिगऱ्याना दिल्याखेरीज गत्यतर नाही.

थोडक्यात म्हणजे हा मत्र—पण छे! हा मत्र, किंवा कुठलाच मत्र उघडपण कुणी कुणाला सागत नाही. अर्थात् मीहि तो तुम्हाला सागत नाही.

पण एक मात्र तुम्हाला नक्की सागतो. तो मत्र एकदा तुम्हाला समजला, की तुमच्या रागाचा पारा पूर्वीइतका वर चढणार नाही. तुम्हाला कुणी काहीं लागेल असं बोलल, कुणी तुमचा अपमान केला, तर केवळ तुम्ही हा मत्र तोंडातल्या तोंडात पुटपुटा, की सूर्यप्रकाशात वितळणाऱ्या धुक्याप्रमाण तुमचा राग, क्रोध, सताप वगैरे सारं काही क्षणार्धात नाहीसं होऊन जाईल.

उतारूनी भरगच्च भरलेल्या ट्राममध्ये शिरण्याचा तुम्ही प्रयत्न करीत असताना, कडक्टरन तुम्हाला खाली ढकलून दिलं तर हा मत्र पुटपुटा, आणि झाला प्रसग क्षणार्धात विसरून मागून येणाऱ्या दुसऱ्या भरलेल्या ट्राममध्ये घुसण्याकरता धक्काबुक्की करा.

तुम्ही आगगाडीन प्रवास करीत असता खिडकीतून कुणी बाहेरून तुमच्या डोक्यावर एखादी ट्रक टाकली, तर ह्या मत्राचा ओठातल्या ओठात उच्चार करा, आणि त्या ट्रकेची काहीं मोडतोड झाली आहे का, ह्याची ट्रकेच्या मालकाजवळ मित्रभावान पृच्छा करा.

साराश, ह्या ससारात असा कुठलाहि प्रसग नसेल, की ज्या वेळीं आपला भडकलेला क्रोधाग्नि ह्या मत्राच्या जलसिंचनान शात होणार नाही.

खर पाहता, प्रो. भिगऱ्यासारख्या माणसाला आमच्या ‘गोदावरी टी—क्लब’मध्यें नेण्यात माझी चूकच झाली. प्रो. भिगरे हे एक विद्वान् प्रोफेसर तर आहेतच, पण ते समाजातील उच्च वर्गाचे एक घटक आहेत. त्यानी आपल्या आयुष्यातील दोनतीन वर्षे विलायतेच्या थड आणि शिस्तप्रिय हवेंत काढलेली आहेत. त्याना शिस्तप्रियतेची, रीतीभातीची, टापटिपीची, ठाकठिकीची, सभ्यपणाची, व्यवस्थितपणाची, वक्तशीरपणाची, चटपटीतपणाची, वगैरे वगैरे सर्व चागल्या पणाची आवड आहे. त्याचमुळे मुबईतदेखील ते ताज किंवा मॉजिनीखेरीज दुसऱ्या हॉटेलात सहसा जात

नाहीत. गेलेच, तर एखाद्या भपकेबाज इराण्याच्या हॉटेलात. हिन्दू हॉटेलाचं तर नावच घेऊ नका !

आणि अशा माणसाला पाहुणचाराच्या भरात आमच्या मोडक्या-तोडक्या 'गोदावरी टी क्लब' मध्ये घेऊन जाण्याची मला बुद्धि झाली ! आम्ही सायकलीवरून पाडवलेणी पाहायला गेलो होतो परत येताना प्रो. भिगऱ्यानी आपणाला तहान लागली असल्याचं मला सांगितलं, आणि मग ते 'नको नको' म्हणत असतानाहि आग्रह करकरून मी त्याना तृषा-शमनार्थ त्या हॉटेलात नेलं. प्रो भिगऱ्यासारख्या माणसाला 'गोदावरी टी क्लब' सारख्या हॉटेलात नेल्यावर मग काय प्रकार घडला असेल, हे चाणाक्ष वाचकाना न सांगताहि समजण्यासारखं आहे —पण जे वाचक इतके चाणाक्ष नसतील, त्यांच्याकरता तरी सांगतोच.

असल्या हॉटेलात प्रो भिगऱ्यानी स्वप्नातदेखील पाऊल टाकलेलं नसेल. ते ज्या ज्या गुणाचे चाहते होते, ते सारे गुण तिथे अभावानंच तळपत होते. एका मोडकळीस आलेल्या व धुरकटलेल्या जुनाट घरात हे हॉटेल थाटलेलं होतं. लाकडाची तकलादी टेबलं, व लोखंडाच्या तारा पिळून बनविलेल्या गंजलेल्या पत्र्याच्या खुर्च्या, असा तिथल्या फर्निचरचा थाट होता. मालकापासून तो चहा आणून देणाऱ्या पोऱ्यापर्यंत सर्वांचा पोषाख मातीचा व कोळशाचा बनविलेला होता, व त्यावर मधूनमधून कपड्याचे डाग पडलेले दिसत होते. आणि ह्या अशा हॉटेलला शोभतील अशीच दोन-तीन जानपद गिऱ्हाइकं आपल्या पोटोबाची आराधना करीत पूर्ण समाधान वृत्तीने एका टेबलाशी बसलेली होतीं.

माझ्या आग्रहाला मान देऊन, अनिच्छेनेच का होईना, प्रो. भिगरे आपले कपडे खराब होतील म्हणून अंग चोरीत माझ्याबरोबर त्या 'टी क्लबा'त शिरले. आपल्या सेंट शिंपडलेल्या रेशमी रुमालाने त्यानी एक खुर्ची झटकली व तिच्यावर बसल्याप्रमाणं केलं.

"काय घेता ? सोडा की लेमन ?" मीं विचारलं.

"अं ? सोडालेमन नको, चहाच मागवा. निदान तो उकळलेला तरी असेल ! खुर्चीच्या बसण्याकरता म्हणून योजलेल्या पत्र्यामध्यें व आपल्या

पार्श्वभागामध्यें शक्य तेवढ अधिक अतर राहील, अशा रीतीन बसण्याची कसरत करीत प्रोफेसरमजकूर म्हणाले, " दुसरीकडे कुठे काही घ्यायच असल तर मी चहाच घेतो. कारण तो उकळलेला असल्यामुळे त्यातल्या जतूचा नाश तरी झालेला असतो."

मीं दोन चहाची ऑर्डर दिली एवढ्यात हॉटेलचा पोऱ्या आमच्याजवळ आला. ' एक माणूस दोन आणे ऽ अऽ ! ' अस तो प्रो भिगऱ्याच्या कानाशी किंचाळला, आपल्या खांद्यावरच काळ कुळकुळीत आणि ओल फडक घेऊन हाताच्या एकाच फटकाऱ्यान त्यान आमच्यासमोरच टेबल आमच्या अगावर साफ केल. माझ्या पाटलोणीवर दोन खारी बुदी आणि एक शकरपाळयाचा लहानसा तुकडा पडला. प्रो. भिगऱ्याच्या फ्लॅनेलच्या पॅटवर दोन भज्याचे तुकडे, एक चकलीचा बारीकसा तुकडा आणि पाण्याचे चारपाच थेब पडले.

" अरे अरे ! काही माणस बघतोस की नाही ? ' प्रो. भिगरे सात्विक सतापाने उद्गारले.

" काय झाल साहेब ? " आपल फडक खांद्यावर टाकून, विठोबासारखे कबरेवर हात ठेवून आणि छाती पुढे काढून त्या पोऱ्यान कुऱ्यात विचारल.

" अरे, टेबल साफ करताना जरा माणसबिणस पाहा. हे सार खरकट आमच्या कपड्यावर पडल ना !"—प्रो. भिगरे.

" एखाददुसरा कण तर उडाला साहेब ! पाहिजे तर पुसून टाकतों. रागावता कशाला ? " अस म्हणून पोऱ्या आपल्या त्या फडक्यान प्रो. भिगऱ्याची माडी झटकायला सुरुवात केली. त्याबरोबर ' अरे अरे ' करीत प्रो. भिगरे टुणकन् उभे राहिले. पोऱ्या निर्लज्जपणान हसत हसत निघून गेला. प्रो भिगऱ्यानी आपल्या पॅटकडे पाहिले. आता मात्र त्याच्या पॅटवर एक चागलाच डाग पडला होता.

" आपल्या लोकाना ' मॅनर्स ' कधीं येतील कोण जाणे ! " तो डाग रुमालान पुसून काढण्याचा प्रयत्न करीत प्रो. भिगरे रागान उद्गारले.

"इग्लडमध्यें अशा वेटरला एक क्षणभरदेखील हॉटेलात ठेवणार नाहीत. काय त्याची ती स्वच्छता, त्याची टापटीप, नम्रता ! छे, आपला देश अजून जगाच्या फारच मागे आहे "

एवढ्यात विजेच्या वेगाने त्या पोऱ्याने दोन बिनकानाचे चहाचे कप आमच्यासमोर आणून आदळले त्याच ते आदळण इतक कौशल्यपूर्ण होत, की त्या कपबशा चिनी मातीच्या असूनहि फुटल्या नाहीत. ते पाहून आमची थोडीशी निराशाच झाली.

माझ्या चहात एक शेवेचा तुकडा पडला होता. मी त्या पोऱ्याला म्हटल, "काय रे, चहात हे काय पडलय् ?"

त्यान माझ्या चहात डोकावून पाहिल. तो म्हणाला, "शेव आहे ती. अगदी ताजी आहे. खाऊन टाका साहेब ! त्याचे तुम्हाला काही जास्त पैसे पडणार नाहीत !"

येवढे बोलून तो पटकन् निघून गेला. ती शेव मी बोटाने गुपचूप काढून टाकली तो विषय मला वाढवायचा नव्हता नाही तर प्रो. भिगरे वेळोवेळी उपाहारगृहातील चहाच्या कपात सापडणाऱ्या क्षुद्र प्राणिसृष्टीतील घटकाची आठवण होऊन, शिसारी येऊन उठून चालायलाच लागले असते, आणि माझा पाहुणचार तसाच राहिला असता ! म्हणून मीं माझा राग चहाच्या घोटाबरोबरच गिळून टाकला.

" किती 'डर्टी' आहेत हे चहाचे कप !" जिथ पूर्वी कपाचा कान होता, त्या भागावर साचलेला काळा मळ आपल्या नखान खरडून काढण्याचा प्रयत्न करीत प्रो. भिगरे म्हणाले. पण तो मळ कपाशी इतका एकजीव झालेला होता, कीं कपबशा विसळताना तो निघाला नाहीं, ह्याविषयीं पोऱ्याला दोष देण्यात काहीच अर्थ नव्हता. प्रो. भिगरे पुढे म्हणाले, "हिंदी लोकाना स्वच्छतेच महत्त्व कधी कळणार कुणाला ठाऊक ! मी जेव्हा इग्लडमध्यें होतो "

"आणखी काय पाहिजे साहेब ?" मध्येच येऊन आपल्या त्या ओल्या मळकट फडक्यान उगाचच टेबल पुसून काढीत त्या पोऱ्यान प्रश्न केला.

"जरा स्वच्छता!" विनयाच्या आवाजात प्रो. भिगरे ताडकन् उत्तरले. इग्लडात अशा उत्तराला 'रिपार्टी' म्हणतात.

"स्वच्छता?" तो पोऱ्या गोंधळून उत्तरला, "आज स्वच्छता तयार नाही!"

स्वच्छता म्हणजे तो एखादा खाण्याचा पदार्थ समजला असावा. मी मोठमोठ्याने आणि प्रो. भिगरे रुमालातल्या रुमालात हसले.

आपल्या क्षणिक विजयाने प्रो. भिगरे थोडेसे खुलले होते. ते त्या पोऱ्याला म्हणाले, "भल्या गृहस्था, हा चहाचा कप कधी धुतला होता काय?"

"होय साहेब!" फडके खाद्यावर टाकून परत जाता जाता तो पोऱ्या सहज म्हणाला, "रोज आम्ही धोब्याकडून आणतो ना कपबशा! आणखी काय पाहिजे?"

प्रो. भिगऱ्याचा पारा हिदुस्थानातील ह्या 'कटवण्या'ने एकदम वर चढला. उरलेला चहा त्यानी गटगटा पिऊन टाकला, आणि ते म्हणाले, "काहीच मॅनर्स नाहीत ह्या लोकाना. आणखी पन्नास वर्षे हिदुस्थानला स्वराज्य मिळाल नाही तरी मला आश्चर्य वाटणार नाही! काय हा उर्मटपणा! इग्लडात "

झाला एवढा प्रकार पुरे झाला अस समजून मी पैसे चुकते करून 'गोदावरी टी क्लब'मधून प्रो. भिगऱ्याना घेऊन बाहेर पडलो. ह्या चहापानामुळ प्रो. भिगरे चागलेच्च गरम झाले होते. त्याची सारखी हिदी लोकावर टीका चालली होती. प्रत्येक गोष्टीत ते इग्लड आणि हिदुस्थान ह्याची तुलना करीत होते, आणि मधून मधून इग्लडमधील आपले अनुभव कथन करीत होते. त्याना राग आलेला आहे, हे त्याच्या आवाजावरून स्पष्ट दिसून येत होत.

**मी** त्याना मग सुदर-नारायणाच देऊळ दाखवायाला घेऊन गेलो. ते पाहून ते म्हणाले, "आर्किटेक्चर सुदर आहे. पण त्याची अपकीप नाहीं. आपल्या लोकाच हेच चुकत. मघाचा हॉटेलातील तो पोऱ्याच पहा ना. ..."

मग मी त्याना गगेच्या घाटावर घेऊन गेलो. तिथल्या जवळ जवळ आटलेल्या रामकुडाच्या गाळात डुबक्या घेणाऱ्या भाविक लोकाकडे पाहून ते म्हणाले, " डर्टी ! कधी आपल्या लोकाना स्वच्छतेच महत्त्व कळणार, कोण जाणे ! मघाच्या हॉटेलातला तो पोऱ्या "

त्या हॉटेलातील पोऱ्यावरचा त्याचा राग त्याच्या मनात अजून धुमसत होता हे स्पष्ट दिसत होत. कुठलाहि विषय निघाला की ते त्या पोरावर येऊन घसरत. त्या रागाचा त्याना विसर कसा पाडावा, हेच मला कळेना.

आम्ही पुढ चालू लागलो. प्रो. भिंगऱ्याच इग्लडवरच व त्या पोरावरच व्याख्यान चालूच होत. त्या पोऱ्यावर कितीहि टीका केली, तरी त्यान केलेल्या अपमानाच उट्ट काढल्याच त्याना समाधान मिळत नव्हत, म्हणूनच ते त्याचा विषय पुनःपुन्हा उकरून काढीत होते आणि त्याच्यावर टीका करीत होते. इतक्यात आमच्या पाठीमागच्या बाजूस काही तरी गडबड चाललेली आम्हाला ऐकू आली, आणि आम्ही तिकडे पाहू लागलो.

दोन भिकाऱ्याच्या पोराची मारामारी चालली होती. एका मोठ्या पोरान दुसऱ्या एका लहान मुलाच डोक आपल्या बगलेत दाबून धरल होत. आणि दुसऱ्या हाताने तो त्याच्या पाठीत मनापासून गुद्दे लगावीत होता त्या लहान पोराची सुटण्याकरता धडपड चालली होती, नी आपली सारी शक्ति एकवटून तो ओरडत होता. अखेरीस त्या लहान पोराला झाली एवढी शिक्षा बस्स झाली अस त्याला वाटल असाव, म्हणून असेल किंवा त्याच्या हाडकुळ्या पाठीवर गुद्दे मारून मारून हात दुखू लागल्यामुळे असेल, त्या मोठ्या पोरानं त्या लहान पोराला सोडून दिल, नी शेवटचा एक तिरगी झेडा आपल्या लहानग्या शत्रूच्या गालफडावर उमटवून तो निघून गेला.

तो जरा दूर जाईपर्यंत तो लहान मुलगा आपल्या फुफ्फुसातील सारी शक्ति एकवटून मोठमोठ्यान रडत होता आणि आपल्या मळकट कुडत्याच्या बाह्यानी आपल्या डोळ्यातून वाहणाऱ्या गगायमुना टिपून घेत होता. पण मग आपला शत्रु आता बराच दूर गेला आहे, नी कितीहि डिवचल तरी तो आता परत येण्याचे श्रम घेणार नाही, अशी त्याची खात्री होताच, त्या मोठ्या पोराविषयींची व त्याला पूज्य असलेल्या त्याच्या पूर्वजाविषयींची

आपलीं मतं कांहींहि आडपडदा न ठेवतां तो कंठरवानं सांगूं लागला. अर्थात् तिकडे दुर्लक्ष करून आम्ही पुढील रस्ता चालूं लागलों.

आम्ही थोडेसे पुढं गेलों असूं. पाठीशीं त्या लहानग्या पोऱ्याचं बोलणं ऐकूं आल्यामुळं आम्हीं वळून पाहिलं. हसऱ्या चेहऱ्यानं हात पुढं करून तो पोऱ्या आमच्याकडे भीक मागत होता.

त्याला भीक मिळण्याऐवजीं, स्वच्छता, उद्योगप्रियता, कष्टार्जनांतील आनंद, सभ्यता व इंग्लंडांतले आपले ह्याविषयींचे अनुभव, ह्यांवर प्रो. भिंगऱ्यांकडून एखादं व्याख्यान ऐकण्याची शिक्षा मिळणार, अशी मला भीति वाटली. प्रो. भिंगऱ्यांचा चेहराहि विचारमग्न दिसत होता! नुकतंच तें बालक ज्या प्रसंगांतून पार पडलं होतं, त्यानंतर त्याला लगेच प्रो. भिंगऱ्यांच्या तोंडीं देणें, म्हणजे मला निष्ठुरपणाची पराकाष्ठा वाटली. एखादी दिडकी देऊन त्याला वाटेला लावावें, नी ह्या संकटापासून त्याचं संरक्षण करावं, ह्या उद्देशानं मी माझ्या कोटाचा आंतील खिसा चाचपूं लागलों.

पण अशी एखादी दिडकी माझ्या हाताला लागण्यापूर्वीच प्रो. भिंगऱ्यांनीं आपल्या खिशांतून एक पावली काढून त्याच्या हातावर हसत हसत फेकली होती.

इंग्लडांत दोन तीन वर्षं राहून आल्यानंतर निरुद्योगीपणाला नी ऐतखाऊपणाला त्यांनीं असं उत्तेजन दिलेलं पाहून मीं आश्चर्यानें आच वासला. मीं त्यांना म्हटलं, “ अहो, ती दिडकी नाहीं, पावली आहे ! ”

“ मला माहीत आहे !” हसत हसत ते म्हणाले. “ मीं मुद्दामच दिली ती त्याला. ”

“ एकदम पावली ?”

“ हो. तो माझा गुरु आहे. आणि ती गुरुदक्षिणा आहे ! ”

“ गुरुदक्षिणा ! ती कशाबद्दल ? ”

“ मला त्यानं एक मंत्र दिला आहे. ”

“ कसला मंत्र ? ”

“ रागावरचा ! चला ! ”

अस म्हणून आम्ही आलेल्या रस्त्यानं ते उलट फिरले. त्याच्या ह्या गूढ बोलण्याचा नी विचित्र वर्तणुकीचा मला काहीच अर्थ कळेना. ते एकदम माग फिरले ते कुठ जाण्याकरता, ह्याचाहि पत्ता लागेना.

पण त्याच्यात आता एकदम फरक पडलेला मला दिसून आला होता. त्याचा चेहरा हसरा झाला होता तोडान ते एका इग्रजी गाण्याची शीळ घालीत होते, आणि जन्मात आपल्याला कधी काळजी नव्हती, अशा तोऱ्यात ते चालले होते. मघाचा तो हॉटेलातील पोऱ्या, हिंदी लोकाचे दुर्गुण, इग्लड, वगैरे साऱ्या साऱ्या गोष्टी ते अजिबात विसरून गेल्याप्रमाण दिसत होते. त्याच्या मनाला त्रास देणारा तो राग कुठल्या कुठ पळून गेल्याप्रमाणे दिसत होता

अर्थात् त्याच्यातला हा फरक त्या पोऱ्यान त्याना दिलेल्या रागावरच्या मत्रामुळेच घडून आला होता, हे खास ! पण असा कुठला मत्र त्या पोरान त्याना दिला होता ? तो तर भीक मागण्याखेरीज दुसरा एकहि शब्द आमच्याशी बोलला नव्हता. तस त्यान काही प्रो. भिगऱ्याना सागितल असत, तर खासच ते माझ्या लक्षात आल्याविना राहिल नसत.

आम्ही रस्ता चालत होतो, पण आम्ही कुठे जात आहोत, हे काही मला समजेना, म्हणून मी विचारल,

" कुठ जायच आता ? "

" गोदावरी टी क्लबमध्ये ! "

तुम्ही थट्टा तर करीत नाही ना, अशा आशयाची पृच्छा करणाऱ्या दृष्टीन मी त्याच्याकडे पाहिल. ते ओळखून ते 'खरच !' एवढाच एक शब्द हसत हसत उद्गारले.

आम्ही जात होतो, ते 'गोदावरी टी क्लब'च्या दिशेनच, ह्यात शका नव्हती. मघा तिथ आमची एवढी शोभा झाल्यावर, त्या तसल्या उर्मट नोकरानी भरलेल्या घाणेरड्या हॉटेलात, प्रो. भिगऱ्यानी आपण होऊन परत जायला निघाव, ह्या त्याच्या अजब वर्तनाचा मला मोठाच अचबा वाटला आणि माझ्या मनात गोंधळाची वावटळच उठली.

लवकरच आम्ही त्या हॉटेलात जाऊन पोचलो. असल्या हॉटेलात नेहमीं जाणाऱ्या गिऱ्हाइकाच्या सराइतपणान प्रो. भिगऱ्यानी एका डळमळणाऱ्या खुर्चीवर आसन ठोकल आणि दोन कप चहाची ऑर्डर दिली.

मघाप्रमाणेच त्या पोऱ्यान टेबल साफ करताना आमच्या पाटलोणीना खारी बुदी खाऊ घातल्या. मला वाटल, आता प्रो. भिगरे त्याच्या अगावर खेकसणार! पण तस काहीच झाल नाही. त्या भिकाऱ्याच्या पोऱ्यान त्याना दिलेला तो रागावरचा मत्र ते तोडातल्या तोडात पुटपुटले, आणि जणू काही झालच नाही, असे बसून राहिले.

त्या मत्राच्या ह्या विलक्षण प्रभावाच मला आश्चर्य वाटल, नी तो मत्र जाणून घेण्याविषयी माझ कुतूहल अनावर झाल. मी म्हटल, "प्रोफेसरसाहेब आता फार झाल! सागा ना मलाहि तो मत्र!"

"तुम्हीहि ऐकला आहे तो!"

"पण मला नाही ना आठवत!"

"तुमची निरीक्षणशक्ति—किंवा श्रवणशक्ति तोकडी आहे!" मिटक्या मारीत चहाचे घुटके घेता घेता प्रो. भिगरे म्हणाले, "मघाचा तो सारा प्रसग नीट लक्षात आणा. त्या मोठ्या पोऱ्यान त्या लहान पोऱ्याला कसा बेदम मार दिला. नतर तो लहान पोऱ्या किती रडत होता! त्याला किती दुःख झाल होत! अपमानान नी रागान तो आतल्या आत कसा जळफळत होता! होय ना?"

"हू."

"पण नतर मग तो कसा हसतमुखान भीक मागायला येऊन उभा राहिला. आपल दुःख, आपला राग तो पार विसरून गेलेला दिसत होता. होय ना?"

"हो."

"हा त्या मंत्राचाच प्रभाव होता."

"तोच कुठला ते सागा ना!"

"समजेलच लौकर!" शातपणान त्या गढूळ चहाचा एक घुटका

घेऊन प्रो. भिगरे प्रवचन करूं लागले, " आपल्यासारख्या सुसस्कृत माणसाना आपला राग मनातल्या मनात कृत्रिम रीतीने दाबून ठेवण्याची सवय झालेली आहे. रागाला मोकळी वाटू न मिळाल्यामुळे तो आतल्या आत धुमसत राहतो नी आपण उगीचच मनाला त्रास करून घेतो. रागाला बाहेर पडण्याला मोकळी वाट करून देण, हेच ह्या मंत्राच कार्य मनाच्या बॉयलर-मधील रागाच्या वाफेच दडपण बेसुमार वाढल की तिला बाहेर सोडणारा हा सेफ्टी व्हॉल्व्हच आहे म्हणा ना ? "

मद्याच्याप्रमाणेच हॉटेलातील त्या पोऱ्याबरोबर प्रो. भिगऱ्यानी दोन बौद्धिक हात केले. चहा पिऊन झाल्यावर ते जागेवरचे उठले, नी पैसे चुकते करून हॉटेलातून बाहेर रस्त्यावर आले. नंतर मग रुमालान व्यवस्थित तोड पुसून ते मला म्हणाले, " तुम्हाला तो रागावरचा मत्र ऐकायचा आहे ना ? ऐका तर. "

मग त्यानी हॉटेलातील त्या पोऱ्याला जरा बाहेर बोलावून घेतल आणि त्या मत्राचा त्यानी अगदी मनापासून उच्चार केला.

प्रो. भिगऱ्यासारख्या सुसस्कृत, इग्लडात दोनतीन वर्षं काढलेल्या सद्गृहस्थाच्या तोडून बाहेर पडलेला तो मत्र ऐकून माझ्या डोक्यावर वज्राघात झाल्याप्रमाण मला वाटल ! त्या स्थितीत त्या भिकाऱ्याच्या पोऱ्याच्या तोडून तोच मत्र ऐकल्याच मला स्मरल.

हॉटेलातील पोऱ्या बाहेर आल्याबरोबर प्रो. भिगरे त्याला म्हणाले होते,—

"XX XXX"

# प्रोफेसर गजाभाऊ

"काय गजाभाऊ, टाकलत का माझ पत्र पोस्टात ?" प्रोफेसर गजाभाऊला सायकलवरून पुरत उतरू न देता मीं प्रश्न केला आणि त्यानहि 'हो !' अस, एखाद काम यशस्वीपणे पार पाडलेल्या माणसाच्या ऐटींत त्रोटक उत्तर दिल.

प्रो. गजाभाऊकडे पोस्टात टाकायला दिलेल पत्र त्यान पोस्टात टाकलेल नसल तर काय बहार होईल अस मला वाटत होत. त्यामुळ त्याच्या त्या उत्तरान मी निराश झालो. पण माणसाला आशा शेवटपर्यंत सोडीत नाहीं, म्हणून मीं त्याला परत प्रश्न केला, "नक्की टाकलस ?"

"हो बाबा. नक्की टाकल !"

"विसरला नाहीस ? खिसे चाचपून पहा एकदा. विसरून खिशातच राहिल असेल ?"

"पण मी सागतो ना खात्रीन टाकल तुझ पत्र म्हणून ?" स्वाभिमान दुखावल्याच्या चिडक्या आवाजात प्रो. गजाभाऊ म्हणाला.

"म्हणजे आज जन्मात तू पहिल्यानच विसरायच विसरलास !" निराशायुक्त स्वरात मीहि त्याला टोचून बोललो.

"छान ! म्हणजे आम्ही तुझ्यासाठी हमाली करावी आणि त्याच बक्षीस काय, तर टिगल ! पण तू समजतोस तितका काही मी विसराळू नाहीं, समजलास ?" घरात शिरताना गजाभाऊ रागारागाने बोलत होता.

" आता ह्यापुढ मात्र तुझ काही काम करायच नाही—अगदी कानाला खडा ! "

" परतु त्याच्या त्या बोलण्याकडे माझ फारस लक्ष नव्हत. नाहीतर त्याला मी ताबडतोब मस्करीत उत्तर दिल असत, " हो, पण ह्या तुझ्या निश्चयाची तुला आठवण मात्र राहिली पाहिजे ! " पण माझी मनःस्थिति त्या वेळी ठिकाणावर नव्हती. मी एक मोठाच मूर्खपणा करून बसलो होतो. मुबईला मेडिकल कॉलेजात असताना आमच्याच कॉलेजात असलेल्या सुलभा नातूशी माझी ओळख झाली होती. ती ओळख नतर प्रेमाच्या उबरठ्यापर्यत जाऊन कशी पोचली ह्याच वर्णन करून मी नाशकाला आणि सुलभा पुण्याला गेली होती. मुबईला शेवटचा निरोप घेताना एक दिवसाआड एकमेकाना पत्र लिहिण्याच्या आमच्या आणाभाका झाल्या होत्या. पत्र लिहिण्याला सुरवात सुलभेकडूनच होणार होती. परतु नाशकाला येऊन मला आता चागला पधरवडा लोटला होता तरी मला सुलभेकडून एक बोटभर चिठ्ठीसुद्धा आली नव्हती ! जसजसे तिच पत्र न येता दिवस जाऊ लागले तसतसा मला सुलभेचा राग येऊ लागला. अखेरीस आज मी तिला एक खरमरीत पत्र लिहून टाकल आणि तिचा मत्सर जागृत करण्याच्या उद्देशान त्यात खोटच लिहिल—" माझ्या वडिलानी इथ माझ्यासाठी एक मुलगी पाहून ठेवली आहे. कालच मी तिच्याकडे चहाला गेलो होतो. मोठी सुदर आहे पोरगी ! माझ्या मनात फार भरली आहे. सध्या तिच्या गोड सहवासात माझा काळ मोठ्या सुखात जातो आहे.. तरी आजपासून आपला सबध तुटला अस समज "

पुष्कळ विचार करून एकएक वाक्य लिहिता लिहिता पावणेसहा होऊन गेले होते. शेवटची डाक सहाला जात होती. पोस्ट—ऑफिस माझ्या घरापासून मैलभर तरी लाब होत. मला सायकलवर बसता येत नसल्यामुळ आणि गजाभाऊला ती कला अवगत असल्यामुळ, अखेरीस द्यायच्या त्या सर्व सूचना देऊन त्यालाच मी सायकलवरून पिटाळल होत.

पण ते पत्र घेऊन सायकलवरून वेगान जाणारी गजाभाऊची मूर्ति अदृश्य होताच मात्र माझ्या विचारानी एकदम उलट खाल्ली. मला राहून राहून वाटू लागल, की सुलभेला असल पत्र लिहिण्यात आपण काही

मोठासा शहाणपणा केला नाही. त्या पत्राचे परिणाम माझ्या दृष्टीसमोर मला दिसू लागले. सुलभेच्या मैत्रीसाठी प्रभाकर खरेहि खटपट करीत होता, पण तिन अजूनपर्यंत तरी त्याला दोन हाताच्या अतरावरच ठेवलेल होत. पण आता हे पत्र वाचून जर तिला माझा राग आला तर त्या भरात ती प्रभाकरला उत्तेजन द्यायची ! आणि विशेष म्हणजे प्रभाकरहि सध्या पुण्यालाच होता !—छे छे ! ते पत्र लिहिण्याची घाई करून मीं केवढी मोठी चूक करून ठेवली होती !

पण आता पश्चात्ताप करण्यात काय अर्थ होता ? सापान गिळलेला मणि आणि पोस्टाच्या पेटीन गिळलेल पत्र कधीतरी परत मिळाल आहे का ? मी सुन्नपणान बसलो असता मला आशेचा एक अस्पष्टसा किरण दिसला.

तो आशेचा किरण म्हणजे आमच्या प्रो. गजाभाऊचा विसराळूपणा ! गजाभाऊ म्हणजे मुलखाचा विसराळू तो एखाद्या कॉलेजातला खराखुरा प्रोफेसर नव्हता. त्याच्या विसराळू स्वभावामुळ कुठलीहि परीक्षा पास होण त्याला शक्यच नव्हतं. तसाच तो एखादा जादुगार किंवा सर्कशीचा मालक असलेला ‘ प्रोफेसर’हि नव्हता. आम्ही त्याला ‘ प्रोफेसर ’ ही पदवी दिली होती ती केवळ त्याच्या अगच्या एकाच अभिजात गुणाच्या जोरावर—विसराळूपणावर ! विद्वत्तेच्या नाही ! पण ह्या विसराळूपणाच्या बाबतींत तो कुठल्याहि अस्सल प्रोफेसराला हार गेला नसता.

आपल्या ह्या विसराळू स्वभावामुळ गजाभाऊ कितीतरी विचित्र घोटाळे करून ठेवी. कोठलहि काम त्याला सागितल की, त्यातली नेमकी महत्त्वाची गोष्ट तेवढी विसरून, त्या कामाच तो खोबर करून ठेवी. त्याचा विसराळू स्वभाव इतक्या पराकोटीला गेलेला होता, कीं केळ खाताना तो केळ्याची साल तोंडात घाली. आणि केळ फेकून देई.

पावसाळ्यात तो निदान दहापधरा छत्र्या तरी हरवून येत असे, पण तसाच लोकाच्याहि दहापधरा छत्र्या आपल्या समजून तो आणीत असे ही त्यातल्या त्यात जरा समाधानाची गोष्ट होती. त्याच्या विसराळू स्वभावाच्या एकएक गमती सागितल्या तर तुमच्या हसून हसून मुरकुड्या वळतील.

एकदा गजाभाऊला लग्न करण्याची हुक्की आली आणि एक दिवस सन्ध्याकाळी वधूपरीक्षा करण्याच्या निमित्तान एका नियोजित स्थळीं जाण्यासाठी तो बाहेर पडला. त्याला परत यायला बराच उशीर झाला. त्याच्या वधूपरीक्षेचा निकाल काय लागतो ह्याबद्दल आम्हा सर्वांना उत्सुकता वाटत होती. गजाभाऊ परत येताच आईन त्याला विचारल, " काय, पडली का पसत ? "

" हो. अगदी मनपसत. " गजाभाऊ खुशीत होता.

" दिसायुबिसायला कशी आहे रे ? "

" आहे काळीसावळीच ! "

" उचीन, अगाखाद्यान तरी बरी आहे ना ? "

" उचीन असेल चारएक फूट. अगानहि चागली भरदार आहे. "

आम्ही सर्वांनी एकदा एकमेकाकडे पाहिल. गजाभाऊच्या भावी वधूच रूपवर्णन ऐकून सर्वांचा हिरमोड झाला होता. आईन त्याला विचारल, " गजा, थट्टा तर नाही ना करीत तू ? असल ध्यान रे तुला कस पसत पडल ? "

" आई, ती दिसायला कशी का असेना, दिवसाच चागल पाचसहा शेर दूध देते ना ? झाल तर मग ! " अस म्हणून गजाभाऊ आत निघून गेला.

त्याच हे वाक्य ऐकून अकस्मात् अगावर वीज पडावी तशी आमची स्थिति झाली. नतर आम्हाला कळल, की मुलगी पाहायला बाहेर पडलेला गजाभाऊ वाटेत भेटलेल्या नारायण पाटलाबरोबर जाऊन एक दुभती म्हैस पाहून आला होता !

अशा ह्या आमच्या विसराळू गजाभाऊकडे ते पत्र मीं पोस्टात टाकायला दिल होत एवढी एकच गोष्ट ' कदाचित् ते पत्र पोस्टात पडणार नाहीं ' अशी आशा माझ्या मनात उत्पन्न करीत होती. म्हणूनच तो पोस्टातून परत येताना मी त्याच्यावर प्रश्नाची सरबत्ती केली. पण त्यानहि माझी निराशाच केली !

गजाभाऊच्या विसराळूपणाची वेळोवेळी मी कितीहि टिगल करीत

असलो तरी आज त्यान माझ पत्र विसरून पोस्टात टाकल नसत तर त्याच्या विसराळूपणाबद्दल मीं त्याच मनापासून अभिनदन केल असत! पण आपणाला पाहिजे असत तस नेहमींच कुठ घडून येत?

त्यानतरचे दोन दिवस मी कोणत्या विमनस्क स्थितीत काढले हे एक मीच जाणे! सारा दिवस विचार करकरून डोक पिकून जाई. रात्रीची धड झोप येईना. भुकेन तर पलायन केल होत. माझ्या उतावळ्या स्वभावाचा मला राहून राहून राग येई. ते पत्र वाचून सुलभेला काय वाटेल? किती दुःख होईल? ती मला विश्वासघातकी म्हणेल! तिचे ते सुदर डोळे रडून रडून सुजलेले माझ्या दृष्टीसमोर उभे रहात आणि माझ्या हृदयात कालवाकालव होई. शिवाय तिन माझ पत्र वाचून, सतापाच्या भरात प्रभाकर खऱ्यावर आपल्या प्रेमाची वृष्टि करायला सुरवात केलेली असली, तर मग मात्र सन्यास घेऊन हिमालयाचा मार्ग धरण्याखेरीज मला दुसरा इलाजच काय होता?

त्या दिवसानतर रोज सकाळीं मी पोस्टमनची वाट पाहात बसे. कदाचित् माझ पत्र वाचून माझी मनधरणी करणार एखाद पत्र सुलभा मला लिहील, किंवा माझी निर्भर्त्सना करणार का होईना, पण तिच मला पत्र येईल अशी मला आशा होती! "ये रागवावयाही, परि येइ येइ आई!" अशी यशवत कवीच्या 'आई' ह्या कवितेतील अभागी बालकाप्रमाण त्या पत्राबाबत माझी स्थिति झाली होती.

ह्याप्रमाण तीन दिवस गेले, पण पोस्टमनन माझ्याकडे ढुकूनहि पाहिल नाहीं. जणू माझ अस्तित्वच त्याला कबूल नव्हत. चवथ्या दिवशीहि मी पोस्टमनची वाट पाहात व्हराड्यात उभा होतो. गजाभाऊ एक कादबरी वाचीत जवळच एका आरामखुर्चीत पहुडला होता. वाचता वाचता मिटलेल्या पुस्तकात खुणेसाठीं आपल बोट ठेवून तो एकदम मला म्हणाला, "अरे हो, मधू! बरी आठवण झाली."

"काय?" मीं त्रासिकपणान विचारल.

"नाहीं. ह्या कादबरींतील नायिका नायकाला आपल्या गड्याबरोबर एक निरोप पाठवते त्यावरून आठवण झाली."

" अरे हो, पण काय आठवण झाली तुला ? "

" आठ दिवसापूर्वी मी पुण्याहून आलो तेव्हा तिथ मला सुलभा आणि तिचे वडील भेटले होते. तुला सागायला तिन एक निरोप दिला होता माझ्याकडे. "

" साग, साग लवकर. काय निरोप होता तिचा ? " मी अधीरतेन विचारल.

" काय बर होता तिचा निरोप ? " एवढ बोलून डोक खाजवीत गजाभाऊ थाबला ! त्याची ती शातता मला अगदी असह्य झाली. एखादी कुदळ त्याच्या मठ्ठ डोक्यात मारून खोल दडून बसलेला निरोप उकरून काढावा अस मला वाटू लागल. तो पुढ बोलू लागला, " ह आठवल. तिचे वडील आहेत ना बाबासाहेब "

" बाबासाहेब नाही, आबासाहेब " मी त्याची चूक दुरुस्त केली.

" समज्या रे. बाबासाहेब काय नी आबासाहेब काय, सारखच ! त्या गृहस्थाला कुठल्याहि नावान हाक मारली, तरी सुलभा ही त्या गृहस्थाची मुलगी आहे, ही वस्तुस्थिति काही बदलू शकत नाही. कुणीस म्हटल आहे नावात काय आहे म्हणून ! तर, सुलभा आणि तिचे वडील, आबासाहेब किंवा बाबासाहेब जे कोणी असतील ते पुण्यात मला भेटले होते. अगदी जुन्या मताचा आहे म्हातारा ! कजूष तर नबर एकचा ! मला चहा घेतोस का म्हणूनसुद्धा विचारल नाही ! सध्याच्या महागाईबद्दल तासभर वटवट केलीन् त्यान ! आणि निष्कर्ष काय काढला ? तर म्हणे, पत्र कमी लिहा, कार्डान काम होत असेल तर पाकिटासाठी दीड आणा खर्चू नका, आणि प्रवास तर मुळींच करू नका !. सभाळ रे बुवा ! तुझा भावी सासरा इतका कजूष आहे की तुला दिडकीसुद्धा हुडा मिळणार नाही ! " बोलता बोलता आपल्या हातातली कादबरी उघडून त्यान पुढ वाचायला सुरवात केली.

सुलभेचा निरोप काय असेल हे जाणण्यासाठी मी अगदी उत्सुक झालो होतो. गजाभाऊच्या ह्या वर्तनान मला त्याचा अतिशय राग आला आणि त्याला गदगदा हालवून मी म्हटल, " अहो प्रोफेसर, म्हटल तुम्ही मला सुलभेचा निरोप सागणार होता ना ? "

" अरे हो. तिचा निरोप–विसरलोच होतो. "

" मग सांग ना एकदाचा ! "

" काहीं विशेष नाही रे तिचा निरोप. तिनं तुला सांगायला सांगितलं होतं, की तिच्या वडिलांची तिच्यावर सक्त नजर आहे. म्हणून तुला कबूल केल्याप्रमाणं तिला पत्र लिहिता येणार नाही. आणि तूहि तिला पत्र पाठविण्याच्या भानगडीत पडूं नकोस. " हवापाण्याच्या गोष्टी बोलाव्यात इतक्या शांतपणानं गजाभाऊ म्हणाला.

पण त्याचे ते शब्द ऐकून भूकंप झाल्यासारखं मला वाटलं. झालं तर आता ! आमची प्रेमाची कादंबरी अपुरीच राहणार ! तिच्या त्या विक्षिप्त, जीर्णमतवादी बापाच्या हातांत माझं ते तसलं पत्र पडलं म्हणजे मग आटोपलाच सारा कारभार !

एवढा महत्त्वाचा निरोप वेळच्या वेळीं सांगायला विसरणाऱ्या गजाभाऊचा मला मनस्वी राग आला. मराठींत ' मूर्ख ' ह्या शब्दाचे सर्व पर्यायवाचक शब्द मला आठवले, पण गजाभाऊच्या मूर्खपणापुढं ते सर्व मला फिक्केच वाटले. मी ओरडून म्हणालो,

" मूर्खा ! आणि हा इतका महत्त्वाचा निरोप तू मला आज सांगतोस ? किती घोटाळा करून ठेवलास तू ! निदान त्या दिवशीं पत्र टाकण्यापूर्वी तरी मला सांगायचं होतंस. आठवणीचा खदक आहेस तू ! "

" वा ! हा खासा न्याय ! त्या दिवशीं न विसरतां तुझं पत्र मीं पोस्टांत टाकलं म्हणून तू रागावलास आणि आतां निरोप सांगायला विसरलों म्हणूनहि तू रागावतोस ! वाः ! छान ! " सात्त्विक रागानं गजाभाऊ म्हणाला.

" पण आतां तूच पाहा ना. तिचा निरोप होता पत्र लिहूं नको म्हणून, आणि मी तर तिला पत्र लिहून बसलोय्. आणि तूंहि त्या दिवशीं कधीं नव्हे तें न विसरतां पोस्टांत ते पत्र टाकलंस ! "

" मग, मी काहीं तू समजतोस तितका विसराळू नाही !" जराशा आढ्यतेनें गजाभाऊ म्हणाला, " पण आजपासून मात्र तुझं काहीहि काम करायचं नाहीं–अगदीं कानाला खडा ! "

आमच संभाषण आणखी किती वेळ लांबल असत कुणाला ठाऊक ! आम्ही एवढ बोलतो आहोत तो पायऱ्यावर वहाणाचा आवाज झाला आणि मीं वळून पाहिल तो माझ नाव पुकारीत पोस्टमन उभा !

त्याच्या हातातल पाकीट पाहताच माझ्या मनात एकदम विचार चमकून गेला–अखेरीस माझ्या सुलून मला पत्र लिहिलच तर ! माझी सुलभा–सुलू ! आपल्या जुनाट बापापासून चोरून पत्र लिहिण्यात तिला किती कष्ट झाले असतील ! त्या पाकिटावर लाल शाईन पत्ता लिहिलेला मला स्पष्ट दिसून आला. प्रेमाचा रग गुलाबीच असतो ना ? पोस्टमनच्या हातातून ते पत्र हिसकावून घेऊन त्याचे पटापट मुके घ्यावे अस मला वाटल पण जनलज्जेस्तव तो विचार मी रहित केला.

पोस्टमनन ते पाकीट माझ्या हातात दिल. त्याच्यावरच हस्ताक्षर माझ्या ओळखीच वाटल. पण सुलभेच हस्ताक्षर त्यावर मला कुठ दिसेना ! क्षणभरान माझ्या लक्षात आल, की सुलभेला मी लिहिलेलच पत्र परत आल होत ! त्याच्यावर डेड–लेटर ऑफिसचा शिक्का होता आणि तिथल्या कुणीं-तरी कारकुनान आपल्या फडर्या अक्षरात लाल शाईन माझा पत्ता लिहिलेला होता.

“ साहेब, तीन आणे द्या. पत्र नॉटपेड आहे म्हणून मालकान घेतलं नाही. ” पोस्टमन म्हणाला.

मी गजाभाऊकडे एक कटाक्ष टाकला. शातपणान त्याच कादबरी–वाचन चालू होत. एकूण त्या दिवशी पाकिटावर तिकीट लावायला पुन:पुन्हा सागूनहि गजाभाऊ विसरलाच होता तर !

# बा ल मा न स शा स्त्र

बाबासाहेब इनामदाराच्या मृत्यूनंतर ( इडापिडा टळो, अमंगळ पळो ) काकरूपानं येणाऱ्या त्यांच्या आत्म्याला पिंडप्रदान करून स्वर्गाचे द्वार खुलं करण्याची किल्ली ज्यांच्याजवळ होती, असे बाळासाहेब हे त्यांचे एकुलते एक कुलदीपक होते. आज बाळासाहेबांचा सातवा वाढदिवस होता, व त्यानिमित्त मोठ्या मेजवानीचा बेत होता. पानं मांडून तयार होती. सारी निमंत्रित मंडळी जमा झाली होती पण डॉ. वामनराव अजून आले नव्हते व त्यांच्याकरिताच तर सारी मंडळी खोळंबून होती.

" आपण सुरवात करावी भोजनाला, डॉक्टरांना दोन तीन बोलावणी पाठवली पण त्यांचा काही पत्ता नाही. गेले असतील कुठं तरी व्हिजीटला. " कारभाऱ्यांनी बाबासाहेबांना सुचविले.

" छे, छे ! थांबू की आपण थोडा वेळ आणखी " बाबासाहेब म्हणाले, " झाला थोडा उशीर म्हणून काय झालं ? डॉक्टर आल्याशिवाय पंगत बसणार नाहीं ! "

" डॉक्टरमामा कां नाही आले अजून बाबासाहेब ? " लडिवाळपणाने त्यांना बिलगून बाळासाहेबांनी विचारले. " मला भूक लागली ना ! "

" येतील बरं आता, बाळासाहेब. " बाबासाहेब त्यांचा एक गालगुच्चा घेऊन म्हणाले, " काय लळा लागलाय् डॉक्टरांचा बाळासाहेबांना या आठ दिवसांत ! "

" खरंच बाई ! " आईसाहेब—इनामदारीणबाई—म्हणाल्या, " काय मोहिनी घातलीय् डॉक्टरांनी बाळासाहेबांवर देव जाणे ! "

"बाळासाहेब, आपण घ्याना जेवून!" कारभाऱ्यानी सुचविले, "आपण किती वेळ उपाशी राहाणार?"

"नाही. नाही." स्वयपाकघरातून बाहेर पडणारा पचपक्वान्नाचा सुवास हुगीत बाळासाहेब मोठ्या कष्टाने म्हणाले, "नाही. डॉक्टरमामा आल्याशिवाय मी जेवणार नाही."

ह्या त्याच्या उत्तरावर सर्वांनी डॉक्टरावर जडलेल्या त्याच्या त्या लोभाचे कौतुक केले आणि आपणाला ते जणू काही कळतच नाही, असा चेहरा करून बाळासाहेबानी आपल्या जरीच्या जाकिटाच्या खिशातून बदामपिस्ते काढून त्याचे बोकणे भरायला सुरवात केली.

पण येवढ्यात डॉ. वामनराव आलेच. स्वत बाबासाहेबानी सामोरे जाऊन त्याचे मोठ्या अगत्याने स्वागत केले. बाळासाहेब तर त्याच्या कमरेला मोठ्या लडिवाळपणाने बिलगून 'डॉक्टरमामा आले, डॉक्टरमामा आले' असे ओरडायलाच्च लागले.

लवकरच पगती बसल्या. इनामदाराच्या घरच्या पगतीचे तीन वर्ग असत. ज्याना बसायला चादीच्या फुल्याचे पाट व चादीच्या ताटवाट्या ठेवण्याकरिताहि चादीच्या फुल्याचे चौरग असत, तो फर्स्ट क्लास. बाकीचे सटरफटर सेकड व थर्ड क्लासात आपआपल्या इतमामाप्रमाण पितळी ताटातून नाही तर केळीच्या पानातून जेवायला बसत. फर्स्टक्लासात आज तीनच उतारू होते. स्वतः बाबासाहेब, बाळासाहेब व डॉक्टर. आम्हा गावकऱ्याच्या दृष्टीने डॉक्टराचा हा मोठाच सन्मान होता. पण सध्या बाळासाहेबावर डॉक्टरांनी आपल्या बालमानसशास्त्रातील पारगततेमुळे जी छाप पाडली होती व बाळासाहेबाचीहि त्याच्यावर जी मर्जी बसली होती, त्याचा विचार केला तर ह्यात नवल वाटण्यासारखे काहीच नव्हते.

बाळासाहेबाचा स्वभाव किती हट्टी होता, ह्याची ज्याना कल्पना असेल, त्याना डॉक्टरापुढे बाळासाहेबाची गरीब गोगलगाय झालेली पाहून कौतुक आणि आश्चर्य वाटे. डॉक्टरानी काहीहि सागावे, आणि दुसऱ्या कुणाचेहि काही न ऐकणाऱ्या बाळासाहेबानी ते निमूट करावे, हा प्रकार

सर्कशीतील रिंगमास्टरनें एखाद्या वन्यपशूकडून कसरतीचीं कामे करून घेण्याइतका प्रेक्षणीय होता. सुदैवाने जेवता जेवताच ही 'सर्कस' पाहण्याची संधी आम्हाला लाभली.

बाळासाहेब वरून जरी गुटगुटीत दिसत असले, तरी एका श्रीमंती रोगानें त्यांच्या त्या राजबिंड्या शरीरात ठाण मांडले होते. त्याना वरचेवर अजीर्णाचा त्रास होई. सध्याहि त्यांची प्रकृति ठीक नव्हती. बाबासाहेब व आईसाहेब बासुंदी जपून खाण्याबद्दल त्याना सारखी विनवीत होती. पण त्यांच्या प्रत्येक विनवणीला बासुंदीची एकएक वाटी रिकामी करूनच सक्रिय उत्तर देण्याचा बाळासाहेबानी सपाटा लावला होता. बासुंदी ज्या वेगाने त्यांच्या पोटात गडप होत होती, त्याकडे पाहून रावणासारखी बाळासाहेबाना दहा तोंडे तर नाहीत ना? अशी शंका येई. त्यांच्या जन्मदात्यानी हात टेकलेले पाहून अखेरीस डॉक्टर म्हणाले "पुरे झाली बासुंदी आता बाळासाहेब."

आणि काय चमत्कार? त्यानंतर बाळासाहेबानी बासुंदीकडे ढुंकूनहि पाहिले नाही. तोंडात पकडलेल्या उंदराला खाऊ नको म्हणून एखाद्या बोक्याला सांगावे आणि त्याने निमूटपणे तो उंदीर सोडून द्यावा, तसे सर्वांना तो प्रकार पाहून आश्चर्य वाटले, आणि डॉक्टरांच्या बालमानसशास्त्रातील नैपुण्याची सर्वांस अधिकच खात्री पटली.

इनामदाराच्या घरी डॉक्टरांचा इतका भाव ज्या प्रसंगामुळे वाढला, तो प्रसंग साधारण आठएक दिवसापूर्वी घडून आला होता. बाळासाहेबांच्या हट्टी स्वभावामुळे ओढवलेला समरप्रसंग डॉक्टर वामनरावानी मोठ्या गोडीगुलाबीने सोडवला होता. त्या समरप्रसंगाची निरगाठ जर डॉक्टरानी सोडवली नसती तर इनामदार व जहागीरदार ह्या पिढीजाद वैर असलेल्या दोन घराण्यात त्या दिवशीं खात्रीने रक्तपाताची वेळ आली असती!

रावणाने सीताहरण केल्यामुळे रामायणातील समरप्रसंग उद्भवला. आमच्या गोष्टींतील समरप्रसंग निर्माण करणारा रावण म्हणजे दुसरे तिसरे कोणी नसून, गोरेंगोमटे बाळसेदार शरीर, डोक्याला जरीची गोल टोपी,

कानात टपोऱ्या मोत्याची भिकबाळी, तलम लाब सदरा, त्यावर जरीच्या वेलबुट्टीचे जाकीट, खाली सुरवार, असे मघा खादाडपणावरून गमतीनें रावणाची उपमा दिलेले राजबिडे बाळासाहेबच खुद्द होते. एवढ्या लहान वयात एखादी सीता पळवणे त्याना शक्य नव्हते, पण सीतेची ती उणीव दादासाहेब जहागीरदाराच्या देव्हाऱ्यातील लगड्या बाळकृष्णाने भरून काढली होती. वाल्मीकीच्या रामायणात व आमच्या गोष्टीत हे असले क्षुल्लक फरक असले, तरी समरप्रसगाची तीव्रता मात्र सारखीच होती.

बाळासाहेबानी एखादी वस्तु आपल्या हातात धरली की आम्हा गावकऱ्याच्या दृष्टीनें त्या कृतीला एकच अर्थ असणे शक्य होते. तो म्हणजे, त्या क्षणापासून त्या वस्तूवर बाळासाहेबाचा मालकी हक्क प्रस्थापित झाला, हा होय. त्याच्या ह्या स्वभाववैशिष्ट्यामुळे पुष्कळदा विचित्र प्रसग उद्भवत.

एकदा बाळासाहेबानी बाबासाहेबाजवळ टोपीकरता हट्ट धरला. लागलीच गाडीघोडा जुपून बाबासाहेब त्याना एका टोप्याच्या दुकानात घेऊन गेले. दुकानातील भारीत भारी जरीच्या टोप्या त्यानी बाळासाहेबाना दाखविल्या. पण त्यातली एकहि टोपी बाळासाहेबाच्या पसतीस उतरेना. ते तर त्या टोप्याकडे ढुकूनहि पहायला तयार होईनात. दुकानात पाऊल टाकताक्षणीच एका टोपीवर त्याचे मन बसले होते व आपणाला तीच टोपी पाहिजे, असा त्यानी हट्ट धरला होता. ती टोपी होती दुकानाच्या मुसलमान मालकाची !—लाल रगाची नी गोंडेदार. बाबासाहेबानी ह्या वेड्या हट्टापासून बाळासाहेबाचे मन वळविण्याचा खूप प्रयत्न केला पण अखेरीस ती घामटलेली, मळकट टोपीच—व दुकानदाराचा रोष—त्याना भरपूर किमतीस विकत घ्यावी लागली. ती गोंड्याची लाल तुर्की टोपी घालून गाडीतून निघालेली बाळासाहेबाची मिरवणूक बघायला सारा गाव लोटला.

एवगुणविशिष्ट बाळासाहेबाना बरोबर घेऊन आईसाहेब त्या दिवशीं जहागीरदारीणबाईकडे हळदीकुकवाकरता गेल्या होत्या. दोन्ही घराण्यात अनेक पिढ्याचे वैर असले, आणि दुसऱ्याचे निःसतान होवो अशी जरी एकमेकाची मनातून इच्छा असली, तरी हळदीकुकवासारख्या सौभाग्यवर्धक समारभाना किवा दुसऱ्या कुठल्याहि कार्याला एकमेकामध्यें आमत्रणे

जात. ह्यात आमंत्रण पाठविणाऱ्याचा व आमंत्रण स्वीकारणाऱ्याचा दोघा-चाहि हेतु एकच असे. तो म्हणजे आपल्या श्रीमंतीचा दिमाख दुसऱ्याला दाखविणे. त्याप्रमाणे आजहि मंगळागौरीप्रमाणे सजून बसलेल्या जहागीर-दारीणबाईकडे मणभर दागिन्याच्या भाराने वाकलेल्या इनामदारीणबाई गेल्या जहागीरदारीणबाईकडे केव्हाहि जायचे झाले तरी त्या बाळासाहेबांना बरोबर घेतल्याशिवाय जात नसत. कारण दागदागिन्याच्या बाबतीत दोघींपैकी वरचढ कोण हे ठरविणे अतिशय अवघड असले तरी इनामदारीणबाईकडे बाळासाहे-बाच्या रूपातला हा एक दागिना असा होता की जो जहागीरदारीणबाईकडे खूप नवससायास करूनहि नव्हता ह्या एका बाबतीत इनामदारीणबाई जहागीर-दारीणबाईपेक्षा निःसंशय वरचढ होत्या, व म्हणूनच आईसाहेब आपल्या त्या मौल्यवान् रत्नाचे जहागिरदारीणबाईसमोर प्रदर्शन करण्याची एकहि संधी कधी वाया घालवीत नसत. अर्थातच ह्या दागिन्यावर जहागीरदाराच्या बाजूचे सारे दातओठ खाऊन असत, हे निराळे सांगण्याची जरूरी नाही.

इकडे हळदीकुंकू चालू असताना आईसाहेब इनामदार व ताईसाहेब जहागीरदार एकमेकींच्या दागिन्यांचे निरीक्षण करून घेत शाब्दिक टोलवा-टोलवी करण्यात गुंतल्या असता बाळासाहेब जे सटकले, ते जहागीरदाराच्या देवघरातच घुसले. थोडा वेळ कंबरेवर हात ठेवून त्यांनी देव्हाऱ्यातील निरनिराळ्या देवांचे निरीक्षण केले. ती त्यांची लालसी दृष्टि पाहून बिचाऱ्या देवांची काय गाळण उडाली असेल, देवच जाणे! अशा संकटकाली श्रीविष्णूचा धावा करण्याची पुराणांतरी प्रथा आहे. पण इथे तर श्रीविष्णूच आपल्या इतर दोनचार अवतारांसकट संकटात सापडले होते. मग त्यांची कोण सुटका करणार! निरनिराळ्या देवांची सरसनिरसता मनातल्या मनात ठरवून अखेरीस बाळासाहेबांनी लंगड्या बाळकृष्णावरच झडप घातली. द्रौपदी वस्त्रहरणाच्या वेळीं पट-वर्धनाची अफाट किमया करणारा, व आपल्या भक्तांच्या संकटकाली केव्हाहि धावून जाणारा असा तो सर्व-शक्तिमान् कृष्ण, पण बाळासाहेबांसमोर त्याचे काही चालले नाही. ज्याच्या मुखात सारे विश्व सामावलें आहे, त्याला आपल्या इवल्याशा हातात धरून दुडुदुडू धावत बाळासाहेब आईसाहेबांकडे गेले.

" आईसाहेब, आईसाहेब ! हे पहा मला काय सापडल ! " आपल्या हातातील लगडा बाळकृष्ण आईसाहेबाना दाखवून ते म्हणाले.

" अगबाई ! बाळकृष्ण आणला ! " आश्चर्याने आईसाहेब उद्गारल्या.

" छान आहे, नाही ? " बाळासाहेबानी लडिवाळपणाने विचारले.

ताईसाहेबानी बाळासाहेबाच्या हातात आपल्या देवाची मूर्ति पाहिली आणि त्याच्या मनातला बॉयलर पेट घेऊ लागला त्याच्याकडे डोळ्याच्या कोपऱ्यातून पाहून घेऊन आईसाहेबानी ते चटकन् ओळखले, आणि त्या आपल्या गुणी कुलदीपकाला म्हणाल्या, " हे काय बर, बाळासाहेब ? देव का असा खेळायला घ्यायचा असतो ? "

" मी घेणार ! "

" अस नाही करू ! ठेवून द्या बघू देव होता तिथ ! "

" मी नाही ठेवणार ! "

" काय बाई कराव तरी आता ? " बाळासाहेबावर आपली काही मात्रा चालत नाही असे पाहून हसून आईसाहेब म्हणाल्या, " घरी दिखील असच करायच ! कशाची ती मुळी भीति नाहीच ! फारच शूर होणार हो आमचे बाळा-साहेब ! त्याना एक तलवार आणून देण झालय्, तर ती म्यानातून उपसून काय म्हणतात बाळासाहेब,–' मी शिवाजी होणार. हिन्दुस्थानला स्वराज्य मिळवून देणार !'–कस समजत बाई इतक सगळ येवढ्या लहान वयात, देव जाणे ! "

मुख्य मुद्दा बाजूला सारण्याकरता आईसाहेबानी जरी बाळासाहेबाचे कौतुक सुरू केले असले, तरी त्याला ताईसाहेब फसल्या नाहीत. उलट बाळा-साहेबाची स्तुति ऐकून त्याच्या बॉयलरमधील आग अधिक भडकली मात्र. ताईसाहेब एकदम कडाडल्या, " काय कौतिक करता उगाच त्याच. भारीच बाई लाडावून ठेवलाय् त्याला ! पोराचे इतके लाड करण बर नाही बर इनामदारीणबाईऽ ! "

" केले लाड तर काय झाल ! मुलगा आहे म्हणून करते लाड ! " आईसाहेबानी एटीएट मिलीमिटर डागली, ती बरोबर ताईसाहेबाच्या तट-बदीच्या कच्च्या भागावर बसली.

" बाळासाहेब, तो देव आणा इकड ! " ताईसाहेब ओरडल्या.

" मी नाहीं देणार ! " आईसाहेबाच्या पाठीशी लपत बाळासाहेब म्हणाले.

" आहाऽरे भित्री भागूबाई ! आणि म्हणे शिवाजी होणार !–स्वराज्य मिळवणार !–आण इकड तो देव पाहू ! " ताईसाहेबानी एक पाऊल पुढे टाकलें.

" हा खबरदार, माझ्या सोनुल्याला कुणी काही आडवतिडव बोलल, नाहीतर त्याच्याशीं दाडगाई केली तर ! " बाळासाहेबाना पाठीशी घालून आईसाहेब म्हणाल्या, " पहात्येंय् मी. माझा सोन्यासारखा छकुला खुपतोय् डोळ्यात साऱ्याच्या ! घेतला देव थोडा वेळ खेळायला पोरान तर काय झाल ! काही खाऊन तर नाहीना टाकत ! आम्ही त्याना तळहातावरच्या फोडा-प्रमाण जपतो, ते काहीं इतरानी त्याना वाटेल तस बोलाव म्हणून नाही ! "

गारगोटीच्या सान्निध्यात पोलादी पट्टी आली की बारीकसारीक चकमकी उडालेल्या हळदीकुकवाला आलेल्या स्त्रियानी पुष्कळदा पाहिल्या होत्या. पण आज हा असा अकस्मात् भडका उडालेला पाहून त्या घाबरून गेल्या. त्यातच भर म्हणूनच की काय, लगड्या बाळकृष्णाचा गजेंद्रमोक्ष करण्याच्या पवित्र हेतूने खुद्द दादासाहेब जहागीरदारच तिथे उपस्थित झाले. देवाचा धावा त्याना कसा ऐकू गेला, कोण जाणे ! त्याना पाहताच साऱ्या बायका उठून, पदर सावरून, आडोशाला उभ्या राहिल्या. सर्वांची छाती धडधडू लागली. दादासाहेब उंच धिप्पाड होते. त्याच्या मिशा जितक्या पिजारलेल्या उग्र होत्या, तितकाच त्याचा सतापहि उग्र होता. सतापाच्या भरात ते काय करतील नी काय नाहीं, ह्याचा नेम नसे. बाळासाहेबाचा जन्म होण्यापूर्वी गावातील सर्वात हट्टी माणूस अशी त्याची कीर्ति होती. असे दोन अतिरथी महारथी समरभूमीवर जमल्यावर समरभूमीचा थरकाप उडाल्यास त्यात नवल नव्हते.

दादासाहेब जे आले ते सरळ बाळासाहेबाकडे जात म्हणाले, " काय रे कारट्या ! देतोस कीं नाहीं तो देव ? जहागीरदाराच्या घरचा देव म्हणजे काय खेळ वाटला काय तुला ? "

पण बाळासाहेब कसले त्याच्या हाती लागतात ! पुढेमागे ते शिवाजी होतील की नाही देव जाणे, पण गनिमी काव्याने लढण्याचा शिवाजी महाराजाचा एक गुण तरी त्याच्या अगी प्रकर्षाने वसत होता खास. ते आईसाहेबाच्या पदराआड लपले, आणि त्यानी त्याच्या आश्रयाने दादासाहेबावर मारा केला, " अहा रे भागूबाई ! लहान मुलावर हात टाकते ! "

सारी सभा क्षणमात्र चित्रासारखी तटस्थ झाली. दादासाहेबानी आपणास उद्देशून उच्चारले गेलेले हे असले शब्द साठ वर्षाच्या आख्ख्या उमरीत आज प्रथमच ऐकले होते. त्याच्या कपाळावरच्या शिरा थाडथाड उडू लागल्या. त्याचे शरीर कापू लागले. त्यानी हाताच्या मुठी वळीत एकएक पाऊल पुढे टाकायला सुरवात केली.

" खबरदार कुणी माझ्या बाळासाहेबाच्या अगाला हात लावला तर ! " आपल्या छाव्याच्या सरक्षणार्थ चवताळून सिद्ध झालेल्या वाघिणीचे बळ अगात सचारून आईसाहेब ओरडल्या.

" मग तो देव देऊन टाका ! "—दादासाहेब.

" मी नाही देणार ! " इनामदाराच्या बेचाळीस पिढ्याचा हट्टीपणा बाळासाहेबाच्या मुखाने उद्गारला.

" अस काय बर बाळासाहेब ? " आईसाहेब त्याना विनवू लागल्या, " मी तुम्हाला दुसरा देव देईन छान छान ! सोन्याचा अ ? देऊन टाका हा देव—शी ! घाणेरडा आहे तो ! "

" आमच्या देवाची निदा केलेली खपायची नाहीं आम्हाला ! " दादासाहेब गरजले.

इतक्यात आईसाहेबानाहि सातआठ असामीची कुमक घेऊन बाबासाहेब जातीनिशी हजर झाले. प्रथम बाबासाहेबाकडून बाळकृष्ण गोडीगुलाबीनें काढून घेण्याचा त्यानी प्रयत्न करून पाहिला. इतरानीहि बाळकृष्णाची सुटका करण्याकरता जगजग पछाडले. पण बाळासाहेब काहीं दत्तक नव्हते. ते अस्सल इनामदाराच्या वशाचे होते. त्यानी कुणालाच दाद दिली नाही.

" घरीं गेल्यावर देईन पाठवून मी तुमचा बाळकृष्ण. असे देणार

नाहींत ते." तडजोडीचा शेवटचा प्रयत्न करण्याच्या उद्देशाने बाबासाहेब म्हणाले.

"माझा देव मी घराच्या बाहेर जाऊ देणार नाहीं!" दादासाहेब म्हणाले, "येवढ शेंबड पोरट, पण त्याची कोण मिजास! माझा पोरगा असता तर दिली असती ठेवून एक श्रीमुखात"

"मग असा गुणी पोरगा तुम्हाला झाला नाही, हे भाग्यच म्हणायच त्याच!" आईसाहेबानी दादासाहेबाच्या बगलेवर अनपेक्षित हल्ला चढवला.

"दादासाहेब," बाबासाहेब म्हणाले, "लहान मूल हे फूल आहे. ते अत्यंत हळुवार हातानीच हाताळल पाहिजे. आधुनिक मानसशास्त्राप्रमाण मुलाना धाकदपटशा तर कधीच दाखवू नये! ह्याच तत्त्वानुसार बाळासाहेबाच्या जन्मापासून आम्ही त्याना अजून कसलीच भीति घातलेली नाही. ते सार तुम्ही आपल्या हट्टी स्वभावान फुकट घालविणार काय?"

"तुमच्या पोराचे लाड तुमच्या घरी!" दादासाहेब चिडून म्हणाले. "आम्ही काय पोर पाहिली नाहीत?" असा प्रश्न त्याना ह्यापुढ विचारायचा होता. पण त्यावर इनामदारीणबाई मघाप्रमाणेच बगलेवर हल्ला चढवतील अशी भीति वाटून, त्यानी तो प्रश्न आपल्या झुलपी मिशाच्या कुपणाबाहेर पडू दिला नाही. ते म्हणाले, "जहागीरदाराच्या देव्हाऱ्यातील कुलदैवताचा एखाद्या लाडावलेल्या शेबड्या पोराने खेळ माडलेला आम्हाला खपायचा नाहीं. मी तुम्हाला पधरा मिनिटाची मुदत देतो. तेवढ्या अवकाशात बाळकृष्ण आपल्या जागी विराजमान झाला तर ठीक. नाही तर. . ."

येवढे बोलून आपल्या पाठीशीं उभ्या असलेल्या सातआठ गड्यावरून त्यानी नजर फिरविली, व आपल्या मिशाच्या शेपट्या पिरगळल्या.

इनामदारानीहि त्याचा मिशाच्या भाषेत उत्तर देऊन त्या आव्हानाचा स्वीकार केला. त्याच्या गड्याचे बाहूहि फुरफुरू लागले. आता लगड्या बाळकृष्णाला पोलिश कॉरिडरचे महत्त्व प्राप्त झालें. हळदीकुकवाच्या दिवाणखान्याला रणागणाचें स्वरूप आलें. जी जमीन कुंकू साडून लाल व्हायची ती रक्तानें लाल व्हायची वेळ आली. अक्षय्य सौभाग्य लाभावे म्हणून केलेल्या

समारभात काही सौभाग्यवतीची बागडी फुटण्याचा प्रसग आला. समरागण कापू लागले !

प्रसग मोठा बाका आलेला पाहून इनामदाराचे कारभारी त्याच्या कानात कुजबुजले, “ मी डॉक्टर वामनरावाना आणतो. ते बालमानसशास्त्र उत्तम जाणतात. ते गोडीगुलाबीने बाळकृष्ण बाळासाहेबाच्या हातून काढून घेतील. ”

“ तुम्हाला पाहिजे तर आणा. पण बाळासाहेबाना काही धाकदपटशा दाखवलेला मला नाही चालणार ! ” बाबासाहेब निश्चयाने म्हणाले, “ त्यापेक्षा टाळकी फुटली तरी चालतील ! ”

सधीची मुदत सपण्याला पाचच मिनिटे राहिली होती. दिवाणखान्यातील वातावरण प्रक्षुब्धतेच्या परमोच्च बिदूशी जाऊन भिडले होते. अशा वेळी डॉ. वामनरावानी समरभूमीवर पाय ठेवला. सारी परिस्थिति त्याना थोडक्यात समजावून देण्यात आली. त्यानी क्षणभर विचार केला आणि ते म्हणाले, “ हात्तिच्या ! त्यात हो काय येवढ ! बाळासाहेबाशी फक्त एक मिनिट मला एकीकडे बोलू द्या, म्हणजे झाल ! ”

“ पण बाळासाहेबाना धाक मात्र घालायचा नाहीं ” बाबासाहेब म्हणाले.

“ छे छे ! ” डॉक्टर म्हणाले, “ मुलाना धाक घातला, तर मग बालमानसशास्त्र ते काय राहिल ? तुम्ही मुळीच काळजी करू नका. अगदीं बालमानसशास्त्राबरहुकूम करतो सार काही ! ”

डॉक्टरानी बाळासाहेबाना हातान धरून गोड गोड गोष्टी करीत एका बाजूला नेले. मग त्यानी आपले तोड त्याच्या कानाशी नेले, आणि हसत हसत काहीतरी ‘ जमत ’ त्यानी बाळासाहेबाच्या कानात सोडून दिली. आणि काय आश्चर्य ! आतापर्यंत इतर कोणाचेही न ऐकणारे बाळासाहेब दुडुदुडु धावत देव्हाऱ्याशी गेले आणि त्यानी बाळकृष्णाची त्याच्या पूर्वीच्या जागी स्थापना केली.

एक मोठाच समरप्रसग सामोपचाराने मिटला म्हणून सर्वानी एक-

समयावच्छेदेंकरून एक समाधानाचा सुस्कारा सोडला. सुरूच्या बनातून एखादी वाऱ्याची झुळूक खेळावी, तसा त्याचा आवाज झाला.

डॉ. वामनरावाची सर्वानी पाठ थोपटली. इनामदार तर त्याच्या बालमानसशास्त्रातील नैपुण्यावर बेहद्द खूष झाले. त्याक्षणीच त्यानी बाळासाहेबाचे खास डॉक्टर अशी त्याची नेमणूक जाहीर करून टाकली.

सर्वाना जाणण्याची इच्छा असली तरी डॉक्टरानी बाळासाहेबाच्या कानात असा काय मत्र टाकला, हे मात्र कुणालाच कळून आलें नाही. डॉक्टराना बाळासाहेबाची अशी कुठली कळ सापडली असावी की जी दाबताच बाळासाहेबाच्या सद्वर्तणुकीचे यत्र एकदम चालू व्हावे, ह्याचे साऱ्याना कुतूहल वाटत होते. डॉक्टराना ह्याविषयी विचारले तर ते नुसते हसत. 'डॉक्टरमामानी काय जम्मत सागितली हो तुम्हाला ?' म्हणून बाळासाहेबाना विचारले, तर ते नुसते लाजत. डॉक्टरानी काय युक्ति केली, ते अजूनहि एक गौप्यच होते. पण येवढे मात्र खरे, की बालमानसशास्त्रात डॉ. वामनराव चागलेच तरबेज आहेत, अशी त्याची कीर्ति सगळीकडे पसरली.

हें गौडबगाल जाणून घेण्याची मलाहि अनिवार उत्सुकता लागून राहिली होती. जेवण आटोपून घरी जाताना मी डॉक्टराबरोबरच निघालो. बाळासाहेबाचे मन काबीज करण्यासारखी डॉक्टरानी त्या दिवशी त्याच्या कानात काय गोड वाक्यें उच्चारली असतील, ह्याचेच विचार माझ्या मनात सारखे घोळत होते. अखेरीस, न राहवून मी विचारलेंच, "काय हो डॉक्टर, त्या दिवशीं बाळासाहेबाच्या कानात हसत हसत काय सागितल हो तुम्हीं ?"

"काहीं विशेष नाही."

"विशेष नाहीं कस ? त्या वाक्यामुळच तर बाळासाहेब तुमच्यावर निहायत फिदा दिसताहेत !"

ह्यावर डॉक्टर नुसते हसले.

"सागायच नाहीं का तुम्हाला ?" मीं विचारल.

" सांगेन. " थोडा विचार करून डॉक्टर म्हणाले, " पण आमची ही बालमानसशास्त्रातली युक्ति घटकर्णी मात्र होता उपयोगी नाही ! "

" कबूल ! "

" माझ्या हातातला बाळासाहेबांचा हात चांगला दुखेपर्यंत घट्ट दाबून, त्याच्या कानात मीं हसत हसत म्हटलं,—तें हसणं तुम्हां बघ्याकरता होतं, बाबासाहेबांना तें दिसत नव्हतं—' कायरे पोरट्या, बस करतो की नाही आतां हा फाजीलपणा ? कां देऊं ठेवून दोन मुस्कटांत ? ' "

# माझी दाढी

दाढी आणि देशभक्ति ह्याच जितक साहचर्य दिसून येत, तितकच दाढी आणि तुरुग ह्याचहि दिसून येत. निदान माझा अनुभव तरी तसा आहे.

एके दिवशी सकाळीं मी दाढी करायला बसलों असता हनुवटीच्या खालच्या भागावर वस्तरा आला आणि तो जरा अडखळल्यासारखा झाला. त्या भागाची मी आरशात तपासणी केली तो तिथ एका अनामत्रित पाहुणीन बस्तान माडल असल्याच मला दिसून आल.

ती एक बारीकशी पुळी होती. ‘ जाईल चार दिवस पाहुणचार भोगून ! ’ अस मनाशींच म्हणून मीं तेव्हा तिच्याकडे दुर्लक्ष केल. आठ दिवस गेले, पधरा दिवस गेले, पण त्या अनाहूत पाहुणीन आपला मुक्काम हालविण्याच काहींच चिन्ह दिसेना. येवढच नव्हे, तर माझ्या हनुवटीवरील हवा तिला चागलीच मानवत असलेली दिसली. ती पुळी ह्या वेळपावेतों लालबुद होऊन चागलीच पुष्ट झाली होती. एखाद्या गर्भवतीप्रमाण ती फुगली होती, आणि तिच्या अगावर एक विशिष्ट कला मारत होती.

हनुवटीवरील तिच्या अस्तित्वामुळ मला नीटशी दाढीहि करता येईना. तिच्या आसपासची थोडी जागा ‘ नागर ’ न फिरवता मला तशीच सोडून द्यावी लागे. त्यामुळ तेवढाच खुट असलेला भाग वाळवटातील हिरवळी-प्रमाण दिसे आणि तिथले लाब लाब वाढलेले खुट सूक्ष्म स्वरूपातील नारळीच्या झाडाप्रमाण दिसत. मग मात्र मी त्या पाहुणाबाईंना ‘ आता तुम्ही गेलात तर बर ! ’ म्हणून नाना तऱ्हानी सूचना देऊ लागलो. पण अशा

सूचनाना दाद दिली तर ती पाहुणी कसली ? माझ्या हनुवटीवरून हालण्याचा तिचा मुळींच उद्देश दिसेना. उलट तिन ऐसपैस हातपाय पसरायला सुरवात केली. एवढ्यावरच थाबत तरी ठीक. मघा ती गर्भवती असल्याप्रमाण दिसत होती, अस म्हटल होत. आता तर तिन खरोखरीच व्यायला सुरवात केली होती, आणि तेहि इतक्या वेगान कीं माझ्या हनुवटीच तिनं अगदी बाळत-पणाच हॉस्पिटलच करून टाकल आणि तिच्या पिलानी माझ्या गालावर देखील आक्रमण करायला सुरवात केली.

मला वाटतं, त्या वेळच्या माझ्या हनुवटीसारखी खराब दिसणारी चीज ह्या जगात दुसरी क्वचितच मिळाली असती. स्वतःचे सारे उपाय करून थकल्यावर आता प्रकरण आपल्या आटोक्याबाहेर गेलं आहे असा विचार करून, अखेरीस एक दिवस त्या पुळयाच माझ्या चेहऱ्यावरून उच्चाटन करण्याकरता एका त्वचारोगचिकित्सकाची मीं कुमक मागवली.

“ तुम्ही गालाना वस्तरा लावून नाहीं उपयोगाच. तुम्हाला दाढी वाढवली पाहिजे ! ” त्वचारोगचिकित्सक म्हणाले.

“ दाढी वाढवली पाहिजे ? ” मी जरा भीतीच्या स्वरात उद्गारलों.

“ हो, थोडे दिवस. ” त्वचाचिकित्सक आपण काय करायला सागतों आहोत ह्याची बिलकुल कल्पना नसल्याप्रमाण अगदी सहज म्हणाले, “आणि मी ही पॉवडर देतो ती टाकीत जा रोज. ”

मी गेलो होतो कशासाठी आणि झाल काय ? एका पाहुणीची हकाल-पट्टी करायला गेलो तर दुसऱ्या एका पाहुणीला आमत्रण देण्याची वेळ आली ! आणि ती पाहुणीसुद्धा अशी, की प्रथमपासूनच माझ तिच्यविषयीं वाईट मत होतं.

दाढीविषयीं माझ मत त्या वेळी वाईट का असाव ह्याच सयुक्तिक कारण मला देता आल नसत. आता मी त्यावर विचार करून पाहिला तर त्या वेळच्या माझ्या दाढीविषयीच्या कल्पनाबद्दल माझ मलाच हसू येत. खरच, माणसाच्या कित्येक कल्पना किती अकारण दूषित असतात ! त्या वेळीं मी दाढीला ‘ जगल ’ काय म्हणत असे, दाढी हें असस्कृतपणाच लक्षण काय

मानीत असे, दाढीवाल्याना ' बोकड ' अस काय संबोधीत असे, दाढी ठेवणारे एक तर बावळट असतात नाहीतर अट्टल गुन्हेगार असतात अशी माझी समजूत काय होती ! साऱ्याच चुकीच्या कल्पना ! मी लहानपणीं वाचलेल्या ऐतिहासिक कादंबऱ्यातील बहुतेक खलपुरुष दाढीवाले होते किंवा देशी सिनेमातील खलपुरुषानीहि दाढ्या राखल्या होत्या हे कदाचित् दाढीविषयी माझ मत कलुषित होण्याच कारण असेल.

त्वचारोगचिकित्सकाच्या आदेशानुसार त्या वेळीं मला दुःखदायक वाटणाऱ्या दाढी वाढविण्याच्या कार्याला मी सुरवात केली. गालावर आणि हनुवटीवर वाढत असलेले ते खुरटे खुट आरशात पाहिले की मला कससच होई. आणि केसाची तरी गमत अशी, की पूर्वी रोज दाढी करीत असताना जीव नकोसा करण्याइतक्या वेगानं वाढणारे केस आता अगदी सावकाशपणान वाढत होते. धड पूर्ण वाढलेली दाढीहि नाही आणि धड गुळगुळीत चेहराहि नाही. अशा ' न हिन्दुर्नयवन ' स्थितीत मी जवळजवळ महिना दीड महिना काढला. असला चेहरा घेऊन बाहेर जाण्याची मला लाज वाटे. कधी बाहेर गेलोच आणि कोणी ओळखीचा इसम भेटला, तर तो एकदम गभीर होई आणि सहानुभूतिपूर्ण स्वरात मी कुणाच सुतक पाळतो आहे ह्याची पृच्छा करी. बर, पुढमाग केस असेच वाढवीत राहिलो तरी त्याची एखादी चागल्या आकाराची दाढी तरी होईल की नाही अशी शका मनाला व्यग्र करी. कारण सूर्यापासून निघून दशदिशाना फाकणाऱ्या किरणाप्रमाण माझ्या चेहऱ्यावरील प्रत्येक केस स्वतत्र दिशेन सरळ वाढत होता. मला सारखी भीति वाटे, आपला चेहरा आणखी महिन्याभरात एखाद्या साळूसारखा तर नाहीं ना दिसणार ?

दुःखात सुख येवढच, की माझ्या चेहऱ्यावरील त्वचारोग आता हळूहळू माघार घेऊ लागला होता. टोपीवरील खकाणा झटकण्याकरता ब्रश शोधीत बसण्याची यातायात करायची आता जरूर राहिली नव्हती. जिथ तोंड पोचू शकेल, अशा चेहऱ्याच्या कुठल्याहि भागावर कड सुटली, तर तिच शमनहि मोठच सुखकारक होई.

त्वचारोग बरा व्हायला आणखी साधारण महिनाभर लागला. तोंपर्यंत

चेहऱ्यावरील पीक बरच फोफावल होत. आणि समाधानाची गोष्ट म्हणजे हनुवटीच्या खालच्या भागाच्या मध्यभागी उगवलेल्या एका केसाच पुढारीपण सर्वांनी मान्य करून त्यान दाखवलेल्या ' अधोगती ' च्या दिशेनच सर्वांनी एकदिलान जायला सुरवात केली होती. त्याचा सकलित परिणाम माझ्या चेहऱ्यावर एक छोटीशी गोजिरवाणी दाढी तयार होण्यात झाला होता.

त्वचारोग बरा झाल्यावर आता खर पाहता दाढीची हकालपट्टी करायला काहींच हरकत नव्हती. पण काय असेल ते असो, तस करण्याला मन घेईना. जिन मला एका त्रासदायक रोगातून मुक्त केल होत, तिच्याशी ' कामापुरता मामा ' ह्या तऱ्हेची निर्दय वर्तणूक करण मला योग्य वाटेना. शिवाय आरसा समोर घेऊन बसल की त्याचाहि निकाल दाढीच्या बाजूनच पडे. दाढी माझ्या चेहऱ्याला शोभत होती. तिच्यामुळ चेहऱ्याला एक प्रकारचा रुबाब आला होता. चेहरा तुळतुळीत करण्याच्या ह्या युगात तिच्यामुळ मला एक निराळच वैशिष्ट्य प्राप्त झाल होत. रस्त्यान जाताना आता माझ्याकडे पाहून कोणी कुचेष्टेन हसत नव्हते. लोकांच्या डोळ्यात माझ्याविषयींची आदराची भावनाच मला दिसून येई. माझ्या चेहऱ्यावर गांभीर्याची सावली तिन पाडली होती. मी अत्यन विचारशील गृहस्थ असावा अशी माझी छाप ती जनसमुदायावर पाडी. ट्राममध्यें लोक उठून मला जागा देऊ लागले. कुठल्याहि सार्वजनिक समारंभाला मी गेलो कीं मला पुढल्या खुर्चीवर जागा मिळू लागली. केव्हा केव्हा तर व्यासपीठाला माझ्या दाढीमुळ वैचित्र्य आणि भारदस्तपणा यावा म्हणूनच केवळ मला मोठ्या सन्मानान अध्यक्षाच्या शेजारी जागा मिळू लागली. माझ्या नावाचा उल्लेख ' विद्वान्, ' ' व्यासंगी ' वगैरे विशेषण लावल्याखेरीज होईचनासा झाला ! हा सारा माझ्या दाढीचा प्रभाव आहे, हें मीं ओळखल. अशी काय बर जादू असावी दाढीत ?

एकांतात बसल्याबसल्या दाढी कुरवाळीत मी ह्या प्रश्नावर गमतीखातर विचार करी. खरच, दाढी कुरवाळण्यात काय मजा असते ! तिला हलकेच थोपटण्यात काय सुख असत ! दाढीवरून हलकेंच हात फिरवीत

एखाद्या विषयावर विचार करण्यात किती आनद असतो ! विषय कितीहि रुक्ष असला तरी मनाची एकाग्रता होते आणि एरवी क्लिष्ट वाटणारे प्रश्न सटासट सुटतात. माझ्या कितीतरी गोष्टीच्या सुदर कल्पना मला दाढीवरून हात फिरवतानाच सुचलेल्या आहेत. गोष्ट लिहिता लिहिता एखाद्या ठिकाणी ' एजिन फेल ' झाल तर ते पुन्हा सुरू करण्याचा अगदी सोपा उपाय आता मला सापडला होता. दोन मिनिट खुर्चीत माग रेलून बसायच व दाढीला हलकेच एक दोन हिसके द्यायचे. अस केल म्हणजे जणू काय पेट्रोल पाइपमधला कचरा निघून जाई आणि मग एजिन वेगान चालू लागे. खरोखर, हा मर्त्य मानव स्वर्गातील निर्लोभ देवापेक्षाहि कुठल्या एका सुखाच्या बाबतींत वरचढ असेल तर ते ह्या दाढी कुरवाळण्याच्या बाबतीतच.

दाढीविषयीं लोकात आदर का वसत असावा, ह्यावर मी विचार केला नी त्याच उत्तरहि मला चटकन् सापडल. हो, दाढी असताना असा कुठला अगम्य प्रश्न ह्या भूतलावर होता ? दाढी हे वैराग्याच लक्षण आहे. भारतवर्षातले वशिष्ठ, वाल्मीकि, व्यास, विश्वामित्र वगैरे जे मोठमोठे तपोधन होऊन गेले, त्या सर्वात जर कुठल्या एका बाबतीत साम्य असेल तर ते फक्त दाढी वाढविण्याच्या बाबतीतच. छत्रपति शिवाजी महाराजानाहि दाढी होती आणि त्या दाढीनच खर पाहिल असता शिवाजी महाराजाच्या चेहऱ्याला वैशिष्टय प्राप्त करून दिल. इतक, की दाढी हेंच शिवाजी महाराजाच्या चेहऱ्याच ' बोधचिन्ह ' ठरल. नाटकात शिवाजी महाराजाची भूमिका वठवण ह्याच दाढीमुळ फार सोपी गोष्ट झाली आहे. नट नकटा असो, नाहींतर गरुडनाक्या असो, एखादा ढेरपोट्या असो, नाहींतर सुदामा असो, वामनमूर्ति असो नाहीतर गोरा असो—त्यान डोक्यावर एक मदील चढवला आणि हनुवटीगालावर शिवाजी छाप दाढीमिशा चिकटवून दिल्या कीं झाला त्याच ! शिवाजी ! शिवाजी महाराजावर देखील दाढीच इतक वर्चस्व होत ! एवढ कशाला ? आतापर्यंत होऊन गेलेले जगातील मोठमोठे लोक पाहा. रवींद्रनाथ टागोर, शेक्सपीयर, टॉलस्टॉय, कालिदास (कालिदासाला दाढी होती कीं नाहीं कुणाला ठाऊक ? पण त्याला दाढी असलीच पाहिजे, इतकं त्याच वाङ्मय सपन्न

आहे !) सारखे कवि नि लेखक, लुई पाश्चर, डार्विन, हिपॉक्रिटिस, आर्किमिडीस, पी. सी. रे. सारखे शास्त्रज्ञ, अण्णासाहेब कर्वे, शिंग्यासारखे समाजसेवक, बाबूराव पेटरासारखे चित्रकार—ह्या सर्वांना दाढ्या होत्या किंवा आहेत ! किंवा असंहि म्हणता येईल—आणि माझ्या मते अस म्हणणच अधिक सयुक्तिक दिसेल—की दाढी ठेवल्यामुळच हे लोक येवढ्या मान्यतेस पावले ! रवीद्रनाथाच्या फोटोकडे पाहा. पहिल्याप्रथम कुठली गोष्ट तुमच्या नजरेत भरते ? त्याची ती पाढरीशुभ्र वळणावळणान वाढणारी दाढीच ना ? आता त्याची दाढी झाका किंवा दाढी वाढवण्यापूर्वीचा त्याचा एखादा फोटो असल्यास तो पाहा. आणि ह्या दोन्ही प्रसगी तुमच्या मनात ज्या भावना उत्पन्न होतील त्याची तुलना करा. दाढी नसतानाच्या वेळच्या त्याच्या चेहऱ्यावर बुद्धिमता ओसडत असेल, तेज विखुरल असेल, पण तुमच मस्तक आदरान नम्र होणार नाहीं. पण दुसऱ्या फोटोत त्याच चेहऱ्यावर ती फेनधवल दाढी तुम्ही पाहिली, त्याच्या हनुवटी-वर उगम पावणारी ती पावित्र्याची स्रोतगगा तुमच्या दृष्टीला पडली, की मग मात्र नुसत्या अफाट बुद्धिमत्तेन जे काम झाल नसत ते सहज घडून येत ! त्या बुद्धिमत्तेला, प्रतिभेला विचारशीलतेची, त्यागाची, वैराग्याची झालर चढते, आणि मग तुमचा कठ दाटून येतो आणि मान लवते. रवीद्र-नाथ महाकवि असतील, पण त्याना ऋषि, द्रष्टा ह्याच माहात्म्य दाढीनंच दिल. कर्वे मोठे समाजसेवक असतील, पण त्याना महर्षिपदाला दाढीनच पोचवल.

मीं दाढी वाढवल्यावर माझा जो आदरयुक्त सन्मान होऊ लागला, त्याला ह्या महाभागाची आणि पर्यायान दाढीची पुण्याईच कारणीभूत होती. दाढी एके काळी मला अप्रिय असली तरी आता मला तिचा लळा लागला होता. जिच्याविषयीं मनात अकारण गैरसमज आहेत अशा मुलीशी इच्छेविरुद्ध लग्न लागाव आणि मग तिन आपल्या सद्‌गुणानी आपणाला जिकाव, तस दाढीच्या बाबतीत माझ झाल होत ! एकमेकाच्या सहवासात आमचा काळ मजेंत जात होता. मी तिची निगा राखी, तिला कुरवाळी, तिच्यावर प्रेम करी, माझ्या हृदयावर तिला खेळू बागडू देई. आणि तीहि मला विचाराची एकाग्रता प्राप्त करून देई,

नवनव्या कल्पना माझ्या डोक्यात घाली. खरोखर, आता विचार केला म्हणजे मला केव्हा केव्हा वाटत, ह्या दाढीचा सहवास मला जर दीर्घ काळ लाभता तर खरोखरीच मी एक बड्यापैकी लेखक झालो असतो ! पण आता ह्या विचाराचा काय उपयोग ? विधिघटना निराळीच होती.

नशिबाला आमच्या ह्या सुखाच्या ससाराचा हेवा वाटला असावा. कारण आमच्या सुखाच्या ससारात त्यान एक दिवस अकस्मात विघ्न आणून उभं केल !

१९४३ च्या उन्हाळयाच्या सुट्टींत मी परगावी एका मित्राकडे सहज मजेन आठपधरा दिवस घालवावेत म्हणून गेलो होतो. त्यान दाढीवरून माझी थोडी थट्टा केली, दाढीच्या जोरावर त्याच्या मित्रमडळीकडून मीं चहापाणी उकळल वगैरे सारे ठराविक प्रकार झाले. तेथील माझे दिवस मोठे मजेंत चालले होते. सकाळ-दुपार लहानशा कगव्यान दाढी विचरावी, मधूनच काहींतरी लिहाव, डोळयावर काळा चष्मा चढवून डोगर-कड्यावरून निरनिराळया मनोराज्यात मशगुल होऊन भटकाव, माझ्या दाढींतून खेळणाऱ्या वाऱ्याच्या झुळकीचा हनुवटीला गार स्पर्श झाला म्हणजे सुखान अग थरथरून याव, जाणाऱ्या-येणाऱ्यानीं माझ्याकडे कुतूहलान नि आदरान पाहाव—साऱ्या आयुष्यात मला एकहि काळजी नव्हती. सार आयुष्य माझ-आणि त्या छोट्याशा गावाचहि—अगदीं शातपणान चालल होत. रोजच्या वर्तमानपत्रातून त्या वेळी जोरात असलेल्या कॉंग्रेसच्या लढ्याच्या बातम्या वाचून जेवढी खळबळ उडत असेल, तेवढीच !

पण एक दिवस साऱ्या गावात न भूतो न भविष्यति अशी खळबळ उडवून देणारी बातमी पसरली. माझ्या मित्रामार्फत ती माझ्याहि कानावर येऊन लवकरच आदळली.

"ऐकलत का हो ?" आजूबाजूला कोणी नाहीं अस पाहून माझा मित्र हलक्या आवाजात म्हणाला.

"काय ?" आजूबाजूला कोणी नाहीं अशी खात्री करून घेऊन मीं विचारल.

" इथं अच्युतराव पटवर्धन आलेत अस ऐकतो. "

" अच्युतराव पटवर्धन ? "

" हो ! चळवळ सुरू झाल्यापासून सरकारच्या हातावर तुरी देऊन आहेत ते अजून. त्याना पकडण्याकरता सरकारन जगजग पछाडले, मोठमोठीं बक्षिस लावली, पण अच्युतराव काहीं दाद देत नाहींत. "

" पण आता तर ते इथ आले आहेत ना ? जी बातमी तुम्हाआम्हाला कळली, ती काय पोलिसला कळणार नाहीं ? "

मीं अशी रास्त शका व्यक्त केलेली पाहून माझा मित्र जरा हिरमुसला झाला. तो म्हणाला, " पोलिसला कळल असेल तर ! पण अच्युतराव गावात असले तरी नक्की कुठ आहेत हे मात्र कुणालाच माहीत नाही. आणि अच्युतरावहि वेषातर करण्यात मोठे पटाईत ! कधी बगाल्याच सोंग आणतील, कधी पठाण होतील, तर कधी मद्रासी अय्या होऊन ' उड्गुड्ड ' करीत फिरतील. त्यानी मुबईच्या पोलिसच्या हातावर तुरी दिली. ते काय असे इथल्या पोलिसाता दाद देतात ! सध्या ते दाढीमिशा वाढवून आणि काळा चष्मा लावून फिरतात म्हणे "

इतक्यात दरवाजावर थाप ऐकू आली. बाहेर बुटाचा खाडखाड आवाज झाला. काय प्रकार असावा ह्याविषयी विचार करीत आम्हीं दरवाजा उघडला. पाहतों तो आमच्यावर पिस्तल रोखून फौजदारसाहिब मोठ्या सावधगिरीन उभे ! त्याच्या पाठीशी तीन हत्यारी व पाचसात बिनहत्यारी पोलीस उभे होते.

" काय पाहिजे आपणाला ? " माझ्या मित्रान घाबरून प्रश्न केला.

" पोलीस, हातकड्या चढव ह्याना. " आम्हा दोघाचा निर्देश करून फौजदारसाहिब म्हणाले. " आणि झडती घ्या साऱ्या घराची. "

" पण कशाबद्दल झडती घेणार तुम्ही ? "—माझा मित्र.

" मिस्टर, वेड पाघरून पेडगावला कशाला जाता ? " नतर मिशीवर ताव देऊन ते मला म्हणाले, " चला मिस्टर अच्युतराव पटवर्धन "

" मी अच्युतराव नाही. " मी म्हणालो.

" आणि असलात तरी थोडेच असे कबूल होणार आहात ? "

नतर तीन दिवस मीं कचेरीत सरकारी पाहुणचार घेतला. तेवढ्या मुदतीत मुबईला तारा करून मी एक निरुपद्रवी प्राणी असल्याची फौजदार-साहेबाची खात्री पटवून देऊ शकलो. तीन दिवस भली मोठी शिकार म्हणून फौजदारसाहेबानी माझी चागलीच बडदास्त ठेवली होती. कॉंग्रेसच राज्य परत सुरू झाल्यास आपली आठवण असू द्यावी, अस सुचवायलाहि ते विसरले नव्हते. पण जेव्हा मी अच्युतराव नाही अशी त्याची खरोखरीच खात्री पटली, तेव्हा निराशेच्या भरात चिडून त्यानी माझी हकालपट्टी केली.

ह्या प्रसगामुळ मी माझ्या दाढीवर चिडलो असेन अस का वाटत तुम्हाला ? छट् ! उलट, तीन दिवस का होईना, पण एका महान् देशभक्ता-च्या जागी तिन मला नेऊन बसवल ह्याचा मला आनदच झाला. आणि माझा तिच्याविषयीचा आदर द्विगुणित मात्र झाला.

कचेरीतून घरी आल्यावर मी मुबईला जाण्याच्या उद्योगाला लागलों. आता त्या गावात राहण्यात अर्थ नव्हता. जिथ अच्युतराव म्हणून मी तीन दिवस काढले, तिथंच आता एक सर्वसामान्य माणूस म्हणून राहण्यात स्वारस्य नव्हत. जिथ मोती वेचले, तिथं काय आता गोवऱ्या वेचायच्या ? माझ्या बेताला माझ्या मित्रानेहि समति दिली. पण निघण्यापूर्वी तो मला म्हणाला, " हे बघ, दाढीवर तुझ मोठ प्रेम असेल, पण शहाणा असशील तर दाढी काढून टाक. हो. आपला माझा सल्ला आहे ! "

" कारे बुवा ? तिन काय अस मोठ पाप केलय् ? तीन दिवस मीं कचेरीत काढले म्हणून म्हणत असशील तर त्याबद्दल मला काहीच वाटत नाही. तीन दिवस मी एक मोठा देशभक्त म्हणून मिरवलो ना ?

" ते खर. पण आज तुला अच्युतराव म्हणून पकडल, उद्या दुसऱ्या एखाद्या ठिकाणीं वेषातर केलेला एखादा खुनी दरोडेखोर म्हणून तुला जर पकडल आणि तो तू नव्हेस हें तुला सिद्ध करता आल नाही तर ? "

गाडीत बसल्याबसल्या त्याच्या ह्या बोलण्यावर मीं पुष्कळ विचार केला. त्यातहि बराचसा तथ्याश होता खरा. मोठमोठे कवी, तत्त्वज्ञानी,

शास्त्रज्ञ, देवभक्त, मुमुक्षू ह्याच्या सहवासात राहणाऱ्या दाढीला बेरड बदमाषाचा सहवासहि आवडत असावा, ह्या तिच्या विचित्र खोडीबद्दल मला खेद वाटला.

आणि मग घरी आल्यावर एका कारागिराला बोलावून आणून इतके दिवस जिला मोठ्या प्रेमानं मी हृदयाशी बाळगली, त्या माझ्या दाढीशी मी जड अंतःकरणानं घटस्फोट घेतला !

# श्वे तां ब री

हातात चहाचा ट्रे घेऊन प्रतिभा श्रीधरच्या खोलीच्या दरवाजापाशीं आली आणि आतील हलक्या आवाजात चाललेले सभाषण ऐकून एकदम थबकली. आपल्या हालचालीचा काहींहि आवाज होऊ न देता ती दरवाजाआड झाली. तिनें आपला श्वासदेखील रोखून धरला आणि कान घोड्यासारखे टवकारून ती आतील सभाषण ऐकू लागली.

" काय कराव बुवा ! काहीं लागला की नाहीं पत्ता श्वेताबरीचा ? " श्रीधर निराशायुक्त स्वरात विचारीत होता.

" नाहीं बुवा. साऱ्या गावात धुडाळलं, पण कुठ दिसली नाहीं. " गगाधर—श्रीधरचा जीवश्चकठश्च मित्र—उत्तरला.

" ह ऽ ऽ ! " एक सुस्कारा सोडून श्रीधर म्हणाला, " श्वेताबरीवाचून काहीं सुचत नाहीं रे. लेखनाकडेदेखील लक्ष लागत नाही. ह्या पाचसहा दिवसापासून बिलकुल करमत नाही बघ. "

अगदी खर होत हें. अलीकडे पाचसहा दिवसापासून श्रीधर नेहमी-प्रमाणे आनदात दिसत नाही हें प्रतिभेच्या लक्षात येऊन चुकले होत. त्याचे कारण ही कोणी श्वेताबरी होती काय ?

" मग आता काय करायच ? ". श्रीधरचा आवाज.

" पाहू. दोनचार दिवसात येईल अस म्हणतात."—गगाधरचा आवाज.

" तिचा विरह आता तर मला मुळींच सहन होत नाहीं ! त्या गौरा-गीला भेटण्याकरता मी अगदी अधीर झालोय् ! "—श्रीधरचा आवाज.

त्यावर गंगाधर खिन्नपणाने हसल्याचा प्रतिभेला भास झाला. त्याच्या संभाषणाला आता जवळजवळ कुजबुजीचे स्वरूप आले होते. ते ऐकण्या-करता ती आणखी पुढे वाकली. तिची छाती धडधडत होती आणि हात थरथरत होते. त्यामुळे तिच्या हातातील ट्रे हालून त्यातील कपबशाचा अनपेक्षितपणाने आवाज झाला.

आणि त्याबरोबर आतील कुजबुजहि एकदम थाबल्याचे तिला कळून आले.

प्रतिभेने स्वत.ला सावरून घेतले, चेहरा शक्य तेवढा निर्विकार केला आणि खोलीत जाऊन टेबलावर चहा ठेवता ठेवता श्रीधरच्या चेहऱ्याचे तिने चटकन् निरीक्षण करून घेतले. चोराची दृष्टि चोराला बरोबर ओळखता येते. श्रीधरच्या दृष्टीत तिला त्याच्या गुन्हेगार मनाचे प्रतिबिंब आढळून आले.

स्त्रीला करता येण्यासारखी सर्वांत सोपी गोष्ट जर कुठली असेल तर ती म्हणजे आपल्या नवऱ्याचा संशय घेणे ! पुरुषप्राणी हा नंबर एकचा बेइमान, चंचल आणि विश्वासघातकी आहे हे ज्ञान स्त्रीला उपजतच असते आणि जणू काय त्याच्या नीतिमत्तेवर पहारा करण्याकरताच ती त्याच्याशीं लग्न करते ! श्रीधरच्या सद्वर्तनाला प्रतिभा इतकी जपे, की तिच्याकडे कामाकरता राहणाऱ्या मोलकरणींना म्हातारपण आणि कुरूपपणा ह्यासारखी दुसरी उत्तम शिफारसपत्रे नव्हती. श्रीधरची नीतिमत्ता बऱ्यापैकी आहे असा जरी तिने लग्नानंतरच्या ह्या चारपाच महिन्यातील अनुभवावरून सर्वसाधारण निष्कर्ष काढला होता तरी तिने त्याच्यावरील आपला पाहारा मुळींच ढिला होऊ दिला नव्हता. आतापर्यंत त्याने काही भानगड केलेली नसली तरी पुढच्याच क्षणाला तो तसं काहीं करणार नाही कशावरून ? हो, कितीहि झालं तरी तो एक ‘ पुरुष ’च आहे. अशा धोक्याच्या सूचना तिची अंतःप्रेरणा देई आणि तिला नेहमी जागरूक ठेवी. श्रीधरकडे कोणी मित्रमंडळी आल्यास त्याचें संभाषण चोरून ऐकण्याचा तिने नियम केला होता. गंगाधर हा तर श्रीधरचा बालमित्र, तेव्हा तो आला कीं त्याचे संभाषण दाराआड उभे राहून चोरून ऐकण्याची ती विशेष काळजी घेई. त्याच्याशीं गप्पागोष्टी करताना श्रीधरचें

एखादे गुपित बाहेर पडण्याचा बराचसा संभव होता. घरीं मामजी आणि सासूबाईचा पाहारा नसला तरी श्रीधरच्या खोलीकडे जाताना मांजराच्या पावलानी जाण्याची तिला आता सवयच पडून गेली होती. पण येवढी सारी गुप्त हेरगिरी करूनहि अजूनपर्यंत तरी तिला श्रीधरला एकाहि बाबतीत पकडत आलें नव्हते. त्याच्याविषयी तिच्या मनात हळूहळू विश्वास उत्पन्न होऊ लागला होता आणि त्याच्या बाबतीत ती जवळजवळ निर्धास्तच झाली होती. केवळ नेहमींच्या शिस्तीप्रमाणे तिने त्या मित्राचे संभाषण चोरून ऐकले होते, आणि तिला हा भयंकर प्रकार कळून आला होता.

टेबलावर चहा ठेवून आणि श्रीधरच्या चेहऱ्याचे बारीक निरीक्षण करून खोलीतून बाहेर पडेपर्यंत आपले पुढील डावपेच तिने मुक्रर करून टाकले होते. दरवाजातून बाहेर पडताना मुद्दाम ती पावलाचा मोठ्याने आवाज करीत गेली. एकदोनदा हात हालवून काकणाचाहि त्या दोघाना स्पष्ट ऐकू जाईल असा तिने आवाज केला आणि त्याच्या दृष्टिपथातून घरातल्या घरात जितके लांब, सरळ जाता येणे शक्य होते तेवढें ती गेली. आपणाला काहीच संशय आलेला नाहीं आणि आपण आत माजघरात कामात आहोत, आपण चालताना आपल्या पावलाची आणि काकणाची स्पष्ट चाहूल लागते असे समज तिला शत्रुपक्षात उत्पन्न करायचे होते. माजघरात ती दोनचार मिनिटेच थांबली, पण तीं तिला दोनचार युगाप्रमाणे वाटली. ते दोघे काय बोलत असतील, त्याचा काहीं महत्त्वाचा संवाद आपण तिथे जाऊन पोचण्याच्या पूर्वीच होऊन तर जाणार नाहीं ना, अशी तिला सारखी धाकधूक वाटत होती. अखेरीस आपल्या हुलकावणीने शत्रुपक्ष आता गाफील झाला असेल असा अंदाज करून ती मग परत बाहेर जायला निघाली. तिनें आपल्या बांगड्या वर सारून कोपराशीं घट्ट बसवल्या, कंबरेला पदर खोवून घेतला, लुगड्याचा ओचा हलकेच वर उचलून घेतला आणि ज्या जमिनीवरून ती चालत होती त्या जमिनीलाहि कळू नये इतक्या हलक्या पावलानीं—जवळजवळ पायाच्या आगठ्यावरच चालत ती पूर्वीच्या आडोशाच्या जागीं जाऊन उभी राहिली.

थोडा वेळ खोलींत सर्वत्र शांत होतें. आपलें संभाषण ऐकण्याच्या

टांग्याच्या पलीकडे ती गेलेली आहे ना, ह्याचीच जणूं ते दोघे खात्री करून घेत होते. थोड्या वेळाने श्रीधरनें हलक्या आवाजात म्हटलेलें वाक्य तिला ऐकू आलें, " ऐकल का रे तिन आपल बोलण ? "

" ऐकेना का !" गंगाधरचा आवाज. " काय झाल ऐकल तर ?"

" नाहीं रे ! तिला माहीत नाही अजून हा प्रकार. अजूनपर्यंत तरी लपवून ठेवलय् हें सार मी तिच्यापासून. "

" भारीच भित्रा बुवा तू !"

" अरे बाबा, तिला हा प्रकार कळला तर फाडून खाईल ती मला. "

" पण नाहींतरी आज ना उद्या तुझ हें बिंग फुटणारच. त्यापेक्षा एकदा सरळ सरळ सार सांगून मोकळा हो ना. काय करतील वहिनी करून करून ? इतका काय बायकोला भितोस ?"

त्यावर श्रीधर खिन्नपणान हसल्याचे तिला ऐकू आले आणि मग दुसऱ्या विषयावर त्याच्या गोष्टी सुरू झाल्या.

' वहिनी, ' ' वहिनी ' करून तोंडदेखले गोड गोड बोलणारा गंगाधर आपल्या पश्चात् श्रीधरला आपल्या भावनाची पर्वा न करण्याचा सल्ला देण्याइतपत उलट्या काळजाचा असेल अशी तिला आतापर्यंत कल्पना नव्हती ! तिला त्याचा मनस्वी राग आला. पण त्याचा राग करण्याइतकी तिला आता फुरसत नव्हती. आपलाच दाम खोटा तिथ दुसऱ्याला बोल लावण्यात काय अर्थ ? श्वेतांबरीची ही काय भानगड आहे ह्याचा आधीं तलास लावलाच पाहिजे, आणि श्रीधरला एकदा मुद्देमालासकट पकडून त्याची चांगलीच खरडपट्टी काढली पाहिजे, ह्याच विचारानी तिला घेरलें. त्याशिवाय तिला आता चैन पडणे शक्य नव्हते.

प्रथम, ही श्वेतांबरी कोण आहे ? ती काय करते ? तिच वय काय ? अर्थात् ती तरुणच असणार. आणि मुख्य म्हणजे ती दिसायला कशी आहे ? ह्या गोष्टींचा शोध करण्यास तिनें प्रथम सुरवात केली. दुपारीं श्रीधर कोर्टात गेल्यावर ती ह्या मोहिमेवर बाहेर पडली आणि युद्धखात्यातील गुप्त बातम्या मिळवणाऱ्या एखाद्या माताहारीनें देखील लाजेनें मान खाली घालावी

येवढ्या अल्पावधीतच तिने श्वेतांबरीच्या चरित्राची साधने गोळा करून आणली.

श्वेतांबरी ही कॉलेजात जाणारी एक थिल्लर पोरगी होती. वयाने वीसबावीस वर्षांची, दिसायला काळीकुळकुळीत आणि नकटी, जाड भिंगाचा चष्मा लावणारी. आपणासारखी सुंदर बायको मिळाली असताना अशा मुलीवर श्रीधरचे प्रेम जडावे, येवढेच नव्हे, तर तिच्यासारख्या काळ्या घुशीला ' गौरांगी ' म्हणण्याइतका तो प्रेमाने आंधळा व्हावा ह्याचे प्रतिभेला वाईट वाटले, पण आश्चर्य मात्र वाटले नाही. हो, पुरुष केव्हा काय करील ह्याचा नेम नाही ! त्यातून श्रीधरसारख्या आनंदी, थट्टेखोर आणि ज्याला गंभीरपणा कधीच ठाऊक नाहीं, अशा माणसाचा हवाला तर कोणीच देऊ नये. आणि एक वेळ, त्याने जरी पुढाकार घेतला नाही, तरी अलीकडल्या कॉलेजातल्या ह्या चवचाल पोरी त्याच्यासारख्या उमद्या तरुणाला आपल्या मोहपाशात गुंतविल्याखेरीज थोड्याच राहणार आहेत !

श्वेतांबरी सुंदर नसली तरी तिच्याविषयी त्याला कां आकर्षण वाटावे ह्याचे एक सयुक्तिक कारणहि तिला तपासणीत आढळून आले होते. श्वेतांबरी म्हणे एक कवयित्री होती ! तिचे खरे नाव होते ' अंबिका गोरे, ' श्वेतांबरी ' असे टोपणनाव तिने धारण केले होते. तिच्या चारदोन कविताहि म्हणे मासिकातून प्रसिद्ध झाल्या होत्या. श्रीधरहि लेखक होताच. मग काय ? जुळलच सारं ! ' वाङ्मय-विहार ' संस्थेत त्या दोघांच्या गाठीभेटी होत आणि तिथे ती बराच वेळ साहित्यावर चर्चा करून आपली बौद्धिक भूक की काय म्हणतात ती भागवीत हेंहि तिला तपासात कळून आले होते. एक कसलेंसे छोटेसे साहित्य-संमेलन त्यांच्या गावीं भरणार होते. त्याच्या संयुक्त चिटणिसांपैकी श्वेतांबरी एक होती आणि तिकिटे खपवण्याकरता ती आठ-दहा दिवसांकरता कुठेतरी बाहेरगावी गेली होती आणि म्हणूनच तर श्रीधरपंत विरहयातनांनी व्याकुळ झाले होते. साऱ्या गोष्टींचा विचार करता आपले प्रेमसर्वस्व हरण करणारी श्वेतांबरी ती हीच, हे निदान तिने नक्की केले.

श्रीधरनें केलेल्या प्रतारणेविषयीं मिळालेल्या पुराव्यावरून तिची खात्री

झाली असली तरी त्याच्यावर तसा आरोप करून तो बिनतोड सिद्ध करण्यास तो पुरेसा नव्हता. अपुऱ्या पुराव्यानिशी त्याच्यावर तसा आरोप केला तर तो सावध मात्र व्हायचा! डावपेचाच्या दृष्टीने ते इष्ट नव्हते. त्याची खरडपट्टी काढण्याकरता ती अधीर झाली होती, पण नाइलाजाने आणखी थोडा काळ तिला थांबणे भाग होते. अलीकडे सपत्निक लेखकाच्या द्वितीय विवाहाची साथ पसरू लागली असल्याचे तिला 'स्त्री–मंडळा'तील चर्चेवरून कळून चुकले होते. श्रीधर एक लेखक आहे ह्याचा तिला किती अभिमान! पण त्यानेहि ह्या साथीला बळी पडण्यापेक्षा तो लेखक नसता तर तर बरे झाले असते असे तिला आता वाटू लागले. त्याने आपणावर सवत आणावी आणि तीहि श्वेतांबरीसारखी काळीबेंद्री आणि चवचाल–हा विचारच तिला सहन होणे शक्य नव्हते त्याने तसे काही करण्यापूर्वीच तिला हालचाल करणे अवश्य होते. पण करणार काय? काहीतरी भरभक्कम पुरावा सापडेपर्यंत मनाच्या अशाच कुचंबणेत आणखी काही दिवस काढणे तिला भाग होते. शत्रु पुरा कोंडीत सापडेतोवर कुशल सेनापति दम खातो केव्हा केव्हा तिला वाटे, आपले सारे संशय खोटे ठरण्यासारखा पुरावा मिळाला तर आपणाला किती आनंद होईल! पण तसं कुठलं व्हायला? तिच्या नशिबाने लवकरच असे एकएक प्रसंग घडवून आणले, की उलट त्यामुळे तिच्या संशयाना अधिक बळकटी मात्र आली!

चारसहा दिवसांनीच 'स्त्री–मंडळात'त 'उदयोन्मुख कवयित्री श्वेतांबरी' हिच्या काव्यगायनाचा कार्यक्रम ठरला होता. प्रतिभेला श्वेतांबरीचा इतका राग आणि तिटकारा आलेला होता, की तिच्या काव्यगायनाला जाऊ नये हाच विचार प्रथम तिच्या मनात आला. पण मनुष्यस्वभावातील एक विचित्र गोम काय असेल ती असो, आपल्या प्रतिस्पर्ध्याविषयी एक प्रकारचे अनावर कुतूहल माणसाला वाटत असते. श्वेतांबरीला एकदा डोळे भरून पाहून घ्यावे असे तिला सारखे वाटू लागले. शक्य असल्यास तिच्याशीं चार शब्द बोलावे व तिच्या नीच कृत्याची आपणाला कल्पना आहे ह्याची तिला ओझरती जाणीव करून द्यावी हाहि तिचा एक उद्देश

होताच. केव्हा तिला वाटे, ' नको त्या हडळीच तोंड दिखील पाहू नये !" तर केव्हा वाटे, ' पाहू या तर खर तिच्यात 'त्याना ' काय येवढ दिसल ते '. अखेरीस ती काव्यगायनाला गेलीच.

श्वेतांबरीकडे पाहताच तिच्या रूपाविषयी तिने काढलेली माहिती ततोतत खरी असल्याचे तिला दिसून आले. तिला घडवताना ब्रह्मदेवाच्या कारखान्यातील सौंदर्य वाटणाऱ्या कामगारानी संप केला असावा ! तिचे रूप पाहून प्रतिभेला जरासे समाधान वाटले. पण ते फार वेळ टिकून राहू शकले नाही. असल्या काळ्या, नकट्या आणि चष्मेवाल्या पोरीवर श्रीधरचे प्रेम का बसावे ? हा जो प्रश्न तिच्या मनात सारखा घोळत होता, त्याला, जेव्हा श्वेतांबरीने आपल्या कविता म्हणून दाखवायला सुरवात केली तेव्हा तिच्या गोड गळ्याने ताबडतोब उत्तर दिले. श्वेतांबरीविषयी तिला मत्सर वाटत होता, तिचे उणे काढायला ती टपून बसली होती, तरी कोकिळेच्या रंग असलेल्या तिच्या शरीरात कोकिळेचाच कंठहि आहे हे तिला मनात कबूल करावेच लागले. तिच्या काव्यगायनावर खूप होऊन इतर बायकानी ज्या टाळ्या पिटल्या, त्यात ती अर्थात् सामील झाली नाही. उलट तिची ती लोकप्रियता पाहून तिच्या मनाचा जळफळाटच झाला

कवितागायनाच्या वेळचा श्वेतांबरीचा अभिनय इतर स्त्रियाना एकदम पसंत पडला होता पण तो अभिनय पाहून प्रतिभेला तिचा तिरस्कार मात्र वाटला. ' काय छचोरपणा करते, माना वेळावते, ताना काय मारते—एवढदिखील शोभत नाही तिला ! ' ती स्वतःशीच म्हणाली आणि श्वेतांबरीच्या हावभावाना मनातल्या मनात हसत राहिली. पण लवकरच श्वेतांबरीने एक प्रेमाची कविता म्हणावयास सुरवात करताच तिचे ते हसणे कुठल्या कुठे पळून गेलें ! ' सखया ये जरा ' अशी काहीतरी शृंगारात्मक कविता माना वेळावून तोंडाचा चंबू करून श्वेतांबरी म्हणत होती. त्या ' सखया 'च्या विशेषनामाचा काही उल्लेख त्या कवितेत नव्हता, पण श्वेतांबरीचा तो ' सखा ' म्हणजे आपला श्रीधरच आहे हे प्रतिभेला ओळखायला वेळ लागला नाही. ' सखयाऽ 'सखयाऽ' असें श्वेतांबरी आळवून आळवून म्हणत होती, आणि तिच्या समोर श्रीधर हसत हसत उभा असून त्याच्याकडेच ती आपले प्रेम

व्यक्त करीत आहे, असा प्रतिभेला सारखा भास होत होता व त्याबरोबरच श्वेतांबरीला खाऊ की गिळू असे तिला होत होते.

नंतर श्वेतांबरीने एक द्वंद्वगीत म्हणायला सुरवात केली 'तो म्हणाला नि ती म्हणाली' असं काहीतरी ते होते, अर्थात् संगीतात दोघांचे प्रेम चालले होते. ह्या द्वंद्वगीताच्या वेळीं तर श्रीधर श्वेतांबरीच्या समोर उभा आहे, हा भास प्रतिभेला इतका स्पष्ट होत होता, की आपल्या नवऱ्याने इतक्या स्त्रियांच्या देखत प्रेमाचे असले चाळे करावेत ह्याची तिला लाज वाटली. आणि तिथे जमलेल्या गावातल्या साऱ्या सभ्य आणि कुलीन म्हणून समजल्या जाणाऱ्या स्त्रिया–कुणा तरुणाने एखाद्या मुलीकडे नुसते पाहिले तरी टीका करणाऱ्या काही काकूहि त्यांत होत्या–हा सारा चावटपणा उघड्या डोळ्यांनी मिटक्या मारीत पाहून तरी कशा घेतात ह्याचेच तिला आश्चर्य वाटत होते. श्वेतांबरीने 'तो म्हणाला' म्हणून श्रीधरचे भाषण सुरू केले आणि त्यातील प्रेमाने आणि शृंगाराने ओथंबलेले शब्द तिच्या कानांवर येऊन पडले, की तिला वाटे, कुणीतरी लोखंडाच्या सळया लाल लाल तापवून त्या आपल्या हृदयात खुपशीत आहे!

काव्यगायन लवकरच संपले. उदयोन्मुख कवयित्रीबद्दल ठराविक शब्दांत उच्च अपेक्षा प्रदर्शित करण्यात आल्या आणि मग एखाद्या झाडावर बसलेल्या कावळ्यांच्या थव्यावर दगड फेकला की जो गलका सुरू होतो, तसा 'स्त्रीमंडळा'च्या सदस्यांचा गलकाहि सुरू झाला. पण प्रतिभेला कशाचीच दखल नव्हती. 'स्त्रीमंडळा'च्या हॉलमध्यें चालू असलेल्या कोलाहलापेक्षाहि मोठा कोलाहल श्वेतांबरीविषयी–त्या भवानीविषयी-तिला वाटणाऱ्या क्रोध, त्वेष, असूया वगैरे विकारांनी तिच्या डोक्यांत माजवला होता. त्या विकारांना कोठूनतरी मोकळी वाट करून दिल्याशिवाय तिच्या मनाला हलके वाटणे शक्य नव्हते. आणि तशी संधीहि तिला लवकरच मिळाली.

स्तुतीने फुगून गेलेली श्वेतांबरी अर्धवट चालत व अर्धवट हवेत तरंगत तिच्याजवळ आली आणि आपल्या चष्म्याच्या जाड भिंगामधून तिच्याकडे पाहून म्हणाली, "अहो प्रतिभाताई, श्रीधरपंतांच्या तुम्ही पत्नी हे मला आत्ताच कळलं. माझं एक काम कराल का?"

प्रथम प्रतिभेला वाटले ' नाही करत ' म्हणून सरळ सांगावं आणि तिची जिरवावी! तेवढच समाधान! पण लगेच दुसरा विचार तिच्या मनात आला : पाहू या तर खर, काय काम आहे तिचं श्रीधरकडे ते! आणि अखेरीस ही उत्सुकताच प्रबल ठरून तिने विचारले, " काय ? "

" नाही. मी ही एक नवीन कविता केली आहे, ती त्याना दाखवायची आहे. कराल का येवढ काम ? " श्वेतांबरीने ' त्याना ' हा शब्द श्रीधरला उद्देशून वापरावा हे त्या मनःस्थितीतहि प्रतिभेला आवडले नाही. पण आपली नापसती दडवून ठेवून श्वेतांबरीने पुढे केलेले चिटोरे तिने हातात घेतले.

तिने त्या कवितेचे नाव वाचून पाहिले–' प्रेमाचा निरोप ! ' म्हणजे आपला प्रेमाचा निरोप श्रीधरला पाठविण्याची मेलीची ही युक्ति आहे काय ?

" यॅक्स ! " प्रतिभा असा विचार करते आहे तो एक मुरका मारून श्वेतांबरी म्हणाली. तिचा तो मुरका प्रतिभेला किळसवाणा वाटला. त्या मुरक्याने जणू एखाद्या पेटीत बद करून ठेवलेल्या तिच्या विकारावरचे झाकण उघडण्याचे काम केले. ती संतापाने श्वेतांबरीला म्हणाली, " काय हो कवयित्रीबाई, इथ येऊन मोठा गळा काढून आणि तोंड वेडीवाकडी करून कविता म्हणता आणि भोळयाभाबड्या बायकांकडून टाळ्या घेता ! पण दुसऱ्याच्या मालमत्तेवर डल्ला मारायला काही लाज नाही वाटत तुम्हाला ? "

तिचे हे आवेशपूर्ण आणि अगदीच अनपेक्षित भाषण ऐकून श्वेतांबरी जागच्या जागी खिळली गेली. तिचा चेहरा एखाद्या चोराला ऐन चोरी करीत असताना पकडावे तसा गोरामोरा झाला ह्या अनपेक्षित धक्क्यातून लवकरच ती भानावर आली आणि विनवणीच्या स्वरात प्रतिभेला म्हणाली, " प्रतिभाबाई, कृपा करून हा विषय इथ काढू नका. आपण नतर बोलू त्यावर ! "

" नतर कशाला ? हो इथच बोलणार मी सार. चोरी करूनच्या करून वर शिरजोरी ? मोठी कवयित्री झालीय् ! ह ! ह्या सर्व बायकाना सांगते मी तुझी खरी योग्यता काय आहे ती. "

“ नको, नको, प्रतिभाबाई ” घाबरून गेलेली श्वेतांबरी आजूबाजूला बघत गयावया करीत म्हणाली, “ मी तुमच्या पाया पडते पण माझा गौप्य-स्फोट इथ करू नका ! ”

तिच्या चष्म्याच्या जाड भिंगातून गोट्यायेवढे दिसणारे दोन अश्रु तिच्या डोळ्यातून बाहेर पडून, तिच्या गालावरची पॉवडर गोळा करीत खाली ओघळताना प्रतिभेला दिसले त्या दोन अश्रूनी प्रतिभेचे हृदय विरघळले आणि ती म्हणाली, “ बर काही नाही बोलत इथ. पण येवढ सागून ठेवते की परत जर का ह्या फदात पडलीस तर याद राख !”

अर्थात् आपल्या रुमालाने अश्रु टिपून घेत श्वेतांबरीने ते एकदम कबूल केले. तिची चागली खरडपट्टी काढली ह्या विचाराने प्रतिभेला आनद झाला. कशी पण दातखीळ बसली मेलीची ! विजयोन्मादाने मनाला प्रश्न केला. पण त्याच प्रश्नाने तिचा तिने विजयोन्माद नाहीसा केला. आपली सरबत्ती ऐकून ती एकदम गप्प का राहिली ? तिने सार एकदम कबूल का केल ? येवढी गयावया का केली ? अर्थात् आपण तिच्यावर केलेला आरोप शभर टक्के खरा होता म्हणून ! म्हणजे आपल्या शकेप्रमाण तिच श्रीधरशी खरोखरीच सूत आहे तर ? तिच्या मनाला दु खपूर्ण खात्री पटली

तिच्या अपेक्षेविरुद्ध दोनचार दिवसातच श्वेतांबरी श्रीधरला भेटायला त्याच्या घरी येऊन गेली आपण तिची येवढी खरडपट्टी काढली असतानाहि तिने परत येण्याचा धीर करावा ह्याचे तिला आश्चर्य वाटले बहुधा आपल्या ‘ प्रेमाच्या निरोपा ’चे उत्तर अजून कसे नाही आले, ह्याची चौकशी करण्याकरिता ती आली असावी कारण प्रतिभेने तिचा तो ‘प्रेमाचा निरोप’ ‘सेन्सॉर’ करून टाकला होता बराच वेळ ती दोघे श्रीधरच्या खोलीत काहीतरी बोलत बसली होती ! त्याच्या सभाषणात आक्षेपार्ह असे तिला काव्याच्या चर्चेखेरीज दुसरे काही विशेष ऐकू आले नाही तरीपण चहाचा ट्रे हातात घेऊन जेव्हा ती दारातून आत शिरली, तेव्हा श्रीधरने एक लिफाफा जणू सहजच असा टेबलाच्या खणात ठेवून दिलेला तिने पाहिलाहि होता त्या वेळी तिने आपल्या चर्येवर काहीहि बदल होऊ दिला नाही की

श्रीधरने आग्रह केला तरी त्याच्याबरोबर ती चहाला बसली नाही त्यापेक्षा त्याचे संभाषण भितीच्या आडून ऐकणेच तिला जास्त फलदायी वाटले

कसलं असावं ते पाकीट ? श्वेतांबरीनं– आता तिला श्रीधरशी उघडपणानं बोलण्याची चोरी झाल्यामुळंच काहीतरी प्रेमपत्र घालून ते पाकीट दिलं असावं ! आणि अलीकडे दोनतीन दिवसापासून श्वेतांबरी गावाहून परत आल्यामुळंच असेल, श्रीधरची स्वारीहि खुषीत दिसत होती. बस्स ! ते पाकीट आपल्या ताब्यात मिळवलं की चांगलाच मुद्देमाल आपल्या तावडीत सापडेल आणि मग अशा प्रसंगीं आपल्यासारखी तडफदार आधुनिक तरुणी काय करू शकते हे आपण श्रीधरला नि जगाला दाखवून देऊ !

श्वेतांबरी गेल्यावर प्रतिभा हसत हसत श्रीधरच्या खोलीत गेली. श्रीधरनेहि तिचं हसतमुखाने स्वागत केलें. किती कपटी असते पुरुषाची जात ? तिच्या मनात विचार आला पण तिनं सहज म्हणून वरपांगी हसत हसत विचारले, " कशाला आल्या होत्या कवयित्रीबाई ? "

" संमेलनाची तिकिटं खपवायला. "

" संमेलनाची की मीलनाची ? " प्रतिभेनं विचारले.

तिची ही अजब कोटी ऐकून श्रीधर चाटच झाला. तो गोंधळलेल्या मनःस्थितीत असलेला पाहून प्रतिभा हळूहळू त्याच्या टेबलाजवळ जाऊन उभी राहिली आणि जणू काय अगदी सहज म्हणून ती तो खण उघडू लागली.

तिने तो थोडासा उघडलादेखील ! त्या पाकिटाचा एक कोपरादेखील तिला दिसला. पण तेवढ्यात जवळच खुर्चीवर बसलेल्या श्रीधरनं भानावर येऊन धाडकन् बंद केला.

" पाहू ना काय आहे ते ! " लाडिकपणाची कमाल करून प्रतिभा म्हणाली.

" नको, काही नाही विशेष पाहण्यासारखं ! " श्रीधर थट्टेच्या स्वरात म्हणाला खरा, पण त्याच्या मनात उडालेला गोंधळ तिच्या नजरेतून सुटलो नाहीं.

आपणापासून तें पाकीट लपवून ठेवण्याचा श्रीधर प्रयत्न करतो आहे

ह्याविषयी तिला आता यत्किंचितहि शंका उरली नाही. ते पाकीट पाहिल्याशिवाय आपणहि आता हालायचे नाहीं असा तिने निश्चयच केला होता.

नुसत्या लाडिकपणाने काम भागत नाही असे पाहून तिने थोडीशी मस्ती करून पाहिली, पण श्रीधरसारख्या धटिंगणपुढे काय चालणार तिचे? त्या श्रमानी बिचारीला दम मात्र लागला आणि नतर तिने एकाएकी आपले भयंकर शस्त्र उपसले!

"ओहो!" श्रीधर हसत म्हणाला, "हे काय नवल? आकाशात ढग न जमताच पाऊस कसा पडू लागला एकाएकी?"

पण त्याच्या ह्या मस्करीने तो बिनढगाचा पाऊस थाबला नाही. त्याने नाना तऱ्हानी प्रयत्न केले, पण ऐन हस्तनक्षत्रातील पावसाप्रमाणे तो पाऊस चालूच राहिला.

"मला माहीत आहे त्या खणात काय आहे ते!" वर दोन हुंदके.

श्रीधर गप्प राहिला.

"माझ्यापासून येवढं काय लपवण चाललय—सारं माहीत आहे मला." एक हुंदका.

"काय आहे खणात?"

"श्वेतांबरीच पाकीट!"

"श्वेतांबरीच पाकीट?"

'हो हो. श्वेतांबरीच पाकीट!" 'बाप दाखव नाहीतर श्राद्ध कर' म्हणण्याची वेळ आता येऊन ठेपली होती, हे जाणून ती टासून म्हणाली. रडणं थोडा वेळ तहकूब ठेवून आपल्या ह्या शब्दाचा श्रीधरवर काय परिणाम झाला आहे हे तिने पाहून घेतले. तिच्या अपेक्षेप्रमाणे ते शब्द ऐकताच तो दचकला होता आणि नतर त्याचा चेहरा चोरासारखा पडला होता.

तिने शंकानिरसन करण्याचा श्रीधरने काहीच प्रयत्न केला नाही. ह्यावरून आपला तर्क बरोबर आहे ह्याची तिला खात्री पटली. मग काय विचारता? एखाद्या मशीनगनमधून सुटावेत तसे हुंदके तिच्या तोंडून बाहेर पडू लागले. दोन हुंदक्याच्या पाहाऱ्यात बसलेला एक एक शब्द तिच्या

तोडून बाहेर पडला, " ( हु ) कितीतरी ( हु ) दिवसापासून ( हु ) सुगावा ( हु ) लागला ( हु ) होता ( हु ) मला ( हु हु )" ह्यापुढील वाक्य जे तिने उच्चारले त्यात तर हुदक्यानी कहरच करून टाकला. शब्दाच्या डोक्यात, पोटात हातापायात, शेपटात, जिथे सापडेल तिथे ते घुसले होते. "हू फ हु सव हु ल हु हु ग हुहु बाई हु म हु. ला हुहु!"

" काय म्हटलस ? " श्रीधरने विचारले " नीट साग मला ही तुझी ' हु 'ची भाषा येत नाही. "

" काही नाही " त्याच्या थट्टेने एकदम आधुनिक तरुणी अगात सचारून ती टणत्कारली. " म्हटलऽऽमला फसवल तुम्ही ! आल का ऐकू ? "

" खर आहे ! " श्रीधर एकदम कबूल झाला " तुझी फसवणूक मी केली हे खर आहे. पण आज ना उद्या सार मी तुला सागणारच होतो "

एखाद्या ढेकळासारखा श्रीधर विरघळलेला पाहून त्या दशाहि स्थितीत प्रतिभेला आश्चर्य वाटले तिला वाटले होते, तो एखादी मॅजिनो तटबदी उभारील व त्याच्याआडून आपले प्रश्न परतवून लावील. तो तर शरणचिठी देऊन मोकळा झाला होता ! पण तो पुढे म्हणाला, " खर पाहाता आपल लग्न होण्याच्या आधीच हा प्रकार मी तुला कळवायला पाहिजे होता ! "

" म्हणजे ? तुमच हे श्वेतांबरीप्रकरण आपल्या लग्नाच्या आधीपासून चालू आहे ? "

" हो ! पण त्याबद्दल तू येवढ अकाडताडव का करतेस ? अलीकडे बहुतेक सुशिक्षित असेच माझ्यासारखे असतात विशेषत लेखक तर "

" हो ! लेखक ! लेखक झालात म्हणून काय झाल ? " प्रतिभा निक्षून म्हणाली, " मी तुम्हाला चक्क सागून ठेवते ! यशवती विवाह करून तुम्ही जर माझ्यावर सवत आणणार असाल तर मी काही गप्प राहणार नाही ! "

" यशवती विवाह ? सवत ? हे काय बोलतेस तू ? कुणाशी यशवती विवाह करणार मी ? "

" कुणाशी ? ती ती मेली श्वेतांबरी आहे ना मोठी कवयित्री !—

तुमची गौरांगी ? काय ध्यान आहे ! आणि ते कसं पसंत पडलं तुम्हाला देव जाणे ! ”

“ श्वेतांबरी ? ”

“ हो. तुमचं तिच्यावर प्रेम आहे ना ? चार दिवस ती गावाला गेली तर कढईतल्या भज्याप्रमाणं विरहानं तळमळत होता ना ? पाहातेय् मी सारं ! तुम्हाला वाटलं, मला काही कळणार नाही. मांजर डोळे मिटून दूध पितं ” पण तिचे बोलणे येवढ्यावरच थांबले. श्रीधरच्या चेहऱ्यावर ‘ ट्रॅन्सफर–सीन ’ झाला होता तिथली लाचारी नाहीशी होऊन तो मोठमोठ्यानं हसत होता. ती बोलण्याचे थांबताच तो म्हणाला, “ हो माझं श्वेतांबरीवर प्रेम आहे. अगदी हृदयात नसलं तरी हृदयाच्या जवळ मी तिला ठेवलंय् रोज मी तिचं चुंबन घेतो ! ”

त्याने अगदी निर्लज्जपणाने उच्चारलेले हे शब्द ऐकण्यापेक्षा सीतेप्रमाणे पृथ्वीनं आपणाला पोटात घ्यावे असे तिला वाटले श्रीधर फिदीफिदी हसत होता त्याचा तर तिला भयंकर संताप आला.

“ बाई ! बाई ! शर्थ झाली आता निलाजरेपणाची ! काही जनाची नाही तर मनाची ? ही अशी माहेरी जाते मी ! मग घाला धुडगूस तुम्ही आणि तुमची ती श्वेतांबरी ! ”

“ तू गेल्यावर कशाला ? आताच तुझ्यासमोर दाखवतो की तो प्रयोग ! ” असे म्हणत श्रीधरने मधाच्या खणातून एक वस्तु काढली. ती वस्तु त्याच्याजवळ प्रतिभेने पूर्वी कधीच पाहिली नव्हती ते एक ‘ कॅप्स्टन सिगरेट ’ चं पाकीट होते

“ ही बघ माझी श्वेतांबरी ! ” नंतर एक सिगरेट ओठात धरून ती शिलगावीत तो म्हणाला, “ आणि असं मी हिचं चुंबन घेतो ! ”

“ ही तर सिगरेट आहे ! ”

“ हो. हिच्या पांढऱ्या पातळावरून आम्ही हिला ‘श्वेतांबरी’ म्हणतो. माझं सिगरेटचं व्यसन मी तुझ्यापासून लपवून ठेवलं होतं. नेहमी वाटे, की तुला एकदा हे सांगून टाकावं. पण धीर होत नसे एखादे वेळी आम्ही

आपसात बोलताना ‘ सिगरेट ’ हा शब्द तुझ्या कानावर पडेल ह्या भीतीन आम्ही ह्या टोपणनावाच्या भानगडींत पडलो तर हा घोटाळा झाला ! ”

त्याचे बोलणे तिला हळूहळू खरे वाटू लागले होते. तिने विचारले, “ पण मग त्या दिवशी गगाधरभावजींना ‘ श्वेतांबरीचा विरह सहन होत नाही’ म्हणून काय सागत होता ? ”

“ अग, ही लढाई आहे ना ! मधे थोडे दिवस बाजारात ‘ कॅप्स्टन ’ मुळीच मिळत नव्हती. दुसरी सिगरेट ओढावी तर तिला हिची सर थोडीच येणार ? तुझ्या सहवासातली गोडी ”

“ पुरे. समजते म्हटल लाडीगोडी ! पण म्यणात ते कसल पाकीट आहे ? ” अखेरीस न राहवून तिने विचारलेच.

“ ते होय ? अग, त्यात श्वेतांबरीची एक कविता आहे. माझ्या वशिल्यान ती ‘ प्रभाकरा ’त छापायची आहे ! सोबत एक पत्र लिहून मी ती सपादकाकडे पाठवणार आहे. ”

त्याने ते पाकीट मुळीच आढेवेढे न घेता तिच्या हातात दिले त्यावरून तिची खात्री झाली, की त्यात प्रेमपत्र वगैरे काही नाही ! तरीपण त्याची तिने आपल्या चर्मचक्षूंनी शहानिशा करून घेतलीच

“ मी आपल सिगारेटच पाकीट लपवीत होतो आणि तुला वाटल मी हे ‘ श्वेतांबरी ’ च पाकीट लपवतो आहे ! वा ! छान घोटाळा झाला हा ! ” श्रीधर म्हणाला.

प्रतिभेला आपली चूक कळून आली होती, आणि आपल्या सशयी स्वभावाची तिला अतिशय लाज वाटू लागली होती. ती आता काही विषयातर करणार इतक्यात श्रीधर म्हणाला,

“ बाकी इतर बायकासारखी तूहि इतकी सशयी असशील, अस नव्हत वाटल मला ! आणि हो, काय ग ? तू काव्याचा येवढा अभ्यास कधीं केलास ? ”

“ काव्याचा अभ्यास ? ” त्या प्रश्नाचा अर्थ न समजून प्रतिभेनें विचारले.

" हो, श्वेतांबरी सांगत होती, तिच्या स्त्रीमंडळातल्या काव्यगायनाच्या दिवशी तिनं केलेल्या वाङ्मयचौर्याबद्दल तू तिची खूप हजेरी घेतलीस म्हणून ? "

ह्यावर प्रतिभा आता काय उत्तर देणार !

---